# ब्रह्म विज्ञान

## (भगवत्प्राप्तीचा सहज मार्ग)

(अष्टम परिवर्धित संस्करण)

पू. स्वामी श्री सत्यपतीजी परिव्राजक, आचार्य श्री ज्ञानेश्वरजी तथा उपाध्याय श्री विवेकभूषण जी, दर्शनाचार्य यांच्या क्रियात्मक योग प्रशिक्षण शिबिरातांत प्रवचनांच्या आधारावर केलेले संकलन



स[illegible]सिंह यादव

दर्शन योग महाविद्यालय, [illegible] साबरकांठा (गुजरात) ३८३३०७

# ब्रह्म विज्ञान

## (भगवत्प्राप्तीचा सहज मार्ग)

(पू. स्वामी श्री सत्यपतीजी परिव्राजक, आचार्य श्री ज्ञानेश्वरजी तथा उपाध्याय श्री विवेकभूषणजी दर्शनाचार्य यांच्या क्रियात्मकयोग प्रशिक्षण शिबीरातील प्रवचनांच्या आधारे केलेले संकलन)




: अनुवादिका :

**सौ. सविता जोशी**

: संकलनकर्ता :

**आर्य रणसिंह यादव**

दर्शन योग महाविद्यालय, आर्यवन, रोजड

ब्रह्मविज्ञान
(भगवत्प्राप्तीचा सहज मार्ग)

प्रथम आवृत्ती : विजया दशमी, शके १९२९
सन २००७



सौ. सविता बळवंतराव ज़ोशी
१९४, चैतन्य, समर्थनगर,
औरंगाबाद-४३१००१
फोन: ०२४०-२३६००९१

मुद्रक व प्रकाशक :

सरस्वती प्रिंटींग प्रेस,
२-३ सिल्वर हाईट्स, मोती कारंजा,
औरंगाबाद - ४३१ ००१
फोन: ०२४०-२३२८५७२

# अनुक्रमणिका





## कर्म



## उपासना



## आत्मनिरीक्षण




## द्वितीय भाग

## - उपदेशामृत

# भूमिका

सांसारिक वस्तूंचा आपल्या बरोबरचा संबंध शाश्वत नाही व अधिकाधिक विषय भोग भोगून कोणतीही व्यक्ती पूर्ण व शाश्वत सुख प्राप्त करू शकत नाही. याउलट ईश्वराबरोबरचा आपला संबंध सदैव टिकणारा आहे व त्यालाच प्राप्त करून मनुष्य पूर्ण सुखी होऊ शकतो. हा सत्य शाश्वत सिध्दान्त माणूस ऐकत असतो. परंतु तारूण्यावस्थेत ही गोष्ट लक्षात येत नाही. हे सत्य माणसाला जीवनाच्या अंतिम पडावावर जाणवते. त्यावेळी वाचलेल्या, लिहिलेल्या, समजलेल्या गोष्टींना क्रियान्वित करण्यासाठी शक्ती, साधने व संधी हुकलेल्या असतात.

तारूण्यावस्थेत हे सत्य का समजत नाही याचे उत्तर उपनिषदकार ऋषी खालीलप्रमाणे देतात.

न साम्पराय : प्रतिभाति बालं प्रमाद्यन्तं वित्तमोहेन मूढम् ।
अयं लोको नास्ति पर इति मानी पुनः पुनर्वशमापद्यते मे ॥
(कठ. २-६)

याचा अर्थ असा की जो माणूस भौतिकवादाच्या दलदलीत रूतलेला, विषयभोगात आसक्त असून धन प्राप्तीच्या अभिलाषेमुळे मूढ बनलेला आहे अशा अज्ञानी व्यक्तीला आत्मा-परमात्मा, यम-नियम, ध्यान समाधी इत्यादी विषय आवडत नाहीत. या गोष्टींवर त्याचा विश्वास नसतो हाच एक अंतिम जन्म आहे असे तो मानतो. यापूर्वीही जीवन नव्हते व मृत्यूनंतरही जीवन नसणार असा त्याचा विश्वास असतो अशी व्यक्ती वारंवार जन्ममृत्यूच्या चक्रात अडकून अनेक प्रकारे दुःख भोगते.

आजच्या बिकट सामाजिक परिस्थितीमध्ये वैदिक धर्म, संस्कृती, सभ्यता, रीती, नीती, परम्परा इत्यादींचा जवळ जवळ विलोप झालेला आहे व भोगवादी परंपरेचा सर्वत्र प्रचार, प्रसार झालेला आहे. ब्रह्मविद्या बहुतांशी दुर्लभ झालेली आहे.

ऋषींच्या शब्दात असे म्हणता येईल -

श्रवणायापि बहुभिर्यो न लभ्यः श्रृण्वन्तोऽपि बहवो यन्न विद्युः।
आश्चर्यो वक्ता कुशलोऽस्य लब्धा आश्चर्यो ज्ञाता कुशलानुशिष्टः॥
(कठोपनिषद २-७)

अर्थात् भोगासक्त आळशी प्रमादी व्यक्तींना आत्मा, परमात्मा या संबंधी ब्रह्मज्ञान ऐकायला ही मिळत नाही. दैवयोगाने एखाद्या जिज्ञासू व्यक्तीला यथार्थरूपाने व योग्य गुरूव्दारे हे ज्ञान कधी वाचावयास व ऐकावयास मिळाले तरी अविद्येने मलीन झालेल्या चित्तवृत्तीच्या माणसाला हे ऐकूनही समजत नाही जर थोडेसे ज्ञान प्राप्त झाले तरी ते सूक्ष्म ज्ञान ती व्यक्ती व्यवहारात आणू शकत नाही. या ब्रह्मविद्येचा उपदेशक, सुशिक्षित मनुष्य एखादाच मिळू शकेल.

शाश्वत सुख शांतीच्या प्राप्तीसाठी आज माणसाने अत्यंत पुरूषार्थ केलेला आहे व करीत आहे या उद्दिष्टासाठी माणसाने संपूर्ण पृथ्वीचे स्वरूपच बदलून टाकलेले आहे. नद्यांचे प्रवाह बदललेले आहेत. मोठमोठी धरणे बांधून कालव्यांचे जाळे पसरविलेले आहे. पृथ्वीच्या गर्भातून हजारो प्रकारची खनिजे काढण्यात येत आहेत. सडका, वाहने, संचार- साधने, राकेट व भिन्न प्रकारची तांत्रिक यंत्रे, इलेक्ट्रानिक्स, सिन्थेटिक साधनांचा शोध लावून भोगसाधनांचे अंबार लावलले आहेत. या सर्व कार्यांचे उद्दिष्ट हेच आहे की मनुष्य- जीवन सुखी, शांत, निर्भय व्हावे परंतु सूक्ष्म दृष्टीने पाहता असे दिसून येते की इतके करूनही मनुष्य जीवन पूर्वीपेक्षा अधिक अशान्त, भयभीत व दु:खी बनलेले आहे. पूर्वीपेक्षा सामान्य माणसाजवळ जरी भौतिक धन संपत्ती, भोग साधने जास्त झालेली आहेत तरी आध्यात्मिक दृष्टीने मनुष्य दरिद्री, इंद्रियांचा दास, दीन हीन, भित्रा व पशूवत बनलेला आहे. माणसाने आपल्या अज्ञानाने असा समज करून घेतलेला आहे की जास्तीत जास्त भोग साधने प्राप्त करून रोग, भय, चिंता, दु:ख संपून जातील ही त्याची फार मोठी चूक आहे. त्याने आपल्या जीवनाचे ध्येय केवळ वित्त (धन+भोगसाधने) प्राप्त करणे हेच ठरविलेले आहे.

ब्रह्मवेत्ते ऋषी म्हणतात - "न दृष्टात तत् सिध्दि" (सांख्य १-२) अर्थात् प्रत्यक्ष दिसणाऱ्या प्राकृतिक साधनांनी (धन, संपत्ती, जमीन, घर, पत्नी, नौका (वाहन) संपूर्ण दु:खांचा नाश होणे असंभव आहे. "न वित्तेन तर्पणीयो मनुष्य:" (कठ १-१-२७) अर्थात् धन इत्यादी, विषय भोगांनी माणूस कधी तृप्त होऊ शकत नाही. "अमृतत्त्वस्य तु नाशास्ति वित्तेन इति" (वृह. उप २-३-२) अर्थात् केवळ धन संपत्तीने उच्च कोटीच्या सुखाची आशा करता येत नाही. तात्पर्य हे की संपूर्ण भौतिक साधने एकत्रित करूनही आत्म्याची भूक व तहान भागू शकत नाही. त्यासाठी ब्रह्मविद्येचा आश्रय घ्यावा लागतो.

प्राचीन ऋषींनी जीवनात पूर्ण व शाश्वत सुख देणाऱ्या ज्या अध्यात्म विद्येचा उपदेश केलेला आहे त्या विद्येचा माणसाला जवळ जवळ विसर पडलेला आहे. त्याचा परिणाम हा झालेला आहे की जीवनातून ईश्वर, धर्म, साधेपणा, संयम, तपस्या, धैर्य,

प्रेम, श्रध्दा विश्वास, परोपकार इत्यादी नष्ट झालेले आहेत. लोक चांगली दिनचर्या, ध्यान, स्वाध्याय, सत्संग यज्ञ, सेवा इत्यादी शुभ कर्मानी रहित भोग परायण बनलेले आहेत.

ब्रह्मविद्येचे पठण-पाठण व श्रवण-श्रावण आणि त्याप्रमाणे आचरण यांचा अभाव झाल्यामुळे आज मनुष्य, परिवार, समाज, राष्ट्र, विश्व यांची दुरवस्था झालेली आहे. या विद्येच्या अभावामुळे वाईट गोष्टींना प्रोत्साहन मिळत आहे. सर्व वाईटाचे मूळ कारण हेच आहे. जर ही परंपरा पुन्हा सुरू झाली तर समाज पुन्हा सुखी, शांत, निर्भय बनू शकतो .

श्री रणसिंहजी अत्यंत सत्यनिष्ठ आर्य पुरुष आहेत मागील १०-१२ वर्षांपासून ते ब्रह्मविद्येसंबंधी योग प्रशिक्षण शिबिरात सहभागी होत आलेले आहेत. शिबिरात शिकविलेल्या आध्यात्मिक विषयांवर ते लेखन करीत आलेले आहेत. वक्त्याच्या भाषणाचा यथायोग्य भाव लेखणीबध्द करणे कठीण असते तरीही त्यांनी वक्त्याचा मुख्य भाव संकलित करण्याचा स्तुत्य प्रयत्न केलेला आहे. जरी विषयाचे प्रतिपादन सुसंगत व क्रमवार पध्दतीने व्यक्त झाले नसले व अनेक ठिकाणी पुनरावृत्ती झालेली असली तरीही अध्यात्मात अभिरूची असणाऱ्यांना या पुस्तकात अनेक नवनवीन गूढ तथ्यांची उकल झालेली आढळून येईल. या विषयाचे चिंतन व मनन करून जिज्ञासू व्यक्तींच्या ज्ञानाच्या परिसीमा विस्तृत व स्पष्ट होऊन त्यांचे कर्म व उपासना यांचा स्तर उंचावेल या आध्यात्मिक विषयाचे संकलन व प्रकाशन करण्यासंबंधी श्री. रणसिंहजीचा मी आभारी आहे व त्याची सर्व प्रकारे उन्नती व्हावी अशी शुभकामना व्यक्त करतो.

ज्ञानेश्वरार्य

(एम.ए. दर्शनाचार्य)

# प्रस्तावना

आज मानवी समाजातून वेदप्रतिपादित व ऋषी कडून क्रियात्मक रूपाने व्यवहार प्रस्थापित करणारी मानवतावादी जीवन शैली नष्ट झालेली आहे. मानवी जीवनाचे श्रेष्ठ लक्ष्य प्राप्त करून देणाऱ्या योगविद्येचाही नाश झालेला आहे. आजचा मानव जन्मापासून मृत्यूपर्यंत पशू प्रमाणे केवळ भोगवादाच्या पंजात अडकून भयंकर दुःख भोगत आहे. मानवता, बंधुत्व, परोपकार व निष्काम कर्माची भावना जवळ जवळ नष्ट झालेली आहे. मानव आपले श्रेष्ठ उद्दिष्ट ईश्वरप्राप्ती हे विसरून गेलेला आहे तसेच दुःखातून स्वतःची व इतरांची सुटका हे ही उद्दिष्ट विसरलेला आहे आणि जीवन निर्वाहाच्या साधनांच्या संग्रहालाच आपले साध्य समजत आहे. आज मानव जातीचे प्रत्येक क्षेत्र (राष्ट्रीय, सामाजिक, धार्मिक, राजकीय) भोगवादाच्या कृत्रिम आकर्षणाने अत्यंत प्रभावित झालेले आहे. आज भोगवादाच्या लाटेने शिपायापासून राष्ट्रपती पर्यंत एका मंदिराच्या पुजाऱ्यापासून मठाधीशापर्यंत सर्वजणांना कोर्ट कचेरी पर्यंत (सत्तेसाठी) पोचविलेले आहे. सत्यापासून विम् ुख अवडंबरयुक्त, अद्यावत साधनांनी सुसज्जित दगडविटांच्या भिंती खाली व नेत्रांना दीपविणाऱ्या चकाकी खाली मानव व त्याचा देव भरडला जात आहे. यम नियमाचा सर्वत्र अभाव आहे. भौतिकतेने प्रभावित झालेल्या सत्ताधीशांनी व धर्माचार्यांनी आज मानव जातीला स्वार्थी, कृतघ्न व नास्तिक बनविलेले आहे.

अशा स्थितीमध्ये एखादीच व्यक्ती (लाखात एक) ऋषींच्या परंपरेचे अनुसरण करून व योग मार्गाचा अवलंब करून मानवी समाजाला या भोगवादाच्या पंजातून सोडविण्यासाठी आपल्या जीवनाची आहुती अर्पण करताना दिसून येते.

· आमच्या सद्भाग्याने स्वनामधन्य स्वामी श्री सत्यपतीजी परिव्राजक व त्यांचे सुयोग्य शिष्य व्दय आचार्य ज्ञानेश्वरजी व विवेकभूषणजी दर्शनाचार्य यांनी क्रियात्मक योग प्रशिक्षण व वेदकालीन ऋषींच्या आध्यात्मिक जीवनप्रणालीला वेद, उपनिषद दर्शन इत्यादींच्या पठण पाठणाव्दारे या आर्यवनच्या भूमीवर प्रत्यक्षात उतरवून चरितार्थ केलेले आहे. त्यांनी ज्या ऋषीपध्दतीने (शैलीने) या विद्येला क्रियान्वित केलेले आहे ती आर्यजगतात दुर्लभ आहे. पौराणिक जगात किंवा इतरत्र धरतीवर तर ती स्वप्नाप्रमाणे दुर्मिळ आहे.

---

प्राचीन ऋषींची योगविद्या क्रियात्मक रूपाने व त्या बरोबरच दर्शन, उपनिषद, वेद इत्यादीचे अध्ययन अध्यापन वैदिक विव्दान, ब्रह्मचाऱ्यांकडून केले जाते. हे या धरतीवरील अव्दितीय कार्य आहे. सामान्य साधकाला याचा आंशिक लाभ वर्षातून दोनदा मिळतो व देशात इतर ठिकाणीही वारंवार आयोजित केलेल्या शिबिरातून मिळतो. या शिबिरातून वैदिक सिध्दांताचे परिज्ञान व क्रियात्मक योग प्रशिक्षणाव्दारे वैदिक ऋषीच्या पध्दतीने मानव निर्माणाचे कार्य आठदहादिवसात केले जाते, जे या शैलीच्या अनभिज्ञतेमुळे वर्षानुवर्षेही इतरत्र प्राप्त करणे दुर्मिळ आहे. इतक्या थोडया काळातील दिनचर्येने व्यक्तीच्या जीवनात शाश्वत मार्गाचा शोध लागून वाईटाचा त्याग व चांगल्या गोष्टींचा स्वीकार करून जीवन धन्य बनते. यामुळे शारिरिक, मानसिक, आत्मिक, ज्ञान, बल, आनंद, उत्साह, निर्भयता इत्यादींची आश्चर्यजनक उपलब्धी होते.

आज या ब्रह्मविज्ञान (योगविज्ञान) ची देशात व परदेशात सर्वत्र जिज्ञासा व चर्चा आहे. जर हे शुध्द ज्ञान अष्टांगाच्या रूपाने मानवाला प्राप्त झाले नाही तर जसे ईश्वराचे अवैदिक स्वरूप व मान्यता यांनी जगात नास्तिकता व शत्रुत्त्व वाढले आहे. यामुळे विपरीत योगाच्या प्रचार प्रसाराव्दारे ही मानव जाती आपल्या मार्गापासून दूर जाईल.

आज योगविद्येचे शुध्द व अशुध्द रूपात खूप मोठे साहित्य उपलब्ध आहे. परंतु त्याचे ज्ञान एखाद्या नवीन पोहणाऱ्याला पाण्यात न उतरवता शिकविल्याप्रमाणे आहे. म्हणून योगविद्या विज्ञानाला क्रियारूपाने जाणण्या, समजण्यासाठी व जीवनात उत्तरविण्यासाठी योग्य योगसिध्द गुरू निर्देशकावी आवश्यकता असते. जी ऋषी परंपरेने व आमच्या सद्भाग्याने फक्त गुरूवर्य स्वामी सत्यपतीजीच्या रूपाने दिसून येत आहे. इतरत्र हिमालयाच्या गिरींकंदरातून एखादी व्यक्ती असल्यास ईश्वरच जाणे. योगजिज्ञासू पाठक, बंधू व मातानो! अनेक प्रकारच्या योग प्रशिक्षण शिबिरात गुरूदेव व आचार्य वर्गाकिडून जे ऐकले, शिकलो व समजले आणि आपल्या सामर्थ्यानुसार जीवनात उतरविले त्यामुळे लाभ झाला. शक्यतो त्यांच्याच शब्दात ते संकलित करण्याचा प्रयत्न केला आहे. या संकलनात ज्या त्रुटी असतील त्या माझ्या आहेत व जे क्रियात्मक योगविज्ञान जाणले ते सर्व या त्रिदेवांचा प्रसाद म्हणून स्वीकार करून त्याचा स्वतःला व इतरांना लाभ करून द्यावा. यात अनेक वेळा वाक्य, शब्द व विचार यांची पुनरावृत्ती झालेली
आढळून येईल. यात योगाची अनुष्ठान क्रिया असल्यामुळे असे झालेले आहे.

**कृतज्ञता ज्ञापन :** या 'ब्रह्मविज्ञान' संकलनाला लेखबध्द करताना झालेल्या अनेक त्रुटींचे व अशुध्दीचे संशोधन ब्र. सत्यजितजी दर्शनाचार्य यांनी अत्यंत तत्परतेने व मन लावून केले नसते तर हे वाचकाच्या हाती देता आले नसते. त्याच बरोबर आदरणीय आचार्य ज्ञानेश्वरजी यांनी पुस्तक प्रकाशन व भूमिका लिहिण्याची स्वीकृती देऊन याला महत्त्व दिले त्यासाठी मी अन्तःकरणपूर्वक त्यांचा आभारी आहे. मित्रवर शर्मा 'व्याकरणाचार्य' जूनागढ यांनी या संकलनाचे अवलोकन करून आपले विव्दत्तापूर्ण मन्तव्य 'पुरोवाक्' लिहिले त्याबाबत मी त्यांचा हार्दिक आभारी आहे.

**आर्य रणसिंह यादव**
बी.ए.(पूर्व स्टेशन अधीक्षक)
शुभम्
रायजीनगर जूनागढ (गुजरात)
३६२००

# अनुवादिकेचे मनोगत

आर्यसमाजी परिवारात जन्मल्यामुळे माझे पिताजी स्व. उत्तम मुनीजी वानप्रस्थी यांनी बालपणापासून वैदिक धर्माचे संस्कार केल्यामुळे वेदाबाबत जिज्ञासा निर्माण झाली व वेदाचा प्रचार व प्रसार करण्याची मला प्रेरणा झाली.

महर्षी दयानंद सरस्वती यांनी भारतीय समाजावर जे उपकार केलेले आहेत त्या ऋणातून कधीच मुक्त होता येणार नाही तरीही आपल्या अल्प सामर्थ्यानुसार मी 'ऋग्वेदादिभाष्यभूमिका' या महर्षींच्या ग्रंथाचा मराठीतून अनुवाद केलेला आहे व यजुर्वेदभाष्याचा मराठी अनुवाद प्रकाशित होण्याच्या मार्गावर आहे.

नोव्हेंबर २००४ ला मी आर्यवन रोजड येथे क्रियात्मक योग शिबिरात सहभागी झाल्यामुळे तेथे श्रेष्ठ ऋषी स्वामी सत्यपतीजी, आचार्य ज्ञानेश्वरजी व उपाध्यय श्री विवेकभूषणजी यांच्याकडून क्रियात्मक योगाबाबत मार्गदर्शन व प्रेरणा मिळाली. शुद्ध ज्ञान, शुद्ध कर्म, शुद्ध उपासना कशी करावी याचे स्पष्ट दिग्दर्शन झाले. त्यामुळे 'ब्रह्मविज्ञान' या ग्रंथाचा मराठी भाषिकांसाठी मराठीतून अनुवाद करण्याची प्रेरणा निर्माण झाली. तदनुसार या पुस्तकाचा मी यथामती व यथाशक्ती अनुवाद केलेला आहे.

या पुस्तकात पतंजली ऋषींनी वर्णन केलेल्या 'योग-दर्शन' या ग्रंथानुसार अष्टांग योगमार्गाने ईश्वराची उपासना कशी करावी याबाबत क्रियात्मक योगविज्ञानाचे अमूल्य मार्गदर्शन केलेले आहे व ते अत्यंत प्रभावी व परिणामकारक आहे. या पुस्तकात मानवी मनाचे चित्रण अत्यंत सुंदर रीतीने केलेले आहे.

'न अयं आत्मा प्रवचनेन लभ्यो न मेधया न बहुना श्रुतेन' परमेश्वर हा प्रवचनाने, मेधाबुद्धीने किंवा बहुश्रुत होण्याने प्राप्त होत नाही तर तो शुद्ध ज्ञान, कर्म, उपासना यांच्याद्वारे अष्टांग योगाच्या सहाय्याने प्राप्त होतो असे विवेचन या पुस्तकात अत्यंत सोप्या भाषेत केलेले आहे. ते मराठी वाचकांना आवडेल असे वाटते. या अनुवादात काही त्रुटी असतील तर वाचकांनी उदार अंत:करणाने मला क्षमा करावी.

या पुस्तकाचे प्रकाशन करण्यासाठी आदरणीय आचार्य श्री ज्ञानेश्वरजी आर्य यांनी अनुमती देऊन आर्थिक भार वहन केला त्याबद्दल मी त्यांची अत्यंत कृतज्ञ आहे. या पुस्तकाचा अनुवाद करण्यास माननीय श्री विवेकभूषणजी दर्शनाचार्य यांनी ही प्रोत्साहन दिले त्याबद्दल मी त्यांची आभारी आहे. तसेच औरंगाबाद येथील श्री. एन. जे. मुळे यांनी

या ग्रंथाचे प्रुफ लवकरात लवकर तयार करुन दिले त्याबद्दल मी त्यांची हार्दिक आभारी आहे. त्याचप्रमाणे माझे पती श्री. बी. जी. ज़ोशी यांनी अनुवाद करतांना जे अमूल्य साह्य केले त्याबद्दल मी मनापासून त्यांचीही आभारी आहे.

- सौ. सविता जोशी,
एम.ए.बी.एड.
१९४, चैतन्य, समर्थ नगर, औरंगाबाद.

# प्रथम भाग

## ब्रह्मविद्येच्या अभ्यासाची पद्धत

आपल्या महान ऋषींमुनींनी विद्या प्राप्तीसाठी एका विशिष्ट पद्धतीचा निर्देश केलेला आहे. जो साधक ब्रह्मविद्या प्राप्तीसाठी प्रयत्न करतो तोच या विद्येचे वास्तविक स्वरूप जाणतो व जो या पद्धतीने प्रयत्न करीत नाही त्याला ही विद्या प्राप्त होत नाही.

चतुर्भि : प्रकारै र्विद्योपयुक्ता भवति । आगमकालेन, स्वाध्याय-
कालेन, प्रवचन कालेन, व्यवहार कालेनेति
(महाभाष्य अ. १-१-१-१)

ही विद्या चार प्रकारे प्राप्त होते. आगमकाल, स्वाध्यायकाल, प्रवचनकाल, व्यवहारकाल.

आगमकाल म्हणजे जेव्हा माणूस शिकविणाऱ्याकडून सावधानतेने विद्येचे श्रवण करतो, स्वाध्यायकाल म्हणजे जेव्हा शिकलेल्या, ऐकलेल्या विद्येचा स्वस्थ चित्ताने विचार करतो, प्रवचनकाल म्हणजे जेव्हा दुसऱ्यांना प्रेमाने शिकवितो व व्यवहारकाल म्हणजे जेव्हा शिकलेली, शिकविलेली व मनन केलेली विद्या आचरणात आणतो.

विद्या प्राप्तीसाठी या पद्धतीशी मिळती जुळती दुसरी एक पद्धत आहे. श्रवण, मनन, निदिध्यासन व साक्षात्कार. यानुसार विद्यार्थ्याने प्रथम विद्या गुरूमुखाने श्रवण करून शिकावी त्यानंतर त्यावर विचार करावा व त्याविषयी निर्णय घ्यावा शेवटी त्याप्रमाणे आचरण करावे. या प्रक्रियेने विद्यार्थ्यांच्या मनावर विद्येचे दृढ संस्कार होतात. मनन करण्याने श्रद्धा निर्माण होते पण विद्या जर व्यवहारात न उतरविली तर अध्ययन व मनन व्यर्थ होते.

**प्रत्येक कार्य सफल होण्याची कारणे :**

१) पूर्व जन्मातील उपार्जित संस्कार
२) तीव्र इच्छा
३) पर्याप्त साधनांची उपलब्धता
४) कार्य करण्याची योग्य पद्धत
५) पूर्ण पुरूषार्थ
६) तप

 

वरील कारणे अधिक सक्षम असतील तर लवकर सफलता प्राप्त होते.

## ब्रह्मविद्येचा अधिकारी

विद्या ब्राह्मणाजवळ गेली व म्हणाली -

विद्या ह वै ब्राह्मणमाजगाम गोपाय मां शेवधिष्टेऽ हमस्मि ।
असूय कायानृजवेऽ यताय न मा ब्रूया वीर्यवती तथा स्याम
(निरूक्त २-१-१)

हे विद्वान ब्राह्मणा! मी तुझे धन आहे म्हणून माझे रक्षण कर. जे निन्दक, कुटिल व असंयमी असतील त्यांना माझा विनियोग करू देऊ नको. (निरूक्त२-१)

यमेव विद्याः शुचिमप्रमत्तं मेधाविनं ब्रह्मचर्योपपन्नम् ।
यस्ते न द्रुह्येत् कतमच्चनाह तस्मै मा ब्रूया निधिपाय ब्रह्मन इति।
(निरूक्त२-१)

जो आत्मा पवित्र, प्रमादरहित, बुद्धिमान, ब्रह्मचर्याने युक्त व वैरभाव रहित असेल त्यानेच या विद्यारूपी धनाचे रक्षण करावे असा माझा उपदेश आहे.

क्रियावन्तः श्रोत्रिया ब्रह्मनिष्ठाः स्वयं जुह्वत एकर्षिं श्रध्दयन्तः ।
तेषामेवैतां ब्रह्मविवदेत शिरोव्रतं विधिवद्यैस्तु चीर्णम् ॥
(मु.उप. ३-२-१०)

जे लोक पुरूषार्थी, वेदाध्ययन करणारे, ईश्वरनिष्ठ, श्रध्दाळू असून विद्वान गुरूचा अंगीकार करतात त्याच जिज्ञासूंना त्या विद्वानाने ब्रह्मविद्येचा उपदेश केला पाहिजे.

## योग

योगश्चित्तवृत्तिनिरोध : (योगदर्शन १-२) चित्ताच्या वृत्तीना रोखणे म्हणजेच योग (समाधी)होय.

"चित्तातील वृत्तींना सर्व दोषांपासून दूर करून, शुभ गुणांमध्ये स्थिर करून, परमेश्वराच्या सान्निध्यात मोक्षप्राप्ती करून घेण्यास योग असे म्हणतात. परमेश्वराच्या आज्ञेविरूद्ध वागून त्याच्या पासून दूर जाणे हा वियोग होय. उपासक योगी जेव्हा व्यवहारात प्रवृत्त होतो तेव्हा त्याची वृत्ती नेहमी हर्ष शोक रहित व आनंद, उत्साह युक्त असते व सांसारिक माणसाची वृत्ती नेहमी हर्ष शोकरूपी दुःख सागरात बुडालेली

असते. योग्याची वृत्ती ज्ञानरूपी प्रकाशात सदैव वृद्धिंगत होते व सांसारिक माणसाची वृत्ती सदैव (अज्ञान) अंध:कारात रुतलेली असते."

(महर्षी दयानंद सरस्वती)

चित्तवृत्तिनिरोध हा योग आहे. परंतु विवेक (वास्तविक ज्ञान) नसल्यामुळे व्यक्ती मनरूपी उपकरणाला चेतन मानते. त्यामुळे व्यक्तीला मनावर नियंत्रण करता येत नाही. मन कुठेही जाते हे म्हणणे योग्य आहे काय ? विचार कुठून उत्पन्न होतात? प्रत्यक्ष स्वत: विचार केल्याशिवाय वास्तविकता कळत नाही. आम्ही जवळ जवळ चाळीस वर्षांपूर्वी हे परीक्षण सुरू केले होते. अधिकार पूर्वक त्यात संशोधन केले असता लक्षात आले की आपल्या इच्छेविरुद्ध कोणताही विचार (मनात) येऊ शकत नाही. उत्तम भोजन समोर असताना माणूस असे म्हणतो का ? " माझे मन भोजन करू देत नाही " परंतु संध्या करताना मात्र मन ईश्वरात रमत नाही. सर्दी मध्ये गरम पांघरूण घेऊन झोपावे अशी इच्छा मन करीत नाही काय ? परीक्षाकेंद्रात विद्यार्थी असे म्हणतो का? "तीन तास माझे मन लागत नाही" वस्तुत: अज्ञानामुळेच असे घडते. मन स्वत: काही करीत नाही आपण मनाद्वारे क्रिया करतो. संध्येमध्ये मन स्वैर होऊन आपोआप धावत नाही तर ही क्रिया आपल्या द्वारेच घडत असते.

ईश्वराच्या स्वरूपात तल्लीन होणे म्हणजे योग होय. मनाची वृत्ती जेव्हा बहिर्मुख नसते तेव्हा ती परमेश्वरात स्थित होते.

ज्यामुळे सर्व दु:खांपासून सुटका होऊन ईश्वरप्राप्ती होते त्यास योग हे नाव आहे. जो माणूस मन, इंद्रिये आणि आत्मा यांचा विचार करीत नाही तो अयोगी असतो. त्याला आंतरिक ज्ञान नसते. इंद्रियासमवेत मन व मनासमवेत आत्माही बहिर्मुख होतो बाहय स्थूल पदार्थात जे सुख दिसते त्यापेक्षा कित्येक पटीचे सुख ईशवरानंदात असते. दृश्य पदार्थांपासून मन पृथक केल्यामुळे विभू अशा परमेश्वराशी योगामध्ये आत्म्याचा संयोग होतो. ज्याने कधी विचार केलेला नसतो त्याला आत्मा व परमात्मा यांचा कधी आभास होत नाही. ज्यावेळी आत्म्यामध्ये चंचलता असते त्यावेळी व्यक्ती कोणतेही वैचारिक कार्य सुरू करू शकत नाही. माणसाचा संपूर्ण बाहय व्यवहार आंतरिक व्यवस्थेवर अवलंबून असतो. ध्यानामध्ये विचार करण्याने माणसाची वृत्ती परमेश्वरात तल्लीन होते.

नायमात्मा प्रवचनेन लभ्यो न मेधया न बहुना श्रुतेन ।
यमेवैष वृणुते तेन लभ्यस्तस्यैष आत्मा विवृणुते तनुं स्वाम् ॥

हे परम तत्त्व केवळ प्रवचन, मेधाबुद्धी किंवा श्रवण करण्याने प्राप्त होत नाही तर जी व्यक्ती योग्य आचरण करून आपल्या अन्त:करणात त्याला शोधते तिलाच ते तत्त्व प्राप्त होते. परमेश्वर आपले महान स्वरूप अशाच अनुरागी भक्ता समोर प्रकट करतो.

## ईश्वरोपासना योगाभ्यास पद्धती

ईश्वराच्या आनंद स्वरूपात आपल्या आत्म्याला मग्न करण्याच्या क्रियेला उपासना म्हणतात. जेव्हा जेव्हा माणसे ईश्वराची उपासना करू इच्छितात तेव्हा तेव्हा इच्छानुकूल एकान्तस्थानी बसून आपल्या मनाला शुद्ध करून आत्म्याला स्थिर करावे. सच्चिदानंद, अन्तर्यामी, सर्वव्यापक, न्यायकारी परमेश्वरामध्ये सर्व इंद्रिये, मन व आत्म्याला सम्यक चिंतनाने चांगल्या प्रकारे स्थिर करावे व त्याची स्तुती, प्रार्थना, उपासना वारंवार करून आपल्या आत्म्याला त्यात उत्तम प्रकारे तल्लीन करावे.

- महर्षी दयानंद

कर्मयोग, ज्ञानयोग, भक्तियोग, हठयोग, राजयोग, सहजयोग, मन्त्रयोग इत्यादी वेगवेगळे योग नाहीत. वेगवेगळ्या योगांगाचा क्रमश: अभ्यास करण्याने नव्हे तर पतंजली ऋषींनी वर्णिलेल्या अष्टांग योगाचे अनुष्ठान करण्याने दु:ख नष्ट होऊन परमानंदाची प्राप्ती होते. या सर्व योगांगाचा उद्देश्य हा आहे की परमेश्वराशी जो नित्य योग असतो. नित्य संबंध असतो तो अनुभवता आला पाहिजे.

निष्काम कर्म (कर्मयोग) म्हणजे संसाराच्या प्राप्तीसाठी कर्म न करता परमेश्वराच्या प्राप्तीसाठी केले जाते ते कर्म.

**दूरत्वाचे प्रकार :** दूरत्व हे तीन प्रकारचे असते - स्थान, काल व ज्ञान. ईश्वर सर्वव्यापक, नित्य असल्यामुळे स्थान व कालाच्या दृष्टीने तो जीवात्म्याच्या निकट असतो. परंतु ज्ञानाच्या दृष्टीने जेव्हा दूरत्व समाप्त होते तेव्हा ज्योतीत ज्योती मिसळते. ही ज्योत म्हणजे एखादा भौतिक प्रकाश नाही. जर सूर्याप्रमाणे परमेश्वराचा प्रकाश असता तर कुठेच अंध:कार झाला नसता. हा प्रकाश ज्ञानाचा आहे. जसे एखाद्या विद्यार्थ्याला एखादी गोष्ट समजली तर तो म्हणतो "आता माझ्या बुद्धीत प्रकाश पडला, ज्ञान मिळाले." परमेश्वर जीवात्म्यापासून दूर नाही परंतु जीवात्माच त्याच्या पासून दूर जातो. सन्निकट असल्यामुळे ईश्वर सर्वत्र, सर्वकाळी सर्व वस्तूंमध्ये व सर्व जीवांमध्ये असतो.

 

अत्यंत पापी, दुराचारी, व्यक्तीच्याही परमेश्वर तितकाच जवळ असतो जितका संत, महात्मे, जीवनमुक्ततत्त्वज्ञ, तत्वज्ञ, भगवत्प्रेमी इत्यांदीच्या निकट असतो. अशा परमेश्वराला प्राप्त करण्यासाठी अष्टांग योगाचे अनुष्ठान केले पाहिजे.

महर्षी पतंजलीनी सर्वांवर उपकार करणाऱ्या सत्य शाश्वत सुख देणाऱ्या योगशास्त्राचे चार भाग केलेले आहेत. त्यांना पाद असे म्हणतात -

१) प्रथम पादामध्ये योगाचे लक्षण, मनोनिग्रह, चित्त वृत्तींना रोखण्याच्या उपायांचे वर्णन केलेले आहे. त्याला समाधीपाद असे म्हणतात. यात ५१ सूत्रे आहेत.

२) व्दितीय पादामध्ये अष्टांग योगाचे वर्णन व शम, दम इत्यादी योग साधनांच्या विस्ताराचे वर्णन केलेले आहे. यात ५५ सूत्रे आहेत.

३) तृतीय पादामध्ये योग साधनेचे गौण फळ वाक् सिध्दी व अणिमा इत्यादी सिध्दी प्राप्तीचे वर्णन आहे. याला विभूतीपाद असे म्हणतात. यात ५५ सूत्रे आहेत.

४) चतुर्थ पादामध्ये योगाचे मुख्य फळ मोक्ष आहे म्हणून त्याचे नांव कैवल्यपाद आहे. यात ३४ सूत्रे आहेत.

## क्रियात्मक योग

ब्रह्मविद्या (योग विज्ञान) ही ऋषींमुनींनी मानव समाजाला अर्पित केलेली अनुपम भेट आहे. हे योगविज्ञान ईश्वरोपासना व व्यवहारात ईश्वराच्या आज्ञेचे (निष्काम कर्म) पालन करण्याने प्राप्त होते.

ज्यामध्ये क्रिया प्रमुख असतात तो क्रियात्मक योग होय. व्यावहारिक किंवा दैनिक जीवनात बरीवाईट कामे करून सकाळी व संध्याकाळी दोन्ही वेळा संध्येचे मंत्र मनात म्हणणे याला योगाभ्यास म्हणता येणार नाही. वैदिक जीवन जगण्याची शैली म्हणजेच क्रियात्मक योग. ज्यात उठल्यापासून झोपेपर्यंत नियमित दिनचर्या असावी लागते. क्रियेचे आधिक्य असणाऱ्या या प्रकारच्या योगाभ्यासात दिवसभराची क्रिया करीत ईश्वराला समीप समजून त्याच्याशी संबंध जोडावा लागतो. व्यवहारात आठ अंगांचे पालन करावे. उठल्याबरोबर निकट असण्याचा अनुभव करावा. दिवस भर ईश्वराशी संबंध जोडलेला असावा. उठता, बसता, खाता. पिता, व्यवसाय, सेवा, कर्तव्य कर्म करीत व (योगाच्या) यमनियमाचे पालन करीत जीवन जगून ईश्वरीय आज्ञेनुसार आपल्या स्वतःला दिव्य मानवात परिवर्तित करावयाचे आहे, हे लक्षात घेतले पाहिजे.

क्रियात्मक जीवनच योग्याचे जीवन आहे. वेदविहित शुभ कर्म करणे हा निवृत्तीचा मार्ग आहे. तीच माणसे खऱ्या अर्थाने जीवन्त असतात जी आपल्या जीवनाला लोकहिताच्या कार्यामध्ये गुंतवितात व उठल्यापासून झोपेपर्यंत सर्व क्रिया करीत ईश्वरांशी संबंध जोडून ठेवतात.

आपल्याला योगानुसार वागावयाचे असेल तर तसे वागताना कितीही अडचणी आल्या तरी आपली प्रत्येक क्रिया यमनियमानुसार संयमित असावी. जीवन असत्य व छळ कपटाने भरलेले नसावे. खाण्या पिण्यात मद्य, मांस नसावे, असंतुष्ट नसावे. व्यवहारात यमनियमांच्या पालना खेरीज योग, ध्यान,धारणा, जप, समाधी इत्यादी सर्व व्यर्थ आहे.

ईश्वराच्या गुणांचे कीर्तन, स्तुती, प्रार्थना, उपासना त्याचे गुण आत्मसात करणे हा ही क्रियात्मक योग आहे. ईश्वर ज्याप्रमाणे या ऐहिक गोष्टींपासून दूर असतो, अप्रभावित असतो, दुःखी नसतो 'निर्दोष हि समं ब्रह्म' ब्रह्म सदैव निर्दोष व सम असतो.

मन स्वतःमध्ये स्थित होऊन जेव्हा त्याच्या वृत्तींचा निरोध होतो तेव्हा शारीरिक दुःख नष्ट होऊन क्लेशांची निवृत्ती होते.

ज्ञान, कर्म, उपासना, विवेक, वैराग्य, अभ्यास, तप, स्वाध्याय व ईश्वरप्रणिधान यातच सर्व काही सामावलेले आहे.

## योगाभ्यासाचे महत्त्व व लाभ

१) मेधा बुद्धीची प्राप्ती
२) तीव्र स्मृतीची प्राप्ती
३) एकाग्रतेची प्राप्ती
४) मन इत्यादी इंद्रियांवर नियंत्रण
५) कुसंस्काराचा नाश व सुसंस्काराचा उदय
६) 'मी कोण आहे' याचे ज्ञान
७) शान्त, प्रसन्न, सन्तुष्ट, निर्भय
८) निष्काम कर्म
९) जीवनाच्या परम लक्ष्याचे ज्ञान
१०) कष्ट सहन करून आदर्शांवर स्थित राहाण्यास समर्थ
११) आत्मसाक्षात्कार व जीवनमुक्ती
१२) ब्रह्मानंदाची प्राप्ती

 

## योगाचे फळ

१) तमेव विद्वान न बिभाय मृत्यो : (अर्थव १०-८-४४)

व्यक्ती ईश्वराला जाणून मृत्यूला भीत नाही.

२) न च पुनरावर्तते (छान्दो ८-१५-१)

जो पर्यंत मोक्षाचे फळ (अवधी) पूर्ण होत नाही तोपर्यंत त्या जीवाला त्या दरम्यान दुःख प्राप्त होत नाही.

३) वेदाहमेतं पुरूषं महान्तमादित्य वर्णं तमसः परस्तात् ।

तमेव विदित्वाति मृत्युमेति नान्यः पन्था विद्यतेऽ यनाय (यजु ३१/१८)

त्या सर्वज्ञ, सर्व शक्तिमान परमेश्वराला जाणूनच मनुष्य जन्म मरणाच्या दुःखांपासून दूर होऊ शकतो मुक्तीसाठी याच्या शिवाय दुसरा कोणताही मार्ग नाही.

४) रसो वै सः । रसं ह्येवायं लब्ध्वाऽनन्दी भवति ।

(तैत्ति. उप. ब्रह्मा. व ७)

ईश्वर आनंद स्वरूप आहे. जीवात्मा त्याच आनंद स्वरूप परमेश्वराला प्राप्त करून आनंदित होतो.

५) भिद्यते हृदयग्रन्थिश्छिद्यन्ते सर्वसंशयाः।

क्षीयन्ते चास्य कर्माणि तस्मिन्दृष्टे पराऽवरे (मुण्ड २-२-८)

त्या सर्वरक्षक ईश्वराला योगाव्दारे जाणल्यावर हृदयातील अविद्यारूपी गाठ नष्ट होते. सर्व प्रकारचे संशय दूर होतात व भविष्यात होऊ शकणारी पाप कर्मे नष्ट होतात अर्थात् ईश्वराला जाणल्यावर व्यक्ती भविष्यात पाप करीत नाही.

## योगाभ्यास न करण्याने हानी

**योगाभ्यास न करणारी व्यक्ती -**

१) आपल्या व्यवहाराने इतरांना दुःखी करते.
२) कृतघ्न व महामूर्ख असते.
३) मन व इंद्रियांचा दास असते.
४) वेद व ऋषींनी सांगितलेल्या सूक्ष्म गोष्टींचे ग्रहण करू शकत नाही.
५) रोग, वियोग, अपमान, अन्याय, हानी, विश्वासघात, मृत्यू इत्यादीं मुळे होणारे

दु:ख सहन करू शकत नाही.

६) काम, क्रोध, लोभ,मोह इत्यादींशी संबंधित कुसंस्कारांना नष्ट करू शकत नाही व सुसंस्कारांची वृध्दी करू शकत नाही.

७) समस्या व्यवस्थितपणे सोडवू शकत नाही.

८) समाधी व्दारे उपलब्ध होणारे ईश्वरीय गुणविशेष ज्ञान, बल आनंद, निर्भयता, स्वातंत्र्य इत्यादींपासून वंचित होते.

९) जीवनाचे मुख्य लक्ष्य संपूर्ण दु:खांपासून सुटका करून घेऊन शाश्वत सुख (नित्य आनंद) प्राप्त करू शकत नाही.

## योगात प्रवेश व पात्रता

ब्रह्मविद्या ही पूर्ण आत्मसमर्पण करून श्रध्दापूर्वक व प्रेमपूर्वक प्राप्त केली जाते. अध्यापन करणारे परिपूर्ण निपुण आहेत असे समजून भावनाप्रधान होऊ नये. वैदिक परंपरेत विद्या प्राप्तीसाठी परीक्षा करून व सत्यासत्याचा निर्णय घेऊनच गुरू केला जातो.

वैदिक योगविज्ञान शिकण्याची प्रक्रिया ज्ञान, कर्म उपासनेवर आधारित आहे.

(१) ज्ञान विज्ञानामध्ये ईश्वर म्हणजे काय ? आम्ही कोण ? हे जग म्हणजे काय? हे शिकविले जाते. हे जाणल्या खेरीज योगात प्रवेश मिळू शकत नाही. जी व्यक्ती ज्ञानाच्या क्षेत्रात ईश्वर, जीव, प्रकृतीला जाणत नाही ती लौकिक क्षेत्रात निष्फळ ठरते.

(२) ज्ञानानन्तर वैदिक योगात कर्माचा विषय येतो. मन, वाणी, शरीराने शुभ व अशुभ, चांगले वाईट कर्म घडते. वाईट काय व चांगले काय हे जाणून वाईटाचा त्याग व चांगल्याचा स्वीकार करावा लागतो. लौकिक उद्देश्य समोर ठेवून कर्म करणे "सकाम कर्म" होय व ईश्वर प्राप्तीसाठी कर्म करणे 'निष्काम कर्म' होय. आपल्याला अशुभ कर्म सोडून शुभ कर्म करावयाचे आहे व ते ही निष्काम भावनेने करावयाचे आहे.

**(३) उपासना :** ईश्वराची स्तुती, प्रार्थना, उपासना कशा प्रकारे करावी? ती करण्यात बाधा कोणती ? ईश्वराशी योग्य संबंध कशा प्रकारे प्रस्थापित होईल ? कृतज्ञतापूर्वक उपासना केल्याशिवाय ईश्वराचे साह्य प्राप्त होऊ शकत नाही. उपासना जर केली नाही तर कृतघ्नतेमुळे काही लाभ होत नाही. 'योगश्चित्तवृत्तिनिरोध' ज्याच्यामुळे चित्तवृत्ती रोखल्या जाऊ शकतील, मोक्ष (ईश्वर) प्राप्त होईल, सर्व दु:खे दूर होतील त्याचेच नाव योग आहे. या विरूद्‌ध वागल्यास वरील गोष्टी प्राप्त होत

नाहीत मग तो योग नव्हे. ईश्वराच्या स्वरूपात तल्लीन होणे योग होय.

**पात्रता :** शिकणाऱ्या व्यक्तीची पात्रता जोपर्यंत सिद्ध होत नाही तो पर्यंत त्याला ही विद्या येत नाही. जी व्यक्ती मनातील प्रत्येक विचार नियंत्रित करीत नाही ती व्यक्ती योगविद्या प्राप्त करू शकत नाही ज्याचे मन, वाणी आणि शरीर यावर नियंत्रण नसते ती व्यक्ती ही विद्या प्राप्त करू शकत नाही. प्रत्येक साधकाला हे काम स्वत: करावे लागते. जो साधक स्वाभाविक रीतीने व निर्भयपणे या प्रकारे वागतो तो सफल होतो. वारंवार सांगण्याने ही ज्याला उत्सुकता नसते उलट लौकिक गोष्टीतच रमतो तो सफल होत नाही त्याला शिक्षा करावी लागते तरीही तो सुधारत नाही उलट धीट बनतो. जसे चोर, डाकू कारागृहातून सुटल्यावर पुन्हा तेच कर्म करतात.

'मौन पाळा' ही सूचना देऊनही साधकाने भोजनाच्या वेळी व इतर वेळी मौन पाळले नाही तर कार्य निष्फळ होईल व पात्रता निर्माण होणार नाही. आपला व्यवहार सर्वांबरोबर योग्य प्रकारे ठेवावा. त्यानंतर योगविद्या येईल व त्यात सफलता मिळेल.

## योग जिज्ञासूची आवश्यक कर्तव्ये

(१) मनुष्य जीवनाचे मुख्य लक्ष्य ईश्वरप्राप्ती असून इतरांना ही ते प्राप्त व्हावे असा प्रयत्न केला पाहिजे. या गोष्टीचा जिज्ञासूने आपल्या मनात निश्चय केला पाहिजे.

वेद इत्यादी सत्य शास्त्रात असे लिहिलेले आहे.

अ) वेदाहमेतं पुरुष महान्तम् (यजुर्वेद ३१-१८)

ब) इह चेद वेदीदथ सत्यमस्ति न चेदिहा वेदीन्महती विनष्टि : (केन.अप. २-५)

क) आत्मा वा अरे द्रष्टव्य: श्रोतव्यो मन्तव्यो निदिध्यासितव्य :। (बृह.२-४-५)

(२) योगाभ्यासी व्यक्तीने श्रध्दापूर्वक मन, वचन व शरीराने यम-नियमांचे पालन केले पाहिजे.

(३) साधकाने स्वत: अनुशासित असावे व अनुशासन राखण्यास मदत करावी.

(४) योगाभ्यासी व्यक्तीने महर्षी व्यासाप्रमाणे, ही बाब लक्षात घेतली पाहिजे की 'नाऽ तपस्विनो योग : सिध्यति' अर्थात् तपश्चर्ये शिवाय योगाची सिद्धी होत नाही.

(५) योगसाधकाला वेद, दर्शन, उपनिषदे, स्मृती इत्यादी ग्रंथांच्या शब्दप्रमाणावर

पूर्ण विश्वास ठेवून चालले पाहिजे. या आप्त वचनावर संशय घेता कामा नये.

(६) योगाभ्यासी व्यक्तीने व्यवहारात अत्यंत सावधान राहिले पाहिजे. कोणत्याही प्रकारची त्रुटी (चूक) होता कामा नये जर कधी झाली तर त्याचा स्वीकार ताबडतोब केला पाहिजे व प्रायश्चित्त घेऊन शिक्षा भोगली पाहिजे व भविष्यात असे घडू नये असा प्रयत्न केला पाहिजे.

(७) योगाभ्यासी व्यक्तीने वाणीचा प्रयोग अत्यंत सावधानपूर्वक करावा अर्थात् आवश्यक असेल तरच बोलावे ते ही हितकारी असावे.

(८) योगाभ्यासी व्यक्तीने आपल्या सन्मानाची इच्छा कधीही करू नये व अपमान झाल्यास सहन केला पाहिजे, दुःखी होऊ नये.

(९) योगसाधकाला आपले प्रत्येक कार्य ईश्वर प्राप्ती (साक्षात्कार) साठी केले पाहिजे. सांसारिक सुखासाठी किंवा सांसारिक सुख साधनांसाठी नव्हे.

(१०) योगाभ्यासीने ब्रह्मविद्या (योगविद्या) श्रवण, मनन, निदिध्यासन व साक्षात्कार या पद्धतीने प्राप्त करण्याच्या हेतूने पूर्ण प्रयत्न केला पाहिजे.

(११) साधकाने योगासंबंधी विषयांचे अध्ययन करावे त्या शिकलेल्या विषयांवर चर्चा, विचार इत्यादी करावा. इतर सांसारिक विषयांशी संबंधित चर्चा करू नये.

(१२) योगाभ्यासी व्यक्तीने ब्रह्म विद्येचे महत्त्व जाणले पाहिजे व त्याच्या प्राप्तीसाठी पात्रता निर्माण केली पाहिजे. जसे जनक वगैरे राजे होते. राजा जनकाने याज्ञवल्क्याला खालील प्रमाणे म्हटले होते.

'सोऽहं भगवते विदेहान् ददामि माञ्चापि सह दास्यायेति'
(बृ.उप. ४-४-२३)

हे याज्ञवल्क्या ! मी तुला आपले संपूर्ण विदेह राज्य भेट देतो व स्वतःलाही तुझ्या आदेशाचे पालन करण्यासाठी समर्पित करतो.

(१३) योगाभ्यासी व्यक्तीने स्वतः त्रास भोगून (आपल्या सुख सुविधांचा परित्याग करून) दुसऱ्याला सुख देण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

(१४) योगाभ्यासी व्यक्तीने दुसऱ्याचे गुण पाहावेत, दोष पाहू नयेत आपले दोष पाहावेत गुण नव्हेत.

(१५) भौतिक वस्तूंचा (भोजन, वस्त्र, गृह, यान इत्यादी) प्रयोग शरीराच्या रक्षणासाठी

करा॒ ुख प्राप्तीसाठी नव्हे.

(१६) योग साधकाने आवश्यकता नसल्यास भोजन करू नये व आवश्यकतेची पूर्ती झाल्यानंतर भोजन इत्यादीचा अधिक प्रयोग करू नये अर्थात् आपल्या रसना इत्यादी इंद्रियांवर संयम ठेवावा.

(१७) ईश्वराच्या शीघ्रप्राप्तीसाठी हेय, हेयहेतू, हान, हानोपाय (दुःख, दुःखाचे कारण, सुख, सुखाचा उपाय) या गोष्टींना चांगल्या प्रकारे समजून घेण्याचा प्रयत्न करावा.

(१८) योगाभ्यासी व्यक्तीच्या मनात योगासंबंधी वेगवेगळ्या शंका उपस्थित झाल्यास एखाद्या योगनिष्ठ गुरूजवळ जाऊन त्यांची आज्ञा घेऊन प्रेमपूर्वक, जिज्ञासू वृत्तीने शंकांचे समाधान केले पाहिजे. परंतु कुणाबरोबरही विवाद करू नये.

## योगात विघ्न उपविघ्न

योगात जे विघ्न विक्षेप बाधक आहेत ते योगाच्या प्रथम स्तरापासून अंतिम दशेपर्यंत बाधक बनतात.

व्याधिस्त्यानसंशयप्रमादालस्यीविरतिभ्रान्तिदर्शनालब्ध भूमिकत्वा नवस्थितत्वानि चित्तविक्षेपास्तेऽन्तराया : ।

(यो.द. १/३०)

(व्याधि-स्त्यान-संशय-प्रमाद-आलस्य-अविरति-भ्रान्तिदर्शन-अलब्धभूमिकत्व-अनवस्थितत्वानि) हे नऊ (चित्त विक्षेपाः) चित्ताची एकाग्रता भंग करणारे आहेत) (ते) ते (अन्तरायाः) योगाचे बाधक शत्रू आहेत.

ही विघ्ने चित्तवृत्ती बरोबरच असतात, या विघ्नांचा अभाव झाल्यानंतर चित्ताच्या वृत्ती (प्रमाण, विपर्यय, विकल्प, निद्रा, स्मृती) नष्ट होतात.

(१) **व्याधी** : चुकीचा आहार विहार केल्याने धातूमध्ये वात, पित्त, कफ यांच्या विषमतेमुळे शरीरात ज्वर इत्यादी पीडा होणे.

(२) **स्त्यान** : संध्या, उपासना इत्यादी शुभ कर्मामध्ये जाणून बुजून मन न घालणे.

(३) **संशय** : योगाभ्यासी व्यक्तीला ताबडतोब फळ मिळत नसल्यामुळे किंवा धैर्य इत्यादी नसल्यामुळे संशय येऊ लागतो की अमूक वस्तू आहे किंवा नाही ?

(४) **प्रमाद** : समाधीचे साधन यम वगैरेंचे पालन न करणे विसरून जाणे, उपेक्षा

करणे, बेपर्वा असणे.

(५) **आळस** : योग साधनेचे अनुष्ठान करण्याचे सामर्थ्य असूनही तमोगुण वगैरेच्या प्रभावाने शरीर व मना मध्ये जडत्व असल्यामुळे ते न करणे.

(६) तृष्णा इत्यादी दोषांमुळे सांसारिक विषयांमध्ये रूची असणे. अविराते = वैराग्याचा अभाव.

(७) **भ्रान्तिदर्शन** : विरूद्ध ज्ञान होणे, जडाला चेतन वगैरे मानणे

(८) **अलब्धभूमिकत्व** : समाधी प्राप्त न होणे.

(९) **अनवस्थितत्त्व** : समाधी प्राप्त झाल्यावर ती पुन्हा भंग पावणे व समाधीमध्ये चित्त स्थिर न होणे.

या शिवाय पाच उपविघ्नेही आहेत जी योगदर्शन १/३१ खालील प्रमाणे -

दु:ख दौर्मनस्याङ्गमेजयत्वश्वास प्रश्वासा विक्षेपसहभुव: ।
(यो.द. १/३१)

(१) **दु:ख** : ज्यामुळे प्राणी त्रस्त होतात व ते नष्ट करण्याचा प्रयत्न करतात त्याला दु:ख म्हणतात. ती तीन प्रकारची आहेत

(अ) **आध्यात्मिक** : शारीरिक रोग (ज्वर इत्यादी) व मानसिक रोग (रागव्देष इत्यादीं) यामुळे होणारे दु:ख

(ब) **आधिभौतिक** : शत्रू, सिंह, वाघ, सर्प, मच्छर इत्यादी प्राणी समूहापासून प्राप्त होणारे दु:ख

(क) **आधिदैविक** : मन व इंद्रियांच्या अशांतीमुळे व प्राकृतिक संकटे, अतिवृष्टी, अनावृष्टी, अतिसर्दी, अतिगर्मीमुळे जे दु:ख होते ते :

(२) **दौर्मनस्य** : इच्छेची पूर्ती न होण्याने किंवा त्यात बाधा येण्याने मन खिन्न होणे.

(३) **अङ्गमेजयत्व** : आसन सिद्ध न होण्याने हलणे, डुलणे किंवा अन्य रोगांमुळे शरीरात कंपन होणे वगैरे रोग औषधांनी दूर करावा. आसनाच्या अभ्यासाने निश्चेष्ट बसण्याचा प्रयत्न (अभ्यास) करावा.

(४+५) **श्वास - प्रश्वास** :- दमा इत्यादी रोगांमुळे श्वास प्रश्वास अनियंत्रित रूपाने चालणे. वरील विघ्ने व उपविघ्ने एकाग्र चित्त असणाऱ्या योग्याला होत नाहीत.

**निवारण** : एक तत्त्व - ब्रह्माची उपासना व त्याच्या आज्ञेचे पालन करण्याने व्याधी इत्यादी विघ्ने व त्यांच्या बरोबर होणाऱ्या दु:ख इत्यादी उपविघ्नांची निवृत्ती होते. जरी ही असली तरी ईश्वरप्रणिधान करणाऱ्या योग्याला ही विघ्ने विक्षिप्त करीत नाहीत. प्रसन्न मनामुळे एकाग्रता, स्थिरता प्राप्त होते. म्हणून मनाच्या प्रसन्नतेसाठी -

मैत्रीकरूणामुदितोपेक्षाणां सुखदु:खपुण्यापुण्य विषयाणां भाव
नातश्चित्त प्रसादनम् । (यो. द. १/३३)

सुखी (साधन संपन्न) व्यक्तींबरोबर मित्रता, दु:खी लोकांविषयी दया, पुण्यात्म्यांना (धार्मिक, विद्वान, परोपकारी) पाहून प्रसन्न होणे व पापी माणसांची उपेक्षा (न राग न व्देष) असा व्यवहार करण्याने योगाभ्यासीचे मन प्रसन्न होते.

## मानवी जीवनाचे परम लक्ष्य

योगविद्या (ब्रह्मविद्या) अत्यंत सूक्ष्म विद्या आहे. मानवी जीवन हे किती मौल्यवान आहे ? जीवनाचा अवधी किती कमी आहे ? उद्या आपण असू किंवा नसू हे सांगू शकत नाही. मनुष्य जीवनाचे साफल्य कशात आहे ? ईश्वराला जाणणे व त्याची प्राप्ती हीच मनुष्य जीवनाची सफलता आहे व न जाणण्याने विफलता. मनुष्य जीवन व मानवी देह मिळूनही जो ईश्वराला प्राप्त करीत नाही तो आपलेही भले करू शकत नाही व इतरांचे ही भले करू शकत नाही.

जी व्यक्ती शुद्धज्ञान, शुद्ध कर्म, शुध्द उपासना करील तिचे लक्ष्य ईश्वर हेच राहील. जेव्हा ईश्वरच उद्दिष्ट असेल तेव्हा उत्तम कार्यच करील. असे करता करता एक वेळ अशी येईल की ती आपले परम उद्दिष्ट जे ईश्वर आहे त्याची प्राप्ती करून घेईल. कदाचित पुढच्या जन्मीही ते शक्य होईल. ईश्वर हा अत्यंत प्रयत्नाने तप, त्याग, परिश्रमाने प्राप्त होतो.

आज बहुतेक लोक आपले उद्दिष्ट लौकिक सुख मानून (तीन एषणा) ते पूर्ण करण्याच्या मार्गावर असतात. ईश्वर प्राप्तीला अवडंबर, छल, कपट, असत्य मानतात. लौकिक जीवनापासून विन्मुख होऊन ब्रह्मविद्या शिकावी लागते. जन्मघेणे, खाणे, पिणे, व्यापार व वृध्दावस्था यानंतर शेवट हे इतकेच जीवन नाही. त्यामुळे सर्व कामना पूर्ण होत नाहीत. काही काळा पूर्वी आपण नव्हतो व काही काळानंतर राहणार नाही मग केवळ वर्तमानच सर्व काही आहे काय ? आपण सर्व आत्मे चेतन पदार्थ, एक तत्त्व आहोत. आपली बुद्धी, मन इत्यादी उपकरणे ईश्वरप्रदत्त आहेत. जल, स्थल, सूर्य इत्यादी बाह्य पदार्थ आपल्या जगण्याची साधने आहेत. या साधनांचा आपल्याशी संबंध

आहे. त्यांच्या साह्याने आपण आपले कार्य करू शकतो व साध्य प्राप्त करू शकतो. मग ही विद्या कशी प्राप्त होईल ?

कोणतीही विद्या श्रवण, मनन, निदिध्यासन व साक्षात्कार या पध्दतीने प्राप्त होते. योगाभ्यास (चित्तवृत्तिनिरोध) इतर कुठे दुसऱ्या ठिकाणी किंवा आकाश पाताळात नाही परंतु आपल्या याच शरीरात, अन्तःकरणात करावयाचा आहे आपली कामना नित्य आनंद प्राप्त करण्याने पूर्ण होईल. कोणतीही वस्तू कितीही दुर्लभ असेल तर ती प्रयत्नसाध्य होऊ शकते.

ईश्वरप्राप्ती हेच जीवनाचे लक्ष्य असावे ? ते प्राप्त केल्याशिवाय माणसाच्या सर्व कामना पूर्ण होऊ शकत नाहीत 'सर्व दुःखांपासून सुटका व सर्वानंदाची प्राप्ती'हे मनुष्य प्राण्याचेच नव्हे तर पशू पक्षी इत्यादी प्रत्येक प्राण्याची इच्छा व लक्ष्य असते.

आज मानव जातीचे लक्ष्य विपरीत आहे. पाच इंद्रियांच्या भोग प्राप्तीसाठी सर्वजण कार्यरत आहेत. त्यांच्याच पूर्ततेसाठी भाऊ भावाचा गळा कापतो. पती पत्नीचे मूल्य ही धनसंपत्तीने मोजले जाते. येथे आर्यवा मध्ये सर्वजण जीवनाचे परिवर्तन करण्यासाठी आलेले आहेत. केवळ चांगले ऐकले व जाणले पण प्रत्यक्षात काही केले नाही तर समजावे की ईश्वर व ऋषींची परंपरा मोडीत काढली आहे. धनसंपत्तीसाठी वाईटात वाईट कामे केली जातात. निर्दोष व्यक्तींना सर्वासमक्ष मारले जाते. हत्या करणारे डाकू वगैरेना शिक्षा दिल्यानंतर ही बंधकाच्या बदल्यात सोडून दिले जाते. परंतु आपल्याला ईश्वर, वेद व ऋषींच्या आज्ञा पालन करावयाच्या आहेत. जन्म मृत्यू चालत राहणारच. हे जग अनादी कालापासून चालले आहे व अनन्त काळापर्यंत चालत राहील. आपले विरूद्ध विचार व वर्तन यात परिवर्तन झाले पाहिजे आपले अंतिम व श्रेष्ठ लक्ष्य ईश्वरप्राप्ती असून ते सदैव समोर ठेवावे. शुद्ध ज्ञान, कर्म, उपासना करून योगी बनून ईश साक्षात्कारानेच नित्य आनंदाची प्राप्ती होईल.

कोणतेही कार्य रुची प्रमाणे कठीण किंवा सोपे असते. ज्यात अभिरुची असेल ते सरळ व ज्यात रुची नसेल ते कठीण असते.

मनुमहाराज म्हणतात चरित्र निर्माणाचे शिक्षण घेण्यासाठी या देशात संपूर्ण पृथ्वीवरील लोक येत असत. ते शिक्षण म्हणजे योगविद्या होय. ज्यामुळे मानव आपल्या ध्येयाची प्राप्ती करून घेतो.

 

# अष्टांग योग

यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान, समाधी ही योगाची आठ अंगे आहेत. यम, नियम हे अष्टांग योगाचे आधार बिंदू आहेत.

## यम

यम पाच आहेत जे "सार्वभौमा महाव्रतम्" म्हटले जातात
अहिंसासत्यास्तेय ब्रह्मचर्यापरिग्रहा यमाः (यो.द. २-३०)

(१) **अहिंसा** : शरीर, वाणी व मनाने सर्वकाळी संपूर्ण प्राण्यांबरोबर वैरभाव सोडून व्यवहार करणे. अहिंसेनंतर सत्य इत्यादी चार यम आहेत. सर्व नियम अहिंसेवर आश्रित असून त्याच्या सिध्दीसाठी आहेत.
(२) **सत्य** : जसे पाहिले, ऐकले, वाचले व अनुमान केले त्या प्रमाणेच ज्ञानाचा ठसा मनावर उमटतो. तेव्हा तसेच वाणीने बोलावे व प्रत्यक्ष आचरण करावे. आवश्यक असेल तेव्हा सत्य न बोलणे हे ही असत्यच होय. सत्य हे सर्व प्राण्यांच्या हितासाठी असावे.

(३) **अस्तेय** : कोणाचीही वस्तू त्याच्या मालकाच्या परवानगी शिवाय घेऊ नये, ती वस्तू घेण्यासाठी कुणाला सांगू नये किंवा मनात इच्छाही बाळगू नये. तन, मन, धनाने कोणत्याही व्यक्तीला सहकार्य न करणे ही सुद्धा चोरी होय.

(४) **ब्रह्मचर्य** : मन व इंद्रियांवर संयम ठेवून वीर्य इत्यादी शारीरिक शक्तींचे रक्षण, वेद इत्यादी सत्य शास्त्रांचा अभ्यास करणे आणि ईश्वराची उपासना करणे.

(५) **अपरिग्रह** : हानिकारक व अनावश्यक वस्तूंचा व हानिकारक आणि अनावश्यक विचारांचा संग्रह न करणे.

जातिदेशकालसमयानवच्छिन्नाः सार्वभौमा महाव्रतम् (योग. २/३१)

जाती, देश, काळ व वेळ यांच्या सीमांनी रहित सर्व अवस्थांमध्ये अनुष्ठान करण्यायोग्य वरील यम हे महाव्रत मानले गेले आहेत.

(१) जाती :- शरीर (पशू, पक्षी, कीट, पतंग, मनुष्य इत्यादी)
(२) देश :- स्थानविशेष (मंदिर, तीर्थस्थान इत्यादी)
(३) काळ :- दिवस विशेष (एकादशी, पौर्णिमा इत्यादी)
(४) वेळ : - आपले नियम = सिद्धांत (अतिथींना मांस खाऊ घालणार, स्वतः

खाणार नाही)

हे अहिंसा इत्यादी यम जाती, देश काळ व वेळ यांच्या सीमांनी रहित (सगळ्या अवस्थां मध्ये पालन करण्या योग्य) सर्व प्राण्यांसाठी हितकारक अशी महान कर्तव्ये आहेत. अर्थात् सर्व प्राण्यांबरोबर या यमांचे पालन करण्याने माणसाचे जीवन श्रेष्ठ बनते.

## नियम

शौच संतोषतप: स्वाध्यायेश्वरप्रणिधानानि नियम : ।
(यो.द. २/३२)

यमाच्या अनुष्ठानाबरोबर नियमांचे पालन हे योगाभ्यासी व्यक्तीला आपल्या उद्दिष्टाकडे वाटचाल करण्यास उद्युक्त करते. परंतु यमाशिवाय नियमांचे पालन करणे बाह्य देखावा मात्र असल्यामुळे पतनाचे कारण बनू शकते.

(१) **शौच** : अद्भिर्गात्राणि शुध्यन्ति मन: सत्येन शुध्यति ।
विद्यातपोभ्यां भूतात्मा, बुध्दिर्ज्ञनिन शुध्यति ॥मनु ५-९॥

**अर्थ** : जलाने शरीराची, सत्याने मनाची, विद्या व तप यांनी जीवात्म्याची व ज्ञानाने बुध्दीची शुद्धी होते.

**बाह्य शुद्धी** : शरीर, वस्त्र, निवास्थान व आहार यांना पवित्र ठेवणे, बुद्धिनाशक मादक मद्य, मांस इत्यादींचा त्याग करणे.

**आंतरिक शुध्दी** : चित्तातील मल दूर करणे अर्थात् ईर्षा, व्देष, लोभ; मोह, क्रोध, राग इत्यादी मलांचा त्याग करणे.

(२) **संतोष** : यथाशक्ती ज्ञान व योग्यतेनुसार उत्तम कर्म करणे, त्यापेक्षा जास्त फलाची अपेक्षा न करणे, त्यामुळे लोभ इत्यादी वृत्ती दु:खी करीत नाहीत. संतोष असेल तर प्राप्त केलेले सुख सर्वश्रेष्ठ ठरते.

(३) **तप** : उत्तम कर्म करताना हानी, अपमान, कष्ट, बाधा इत्यादी आल्यास ते कर्म सोडू नये. गर्मी सर्दी सुख, दु:ख, तहान, भूक, मान, अपमान इत्यादी द्वंद्व सहन करणे.

(४) **स्वाध्याय** : मोक्षप्राप्तीचा उपदेश करणारे वेद वगैरे सत्य शास्त्रांचे अध्ययन व ओंकार वगैरे पवित्र मंत्रांचा जाप करणे.

**(५) ईश्वर प्रणिधान :** शरीर, धन, घर, भूमी, संपत्ती, शक्ती, बुद्धी सामर्थ्य इत्यादी संपूर्ण साधनांना ईश्वराचे मानून त्याच्या आज्ञेनुसार कर्म करावे व त्याच्या फळाची अपेक्षा करू नये. जीवनमुक्त योगी पुरुष शय्येवर, आसनावर, किंवा रस्त्यावरून जात असेल तर तो ईश्वर प्रणिधानाव्दारे स्वस्थ स्वरूपातच असतो. त्याचे संपूर्ण वितर्क, संशय, अज्ञान, हिंसा इत्यादी नष्ट होऊन योगी संसारातील बीज (अविद्या वगैरे क्लेश) आणि त्यांच्या संस्कारांचा नाश करून मोक्षानंद प्राप्तीचा अधिकारी बनतो.

## आसन

आसन परिभाषा : - उपमा व फळ

स्थिर सुखासनम्। - यो. द. २/४६

ज्या स्थितीत हालचाल न करता ईश्वराचे सुखपूर्वक ध्यान केले जाते त्याला आसन म्हणतात.

प्रयत्न शैथिल्यानन्तसमापत्तिभ्याम् - यो. द. २/४७

सर्व प्रयत्न हालचाली समाप्त करून अनन्त ईश्वरात ध्यान लावण्याने आसनाची सिद्धी होते. आसनसिद्धी शिवाय ध्यान लागत नाही. सर्वव्यापक परमेश्वर हालचाल करीत नाही कारण त्याला हालचाल करण्यास स्थान नाही व आवश्यकता नाही. जेव्हा व्यक्ती स्थिर वस्तूचे ध्यान करते तेव्हा ती तशीच बनते. ज्या गोष्टीला व्यक्ती पाहते, विचार करते तेव्हा ती तशीच बनते. आसन एकाच स्थानावर असावे व ते नरम असावे.

आसनामध्ये हालचाली रोखल्या पाहिजेत. अनन्त ईश्वराचे ध्यान केले पाहिजे. प्रभू सर्वत्र आहे हे आपण ऐकतो, जाणतो पण मानत नाही. आसनसिद्धीने तहान, भूक, सर्दी, गर्मी इत्यांदीचा त्रास होणार नाही. त्याचा परिणाम म्हणजे ध्यान लागेल. सहजतेने आसन सिद्ध झाल्यास चित्त अनन्त आकाश व अनन्त ध्येयामध्ये जाते तेव्हा योग्याला आपले शरीर सांभाळण्याचे ज्ञान राहात नाही.

ईश्वरप्राप्ती हे आपले उद्दिष्ट आहे, यासाठीच आपण या आसनावर बसलो आहोत हे लक्ष्यांत ठेवले पाहिजे. त्याबरोबरच ईश्वर समर्पित राहीन असा निश्चय केला पाहिजे. मन व वाणीने त्या परमेश्वराची प्रार्थना केली पाहिजे. "हे भगवान तू सत् चित् आनंद स्वरूप, निराकार आहेस. तुझीच उपासना करणे योग्य आहे" ईश्वर दुसरीकडे कुठे तरी आहे. असे न मानता त्याला सर्वव्यापक मानावे. साधक जेव्हा ध्यानामध्ये बसतो तेव्हा ईश्वराला बाहेर अन्यत्र किंवा शरीरात्त्या आत शोध घेण्याचा

प्रयत्न करतो. ही दोन्ही स्थाने चुकीची आहेत. 'मी' चे अस्तित्व जेथे असेल तेथे ईश्वर आहे हे जाणावे. तीच अनुभूती घेऊन ईश्वराला संबोधित करावे. 'मी क्लेश वासना युक्त असून तू यापासून वेगळा आहेस. (पुरुष विशेष) मी अल्पज्ञ, कर्म करण्यास स्वतंत्र पण फळ भोगण्यास परतंत्र आहे. तू सच्चिदानंद आहेस, तुझे नाव प्रणव आहे.'

## प्राणायाम

### प्राणायामाची व्याख्या

तस्मिन्सति श्वास प्रश्वासयोर्गति विच्छेद : प्राणायाम : । (यो.द. २/४९)

वरील आसन सिद्ध झाल्यानन्तर विधिपूर्वक, विचाराने,यथाशक्ती, श्वास प्रश्वासाची गती रोखण्याची जी क्रिया आहे त्याचे नाव प्राणायाम आहे.

बाह्याभ्यन्तर स्तम्भवृत्तिर्देशकालसंख्याभि : परिदृष्टो दीर्घसूक्ष्मः।

व

बाह्याभ्यन्तर विषयाक्षेपी चतुर्थ : । (यो.द. २/५०-५१)

हा प्राणायाम चार प्रकारचा असतो. बाह्य, आभ्यन्तर, स्तम्भवृत्ती व बाह्य आभ्यन्तर विषयाक्षेपी.

**लाभ :** ततः क्षीयते प्रकाशावरणम् (यो.द. २/५२)

प्राणायामाच्या अभ्यासाने प्रकाशा (ज्ञाना) ला झाकाळणारे आच्छादन नष्ट होते व 'धारणासुच योग्यता मनसः' (यो.द. २/५३) मस्तक, नासिका इत्यादी स्थानी मनाला रोखण्याने योग्यता वाढते. प्राणायाम करण्याने चित्ताची अशुद्धी नष्ट होते व मन एकाग्र होण्यास मदत होते. जसे सुवर्ण इत्यादी धातूंचा मल अग्नीत तापविल्यानंतर नष्ट होतो तसेच प्राणायामाने मन व इंद्रियांचा मल नष्ट होतो.

**प्राणायामाचे अनेक फायदे आहेत :**

(१) प्राणावर नियंत्रण स्थापित झाल्यामुळे मन स्वतः वशीभूत होते.
(२) आयुष्य वाढते.
(३) शारीरिक बल, वीर्य, पराक्रम वाढतात.
(४) शारीरिक, मानसिक उन्नती होते.
(५) वाईट विचार नष्ट होतात.
(६) रोग दूर होऊन शरीर स्वस्थ होते.

 

(७) चित्तातील मल दूर होऊन मुक्ती पर्यंत ज्ञान वाढत जाते.
(८) इंद्रियांवर वर्चस्व स्थापित होऊन मन एकाग्र होते.
(९) बुद्‌धी वाढते.
(१०) छातीच्या पेशी मजबूत होतात.
(११) अन्तः करणातील विषय भोगाची वासना नष्ट होते.
(१२) हित, अहित ओळखण्याची योग्यता वाढते.
(१३) भूक वाढते.
(१४) ब्रह्मचर्याचे पालन होते.
(१५) आळस दूर होऊन शरीर हलके, स्फूर्तिवान् होते.
(१६) चंचलता नष्ट होऊन शांतता व धार्मिक वृत्ती निर्माण होते.

## प्रत्याहार

स्वयविषयासं प्रयोगे चित्तस्वरूपानुकार इवेन्द्रियाणां प्रत्याहार
:॥ (यो.द. २/५४)

इंद्रियांचा आपल्या विषयांशी संबंध न राहिल्याने मन स्वरूपाकार होणे (थांबणे) याला प्रत्याहार म्हटले जाते. मनाच्या वृत्ती रोखण्याने नेत्र इत्यादी इंद्रियांचा आपापल्या विषयाशी संबंध राहात नाही अर्थात इंद्रिये शांत बनून आपले काम करणे बंद करतात याच स्थितीचे नाव प्रत्याहार आहे. प्रत्याहाराची सिद्‌धी होण्याने योगाभ्यासी व्यक्तीचे आपल्या इंद्रियांवर सर्वोत्कृष्ट नियंत्रण होते. व्यक्ती आपल्या मनाला ज्या स्थानी व ज्या विषयामध्ये केंद्रित करू इच्छिते तेथे लावू शकते व ज्या विषयातून दूर होऊ इच्छिते तेथून दूर होऊ शकते.

## धारणा ध्यान

योगाच्या आठ अंगामध्ये यम, नियम, आसन, प्राणायाम व प्रत्याहार योगाची बहिरंग साधने आहेत तर धारणा, ध्यान, समाधी ही योगाची अन्तरंग साधने आहेत.

**धारणेची परिभाषा :** देशबंधश्चित्तस्य धारणा ॥यो.द.३-१॥

मस्तक, नासिका, कंठ, नाभी, हृदय इत्यादी कोणत्याही एका स्थानी मनाला स्थिर करणे 'धारणा' होय. ईश्वरविषयक ज्ञान सतत विद्यमान ठेवणे मध्येच इतर कोणतेही विषय येऊ न देणे याला 'ध्यान' म्हणतात. ईश्वराची गवेषणा (शोध घेणे) ध्यान होय.

**ध्यानाची परिभाषा :** (१) तत्र प्रत्ययैकतानता ध्यानम् ॥ यो. द. ३/२ ॥

धारणेच्या स्थानी मनाला स्थिर करून ईश्वराचा शोध घेण्यात सतत मग्न असणे हे ध्यान होय.

(२) ध्यानं निर्विषयं मन : ॥ सांख्य ६/२५ ॥
सांसारिक विषय मनात न येणे व ईश्वराचे चिंतन करीत राहाणे म्हणजे ध्यान होय.

(३) रागोपहतिर्ध्यानम् ॥सांख्य ३/३०॥
सांसारिक विषया संबंधी मोह नष्ट होणे व ईश्वराचे चिंतन करीत राहाणे ध्यान होय.

प्रश्न : ध्यान कुणाचे होऊ शकत नाही ?

उत्तर : (१) ज्या वस्तूच्या स्वरूपाचे ज्ञान नसते त्याचे ध्यान होत नाही

(२) जे प्रत्यक्ष मूर्तिमान असते त्याचे ध्यान होत नाही कारण त्याचे ज्ञान प्राप्त झालेले आहे.

(३) विपरीत लक्षणाने अर्थात् मिथ्या ज्ञानाने ही वस्तूचे ध्यान होत नाही. ईश्वराचा जो गुण, कर्म, स्वभाव नाही तशा प्रकारचे ध्यान हे ध्यान नव्हे तर अध्यान आहे. त्यामुळे ईश्वर प्राप्त होऊ शकत नाही.

जी वस्तू जशी आहे त्याच रूपात मनामध्ये ठेवून त्याचा शोध घेतला जातो त्याचेच नाव 'ध्यान' आहे. ईश्वर जर निराकारच आहे तर त्याला साकार मानून लाखो जन्मापर्यंत शोध घेतला तरीही त्याचा साक्षात्कार होऊ शकत नाही. ईश्वराच्या वास्तविक स्वरूपाला न जाणून त्याला शरीरधारी अवतारांच्या रूपात मानून ध्यान करण्याने अत्यंत हानी झालेली आहे. लाखो, करोडो लोकं ईश्वर प्राप्तीपासून वंचित झालेले आहेत. असे लोक विविध प्रकारचे दु:ख भोगतात व भिन्न भिन्न स्वरूपात ईश्वराला मानून परस्पर कलह, संघर्ष करून तन, मन, धनाने नष्ट भ्रष्ट होतात. ईश्वराच्या वास्तविक स्वरूपाला न जाणणे हे दु:खाचे मुख्य कारण आहे.

**योगामध्ये ध्यानाचे स्थान :** योगात ध्यानाचे विशेष महत्त्व आहे. जर ध्यान करता आले नाही तर योगात सफलता प्राप्त होत नाही. ईश्वराचे गुण, कर्म, स्वभाव व नाव जाणून जप व अर्थभावनेचा विचार करून, समर्पित भावनेने ध्यान करणे हे ध्यानाचे खरे स्वरूप आहे.

वैदिक पध्दतीला सोडून ध्यानाच्या ज्या शेकडो कल्पना केल्या जातात त्याने ईश्वर प्राप्ती (साक्षात्कार) होत नाही. उपनिषदात ध्यानाची, जपाची पदधती -

प्रणवो धनुः शरो ह्यात्मा ब्रह्म तल्लक्ष्यमुच्यते ।
अप्रमत्तेन वेध्दव्यं शरवत्तन्मयो भवेत् (मुण्डक)

प्रणव धनुष्य, आत्मा बाण, ब्रह्म लक्ष्य आहे. ओ३म्‌रूपी धनुष्यावर, आत्मारूपी बाण चढवून परमात्मा हे जे लक्ष्य आहे. त्याचा वेध घेण्यात येईल तेव्हा आत्मा ईश्वरात बाणा प्रमाणे घुसेल. काही लोक प्रारंभीच विपरीत सिद्धान्त मानतात व नंतर वेद उपनिषदाची व्याख्या करतात. ओढून ताणून अर्थ लावतात. अशा चुकीच्या सिध्दांतानेच मानवी जीवन नष्ट होते आहे. जर जीवच नसेल तर ध्यान कोण करील ? ईश्वर जर ध्यानाचा विषय नसेल तर कुणाचे ध्यानं करावयाचे ? परंतु केवळ शब्द ज्ञान असून व्यक्ती त्याला क्रिया रूप देत नसेल तर मिथ्या अभिमान निर्माण होईल व तो ही 'अहं, ब्रह्मास्मि' मानणाऱ्या प्रमाणे कोराच राहील. व्यवहार व उपासना काळात आपले सगळे संबंध ईश्वराशी जोडले गेले पाहिजेत.

**ध्यानासाठी प्रसन्नता :** ध्यानासाठी प्रसन्नता आवश्यक आहे. खिन्नता, क्षोभ, राग, व्देष इत्यादी रहित मनच ध्याना मध्ये रमते. घरात एखादी वाईट घटना घडली की खिन्नता व क्षोभ निर्माण होतो. एखाद्या वेळी वाढप्याने भोजन व्यवस्थित वाढले नाही तर मनाला वाईट वाटते. म्हणून सावधान राहिले पाहिजे. विपरीत भावना जागृत झाल्यास मनाला खिन्न होऊ देऊ नये. शरीराला सामान्य त्रास असेल तरीही पुरूषार्थी साधक ध्यानात मन लावू शकेल. साधकाला नेहमी सावधान राहावे लागते. गंगोत्री व जमुनोत्रीच्या मार्गावर चालणाऱ्या ड्रॉयव्हर प्रमाणे दक्ष राहावे लागते. पापणीची उघडझाप होताच असावधान राहिल्यास एका क्षणात तो दरीत कोसळतो. सुशिक्षित लोकही जे प्रेमाने राहात नाहीत ते दुःखी असतात. मन खिन्न न होऊ देता संतुष्ट राहावे लागते. काही मिळो अथवा न मिळो एखादी व्यक्ती शांत असते. मित्राने जेवू न घातल्यास एखादी व्यक्ती दुःखी होते. भुकेचे दुःख व त्यात मित्राने जेवावयास का दिले नाही हे दुःख. अशी लहान सहान दुःखं व्यक्तीच्या मनात निर्माण होतात परंतु वृत्ती निरोधाने ही दुःखं दूर करता येतात.

चित्ताच्या प्रसन्नतेसाठी जेव्हा आपण व्यवहारात प्रवृत्त होतो तेव्हा या प्रकारचा व्यवहार ठेवावा. मैत्री करूणामुदितोपेक्षणां सुख दुःखपुण्या पुण्यविषयाणांभावनातश्चित्त प्रसादनम् ।(यो.द.१/३३)

सुखी (साधन संपन्न) व्यक्तींबरोबर मैत्री, दु:खी लोकांविषयी दया, पुण्यात्मा (धार्मिक, विव्दान, परोपकारी) लोकांना पाहून प्रसन्न होणे व पापी लोकांची उपेक्षा (ना राग न व्देष) असा व्यवहार केल्याने योगाभ्यासी व्यक्तीचे मन प्रसन्न होते व प्रसन्न मन स्थिर व एकाग्र होते.

**ध्यानासाठी स्थिती :** (आसन) आसनाच्या स्थितीत बसून ध्यान करावे. ब्रह्मोपासना आसनानेच शक्य आहे. शयनाने आळस व निद्रा येते उभे राहिल्यास थकवा येतो. चालताना चंचलता येते. जेथे एकान्त शांत स्थान असेल तेथे आसन लावावे. अचल राहण्याने ध्यान निष्पन्न होते. हालचालीमुळे मन चलायमान होते.

**ध्यानासाठी मनोनियंत्रण :** लौकिक व्यक्तीच्या विचारांवर नियंत्रण नसते पण योगाभ्यासी व्यक्तीने आपल्या मनावर नियंत्रण ठेवावे लागते. जसा कुशल सेनापती सतत निरीक्षण करतो व कोणत्याही शत्रूला आपल्या क्षेत्रात प्रवेश करू देत नाही. त्याचप्रमाणे योगाभ्यासींचे नेत्र त्यांच्या नियंत्रणात असतात. ते वाटेल ते पाहणार नाहीत. तर ईश्वरी आज्ञेच्या अनुकूलच पाहतात, विरूद्ध नव्हे. त्यांच्या दृष्टीत दोष नसतो ते प्रेमळपणा असतो जसा ईश्वर सर्व प्राण्यांना पाहतो, तसे योगाभ्यासी स्वत:प्रमाणेच इतरांशीही प्रेमाने व्यवहार करतात.

जेव्हा व्यक्ती ध्यान करू लागते तेव्हा तिची स्थिती अत्यंत उच्च असते. ती सामान्य व्यवहारापेक्षा वेगळी असते. ज्या व्यक्तीबद्दल व्देष वाटत असेल तिच्याबद्दल ध्यानावस्थेत प्रेम उत्पन्न होते. त्यावेळी तिच्याविषयीची ईर्ष्या समाप्त होते. आपले उद्दिष्ट दृढ करण्यासाठी अर्धा तास विचाराधीन व्हावे म्हणजे संशय मिटतील कारण संशयात्मक ज्ञान ईश्वराची भक्ती करू देत नाही.

जशी पृथ्वीची सत्ता वास्तविक आहे तशी ईश्वराचीही सत्ता आहे. प्रत्यक्ष, अनुमान किंवा शब्द प्रमाणाने विचार केल्यास निदिध्यासनाने खात्री पटेल. जशी भूमी अन्न वगैरे देते त्याचप्रमाणे ईश्वर आनंद, सुख देतो.

**ध्यानाची एक पध्दत :** ध्यानासाठी साधकाने दररोज एखाद्या निश्चित, शांत वेळी, नीरवस्थानी, शरीर शिथिल करून आरामाच्या सहज मुद्रेत सुखासनात बसावे. साधकाने तटस्थ होऊन चिंतन प्रवाह पाहावा. केवळ द्रष्टा बनून आत्मनिरीक्षण करून विश्लेषण, तुलना, मूल्यांकन इत्यादी करून पाहावे की विचार कुठून उत्पन्न होतात ? कोण उत्पन्न करते ? त्यावेळी हे जाणवते की जड मनात विचार स्वत: उत्पन्न होत नाहीत दुसरा कुणीतरी उत्पन्न करतो. उत्पन्न करणारा स्वत: निरीक्षण करू लागला

तर विचार उत्पन्न होणे बंद होईल. तटस्थ द्रष्टा राहून या प्रवाहाला पाहात राहावे पण स्वतः त्यात गुंतू नये अन्यथा मनात तणाव निर्माण होईल त्या सर्व इच्छा व भय आपणच निर्माण करतो व त्यामुळे नकळत दुःखी होतो. धैर्य ठेवावे तटस्थ द्रष्टा बनून अंतःकरणात गहन, अवगाहन करावे. वास्तविक जड मन सुध्दा निरंतर गतिमान असते परंतु आपल्याला ध्यानावस्थेत त्याचे विशेष ज्ञान होते व आपल्या निरीक्षणामुळे अचेतन मन नग्न दिसू लागते.

**ध्यानाची दुसरी पद्धत :** प्रणव 'ओम्' किंवा गायत्री मंत्र अर्थासहित सावकाश म्हणून जप करावा व स्वतः आपल्या मंत्रोच्चारणाचा ध्वनी ऐकावा आणि मानसिक जपाचा आरंभ करावा. नेत्र बंद करून आपला मानसिक जप ऐकण्याचा प्रयत्न करावा. साधकाने हा मानसिक जप करताना आत्मसमर्पण भावाने ओतप्रोत होऊन, भावपूर्ण रीतीने प्रार्थना केली पाहिजे. परमेश्वर, हृदयाची वाणी, आर्ततेने केलेली विनवणी अवश्य ऐकतो. वास्तविक जप किंवा ध्यान हे साधन आहे. परमेश्वराशी प्रत्यक्ष संबंध स्थापित करणे हे साध्य आहे. अशा प्रकारे ईश्वराशी संबंध जोडला जातो. प्रार्थना करताना उपासक भावविभोर होतो काही काळ त्याला आपले तन, मन, धन व बाह्य जगाचे भान राहात नाही त्यावेळी जपामध्ये खंड पडतो आणि साधक आनंदात लीन होतो.

**ध्यानस्थ स्थिती व लाभ :** ध्यानावस्थेत साधकाला जवळ चाललेल्या गोंधळ व गडबडी मुळे बाधा निर्माण होत नाही, तल्लीनतेमुळे व्यत्यय येत नाही. ध्यानाच्या अवस्थेत शरीर अत्यंत भारहीन, मन सूक्ष्म व श्वास प्रश्वास अलक्षित वाटू लागतात. दूर भासणारा ईश्वर जवळ वाटू लागतो..

**ध्यानाने दुःखाची निवृत्ती :** ध्यानाने मनावर नियंत्रण होते व काम, क्रोध, मोह इत्यादींनी होणारे दुःख स्पर्श करीत नाही. शारीरिक दुःख एका मर्यादेपर्यंत रोखता येते. ईश्वराचे ध्यान करण्याने शारीरिक दुःखाचा त्रास कमी जाणवेल, कमी होईल अथवा बिलकुल त्रास होणार नाही. व्यावहारिक जीवनात यम नियमांचे पालन करण्याने व दोन्ही वेळा संध्या करताना (ध्यान करताना) सफलता प्राप्त होते.

## समाधीच्या अनेक व्याख्या

(१) तदेवार्थमात्र निर्भासं स्वरूप शून्यमिव समाधि ! (यो. दर्शन ३/३)

ते ध्यान केवळ अर्थाचे स्वरूप प्रकाशित करणारे असून आपल्या स्वरूपाने

शून्या प्रमाणे असून त्याला समाधी असे म्हटले जाते.

यात वस्तू तत्त्व (ईश्वर) प्रमुख असते व व्यक्तीला स्वत:चा विसर पडतो. ज्या विषयात समाधी लागेल त्याच दर्शन होईल. ध्यान केवळ अप्रत्यक्षाचे होते, जी वस्तू प्रत्यक्ष दिसते तिचे ध्यान कशासाठी ?

साधकाने अभ्यास करीत चित्तावर असे नियंत्रण प्राप्त करावे की कल्याणासाठी एक लक्ष्य 'ओ३म्' जो सर्वरक्षक आहे, त्याच्यावरच स्थित राहावे. मध्येच कोणतीही वृत्ती निर्माण होता कामा नये. कोणताही दुसरा विचार, जसे मी शरीर आहे किंवा अन्य तत्त्व आहे इत्यादी वृत्ती उत्पन्न न करता स्थित राहावे. जसा विद्यार्थी धडा पाठ करताना इतर विषयांना थारा देत नाही तेव्हा असाच निर्धारित विषय ठेवल्याने व ईश्वरात स्थित होण्याने योग्याची असंप्रज्ञात समाधी लागते. व जेव्हा ईश्वराशिवाय अन्य प्राकृतिक पदार्थ किंवा जीव हा समाधीचा विषय असतो तेव्हा ती संप्रज्ञात समाधी समजली जाते.

(२) चित्तस्य (मनस:) ऐकाग्रयं समाधि : ।

अर्थात् चित्ताच्या एकाग्रतेलाच समाधी म्हणतात.

(३) मनस:(चित्तस्य:)ब्रह्मणि समाधानं स्थिरीकरणं वा समाधि:।

अर्थात् मनाला ईश्वरात स्थिर करणे हीच समाधी होय.

(४) तदनारम्भ आत्मस्थे मनसि शरीरस्य दु:खाभाव:स योग :।

(वै.दर्शन ५/२/१६)

जेव्हा मनुष्य आपल्या मनाला संपूर्ण सांसारिक विषयांपासून दूर करून आपल्या आत्म्याला परमात्म्यामध्ये स्थिर करतो तेव्हा तो संपूर्ण शारिरिक व मानसिक दु:खांपासून निवृत्त होतो यालाच योग (समाधी) असे म्हणतात.

(५) तन्निवृत्तावु पशान्तो पराग :- स्वस्थ: (सांख्य २/३४)

वृत्ती नष्ट झाल्या तर इंद्रियावरील विषयांचा प्रभाव कमी झाल्यामुळे राग शांत होतो व अशी व्यक्ती आपल्या आत्म्यात स्थित होते यालाच समाधी (योग) म्हणतात.

जेव्हा व्यक्ती मनात कोणत्या ना कोणत्या भौतिक पदार्थांची अनुभूती (भोग) करीत असेल तेव्हा ती व्युत्थान अवस्था असते. ध्यानाने, समाधीने, एकान्त उपासनेने ईश्वर प्रणिधान करून किंवा ब्रह्माचा अत्यंत विचार करून जेव्हा मन केवळ ब्रह्मामध्ये मग्न असेल तेव्हा बाह्य जगापासून ती अलिप्त असते. बाह्य दृश्यजगाकडे तिचे लक्ष नसते.

समाधीच्या प्रारंभिक काळात ज्ञाता, ज्ञेय व ज्ञान याचा भेद नसतो. ही अवस्था इतरांना वाणीने पूर्ण सांगता येत नाही, अनुभवलीच जाऊ शकते शांत, सम बुद्धीचा माणूस परमेश्वरा प्रमाणे आनंदमय असतो व्यवहारातही त्याला लोकाचे भय वाटत नाही किंवा त्याच्याकडून इतरांवर अन्याय होत नाही जो हर्ष, खेद, भय, विषाद, सुख, दुःख इत्यादी बंधनांपासून मुक्त आहे व सदैव आपल्या स्वतःतच संतुष्ट आहे, त्रिगुणांमुळे ज्याचे अन्तः करण चंचल होत नाही, स्तुती निंदा, मान व अपमान ज्याला समान वाटतात तसेच प्राणीमात्राच्या अन्तःकरणातील आत्म्याची एकता, समानता यांची पारख करून समबुद्धीने आसक्ती सोडून धैर्य व उत्साह यांनी कर्तव्य कर्म करतो तो स्थितप्रज्ञच समाधी अवस्था प्राप्त करतो.

मनाचा निग्रह करून व योगाभ्यासाने प्राचीन ऋषींना अशी अवस्था (जीवन मुक्तावस्था) सहज प्राप्त होत होती परंतु आज लाखो माणसांपैकी एखादाच यासाठी प्रयत्न करतो व प्रयत्न करणाऱ्यांमधून एखाद्यालाच अनेक जन्मानंतर मोक्ष प्राप्ती होते.

**समाधीचे स्वरूप :** ध्यानावस्थेत पुढे समाधी लागते जसे एखादा सुतार लाकूड कापत कापत त्याला खुर्चीचा आकार देतो. तसेच ध्यान करीत करीत त्याचे समाधीमध्ये परिवर्तन होते. ध्यान करणारा ज्या वस्तूचा शोध घेत असतो ती प्रकाशित होऊन शोधक शून्यासारखा दिसतो. येथे दिसणे म्हणजे अनुभूती होय. त्यासाठी साकार वस्तू असणे आवश्यक नाही. जसा अग्नीडोळयांनी दिसतो, इतर पदार्थ वेगवेगळया इंद्रियांनी दिसतात ज्ञात होतात त्याच प्रमाणे आत्म्यालाही परमेश्वराची अनुभूती होते.

समाधीमध्ये एक विचित्र दशा निर्माण होते.
प्रज्ञा प्रसाद मारूह्य अशोच्यः शोचतो जनान् ।
भूमिष्ठानिव शैलस्थः सर्वान्प्राज्ञोऽ नुपश्यति ॥

जसा पर्वतावर राहणारा भूमीवर राहणाऱ्याला पाहतो तसेच पुरूषार्थाने विवेक, वैराग्य प्राप्त करून उच्च स्थिती प्राप्त झालेला योगी खाली असणाऱ्या लौकिक जनांना क्लेशांनी पीडित अत्यंत दुःखी स्वरूपात पाहतो.

ही स्थिती सम्प्रज्ञात समाधीस्थ योग्याची असते. असंप्रज्ञात समाधीमध्ये ईश्वराचा साक्षात्कार होतो तेव्हा संपूर्ण संसार ईश्वरामध्ये बुडालेला दिसतो. जसा कच्च्या मातीचा गोळा समुद्रात बुडतो. योगाभ्यासीची स्थिती जलमग्न कापसाप्रमाणे होते. अर्थात् ज्यात आत बाहेर जलच जल पसरलेले असते.

समाधी लावल्यावर व्यक्ती मुक्त आकाशात विहार केल्यासारखा अनुभव घेते

व समाधी जेव्हा भंग पावत तेव्हा भूमीवर लौकिक जगात आल्याचा अनुभव घेते. लौकिक व्यक्तीला ही स्थिती महाभयंकर वाटते कारण तिला स्वत: खेरीज काही दिसत नाही. ही स्थिती प्रलयावस्थेप्रमाणे असते. पण योगी ही स्थिती सोडू इच्छित नाही या अवस्थेमध्ये शुद्ध ज्ञान विज्ञान होते इतर वेळी असे होत नाही.

**समाधी प्राप्तीचा विधी :** जो सृष्टिरचना जाणून घेतो. पुरुष व प्रकृतीला विवेक, वैराग्य, अभ्यासाने जाणून घेतो त्याची समाधी लवकर लागते. जो ईश्वर, जीव, प्रकृती या तिन्हींभा आपल्या ज्ञानाने विशुद्ध रूपात पाहतो, तेव्हाच त्याला समाधी प्राप्त होऊ शकते अन्यथा नाही.

मन अचेतन आहे कारण ते जड तत्त्वांनी (सत्व, रज, तम) बनलेले आहे. जी जी वस्तू या तीन जड तत्त्वांनी बनते ती अचेतनच असते जशी पृथ्वी.

मनाच्या (५) अवस्था आहेत (१) क्षिप्त (२) मूढ (३) विक्षिप्त (४) एकाग्र (५) निरूद्ध. माणसांनी या अवस्थांना व्यवस्थित जाणले पाहिजे नसता त्याच्यात दोष आहेत असे समजावे.

अभ्यास करणाऱ्याने अष्टांग योगाचा अभ्यास करता करता उन्नत व्हावे. योगात कितपत गती निर्माण झालेली आहे, कोणकोणत्या अनुभूती प्राप्त झालेल्या आहेत याचे सतत निरीक्षण करावे. समाधी लागल्याचे कसे समजेल ? ऋषी सारखा अनुभव प्राप्त झाला काय ? जर त्याप्रमाणे अनुभूती नसेल तर समजावे की समाधी लागली नाही. जर एखादी व्यक्ती म्हणेल की समाधीमध्ये मला ईश्वर, जीवात्मा एक दिसले ते चुकीचे आहे कारण ते एक नाहीत, जर पुत्रैषणा, वित्तैषणा व लौकेषणा या तीन पैकी एकानेही ईश्वरैषणेला मागे सारले तर समजा समाधी लागली नाही.

जेव्हा नित्य अनित्याचा विवेक होतो तेव्हा या जगाचा स्वामी व सर्वात प्रिय वस्तू ईश्वरच मानला जाईल. जेव्हा स्वस्वामी संबंधातून सुटका होते तेव्हा ईश्वराचा पूर्ण रूपाने स्वीकार केला जातो. मी माझे काही राहात नाही. इहलोक हा प्रलयाप्रमाणे वाटू लागतो. व्यक्तीला ईश्वरच सर्व काही वाटू लागते अर्थात् जेव्हा समाधी प्राप्त होते तेव्हां ईश्वरासंबंधी अत्यंत प्रेम वाटते. प्रारंभी नेत्र बंद करून व्यक्ती कार्य करते. पुन्हा अभ्यासाने बोलताना, चालताना, व्यवहार करताना डोळे उघडे ठेवूनही समाधीची अवस्था बिघडत नाही ती खाते, पिते परंतु स्वाद (सुख) घेत नाही.

हा विधी शिकताना खूप काळ लागतो.

**समाधीने प्रभावित शरीर :** या समाधी अवस्थेचा शरीरावर खालील प्रमाणे परिणाम होतो.

(१) मेंदूवर दाब पडतो, जशी एखादी वस्तू चिकटवलेली आहे

(२) शारीरिक कष्टामुळे विशिष्ट मर्यादे पर्यंतदु:ख होणार नाही पण भयंकर वेदना घाव इत्यादी दु:खांना रोखता येणार नाही.

(३) सर्दी गर्मीचा त्रास होणार नाही.

(४) तहान भुकेचा योग्याला तेवढा त्रास होणार नाही.

समाधीचा शरीरावर मर्यादित प्रभाव होतो, शरीर अपंग झाले किंवा मृत झाले तर समाधी लागत नाही. कारण शरीराविना समाधी लागणार नाही. संभाव्य गोष्टीं बरोबर असंभाव्य गोष्टी जोडण्याने योगाच्या संभाव्य गोष्टी ही खोटया, थापा असे समजण्यात येऊ लागले आहे.

**मनावर प्रभाव :** काम, क्रोध, लोभ, मोह, अज्ञान, विपरीत संस्कार इत्यादींवर स्पष्ट प्रभाव पडतो ते विकार दग्धबीज होतात. विचारांवर पूर्ण नियंत्रण होते.

## समाधी अवस्थेतील अनुभूती

तस्य सप्तधा प्रान्तभूमि : प्रज्ञा (यो.द.२/२७)

समाधी प्राप्त झाल्यानंतर योग्याला सात प्रकारच्या अनुभूती होतात.

(१) जे दु:ख दूर करावयाचे आहे त्याला पूर्णपणे जाणले आहे, अधिक जाणणे शिल्लक राहिलेले नाही. संसार दु:खरूप वाटतो. संसारात रमणे आवडत नाही.

'तत्परं पुरुषख्यातेगुणवैतृष्णम्' (यो.द.१/१६) योग्याची सत्त्व, रज, तम या तीन गुणांची इच्छा कमी होते ही पर वैराग्याची अवस्था होय. भौतिकवादी मानोत अथवा न मानोत हे प्रत्यक्ष सिद्ध झालेले आहे.

(२) अविद्या वगैरे दु:खाचे कारण क्षीण केले जाते आणखी क्षीण करणे शिल्लक राहिलेले नाही दु:ख तर दु:खच असते ज्वर आला, सुऱ्याने मारले इत्यादी दु:खा शिवाय इतर सांसारिक सुखातही दु:ख मिश्रित असते.

"परिणाम तापसंस्कार दु:खैर्गुणवृत्ति- विरोधाच्च दु:खमेव सर्वं विवेकिन."(यो.द.२/१५)

हे अभ्यासाने हळूहळू जाणता येते. नंतर बुद्धीने तिचा स्वीकार केला जातो.

योग्याला सांसारिक सुखातही दु:ख दिसू लागते. पाच इंद्रियांच्या भोगातही दु:ख मिश्रित सुख आहे त्याला योगी जाणतो. प्रकृतीमध्ये सुख आहे पण ते दु:ख मिश्रित आहे.

(३) असंप्रज्ञात समाधीने मोक्षसुखाचा अनुभव घेतला हे समजल्यावरही मोक्षाचे उपाय, श्रवण, मनन, स्वाध्याय इत्यादी तो सोडत नाही.

(४) मोक्षाच्या उपायरूपी 'विवेकख्याती' ला सिध्द केलेले आहे.

(५) बुद्धीचे दोन प्रयोजन भोग व अपवर्ग हे सिद्ध झालेले आहे. बुद्धीची जेवढी धडपड होती तेवढी पूर्ण झालेली आहे.

(६) सत्त्वगुणामुळे पुढील जन्म मिळणार नाही.

(७) मोक्षावस्थेमध्ये जीवात्म्याच्या दु:खाचे कारणरूप सत्त्व इत्यादी गुणांचा संबंध सुटून जातो.

सामान्य माणूस शरीर इंद्रिये यांच्यामध्ये स्वत: मिसळून गेलेला असतो समाधी प्राप्त झालेला योगी (आपल्या आत्म्याला) स्पष्टपणे वेगळा पाहतो. स्वत: प्रकृती विकृतीपासून भिन्न आहे हे जाणतो. केवळ आपल्यालाच नव्हे तर आपल्या अन्त:करणात ओतप्रोत असलेल्या ईश्वराला ही जाणतो.

समाधी संबंधी वरील बाबी भास नव्हेत, मुद्दाम सांगितलेल्या, काल्पनिक किंवा मनमानेल अशा नाहीत. हे सर्व प्रमाणांनी सिद्ध झालेले आहे. शंका कुशंका व्यर्थ आहेत. जो परिश्रम करील त्याचा निश्चय होईल. जर दोन गोष्टी खऱ्या ठरल्या तर पुढे प्रयोगाने इतर दहा गोष्टींचा प्रत्यय येईल. सत्य अहिंसेचे पालन करण्याने बुद्धीचा विकास होतो. प्रयोग करावा वैररहित व्हावे व विचार करावा. बुद्धीचा अद्भुत विकास होईल.

वृत्तींचा निरोध होण्याने मेंदूवर दाब पडतो. वृत्तींना पूर्ण रोखणे दीर्घकालीन अभ्यासाने साध्य होते. शरीरावर प्रभाव पडतो. लहान सहान दु:ख त्रस्त करीत नाही. बौध्दिक स्तरावर आकाशात स्वतंत्र विचरणाचीच अवस्था आहे, अशी अनुभूती होईल. वृत्तींचा निरोध होण्यासाठी स्वत:ला विसरावे लागते. नाम-नामी, भोग-भोक्ता राहात नाही वृत्तींचा निरोध होण्यास आरंभ होतो त्यावेळी आश्चर्य निर्माण होते. हे आपल्याला करणे शक्य आहे. आपल्या हातात आहे. तरीही आपण काही करीत नाही किंवा अगदी थोडे करतो. कुत्रे, घोडे, गाढव यांच्याजवळ साधने नाहीत. आपल्याजवळ साधने असूनही

आपण काही करीत नाही.

ही ऋषींची परंपरा लुप्त झालेली आहे ऋषी दयानंद यांनी ती प्रकट केली नंतर आर्य समाजाने धर्म व देश यांची सुधारणा व स्वतंत्रता यासाठी खूप प्रयत्न केले परंतु योग व ईश्वराची गवेषणा यावर शुद्ध सिद्धांत असूनही प्रयत्न केले गेले नाहीत. इतरांचे तर सिद्धान्तच चुकीचे आहेत.

या योगविज्ञानाला पुनः प्रचलित करण्यासाठी या गोष्टींना क्रियारूप देणे, ईश्वराला शोधणे आवश्यक आहे. बाधांना दूर सारून व साधनयुक्त बनून हे प्रमाणित करणे आवश्यक आहे की ईश्वराचे अस्तित्व आहे व त्याला जाणता येते. वेदातील रहस्य जाणावे म्हणजे हे सिद्ध होऊ शकेल. साधक जशी प्रलयावस्था संपादन करतो तेव्हा समाधीचा आरंभ होतो ही स्थिती पुरूषार्थाने वाढत वाढत जाते तेव्हा ईश्वर त्याचे ज्ञान देतो कृपा करतो, आनंद देतो आणि क्लेशांची समाप्ती होते. तो स्वतः म्हणजे जीवात्मा संसार समाप्त झाल्याची भावना अनुभवतो 'मी कुणी तरी आहे' अशी भावना नष्ट होते. 'अहम्' नष्ट होतो केवळ ईश्वर ही भावना निर्माण होते या अवस्थेची प्राप्ती होण्यासाठी ईश्वर, जीव, प्रकृती हा त्रैतवादी सिद्धान्त कामी येतो.

व्यक्तीला जेव्हा दुरित (वाईट) आवडते तेव्हा ती विपरीत गोष्टी सोडत नाही त्यामुळे सर्व समजूनही समाधीमध्ये सफलता प्राप्त होत नाही.

प्रलय अवस्था संपादनाच्या प्रयोगाने ताबडतोब समाधी प्राप्त होते. जी गोष्ट उत्पन्न होते ती नष्ट ही होते याचे ज्ञानपूर्वक संपादन करावे. पृथ्वी, जल, अग्नी, वायू, आकाश या पंचमहाभूतां पासून सर्व पदार्थ बनतात. भौतिक दृष्टीने सूर्य जीवनाचा आधार आहे. जवळ जवळ दोन अब्ज वर्षांनी सूर्याची उष्णता कमी होईल तेव्हा (सूर्य) आधाराशिवाय आधेय (सर्व पदार्थ) नाश पावतील. क्रमशः हळूहळू विनाश होईल. नीरव शांतता, अंध:कार होऊन काहीही शिल्लक राहणार नाही. जेव्हा विवेकाने योगी हे जाणतो तेव्हा वृत्तिरहित होऊन समाधी लागते.

## ईश्वर साक्षात्काराचे वर्णन वेदानुकूल

(१) वेदाहमेतंपुरुषं महान्तमादित्यवर्णं तमसः परस्तात् ।
तमेव विदित्वाति मृत्युमेति नान्यः पन्था विद्येतऽ यनाय
(य.जु.३१-१८)

(२) अनित्यैर्द्रव्ये : प्राप्तवानस्मि नित्यम् ॥ कठो. २/१० ॥

अनित्य द्रव्यांच्या साहयाने मी नित्य ब्रह्म प्राप्त केलेला आहे.

(३) तान्होवाचैताव देवाहमे तत्परं ब्रह्म वेद नातः परमस्तीति

(प्रश्नोपनिषद ६/७)

पिप्पलाद ऋषी शिष्यांना म्हणतात ,

'या परब्रह्माला मी इतकेच जाणतो की याच्या पलीकडे दुसरा कोणी ब्रह्म नाही'

(४) राजा जनकाच्या सभेत ऋषी याज्ञवल्क्याचा उद्‌घोष होता की मी ब्रह्माला जाणतो.त्यामुळेच त्यांना जनकराजाने पुरस्कृत केलेले होते. (बृहदा. ३५)

(५) पुण्डरीकं नवव्दारं त्रिभिगुणेभिरावृत्तम् ।

तस्मिन् यद् यक्षमात्मन्वत् तद् वै ब्रह्मविदोविदु : ॥ (अथर्व १०-८-४३)

**शब्दार्थ** :- (नवव्दारम्) मानवी शरीराच्या वरचे सात व्दार व खालचे दोन व्दार असे नवव्दाराचे (पुण्डरीकम्) कमल म्हणजेच पुण्याचे साधन हे शरीर (तस्मिन्) त्या शरीरात (त्रिभिः) सत्त्व, रज, तम (गुणेभिः) गुणांनी (आवृत्तम्) झाकलेला आहे (आत्मन्वत्) जीवात्म्याचा स्वामी (यत्) जो (यक्षम्) पूज्य (ब्रह्म) आहे (तत्) त्याला (वै) च(ब्रह्मविदः) ब्रह्मज्ञानी (विदुः) जाणतात.

उपनिषदातून मिथ्या अर्थ काढून तसाच, प्रचार केला गेला 'मला ईश्वराचा साक्षात्कार झालेला आहे' असे म्हणणाऱ्या व्यक्तीने ईश्वराला जाणले नाही. 'मला ईश्वराचा साक्षात्कार झालेला नाही' असें म्हणणाऱ्या व्यक्तीने ईश्वराला जाणलेले आहे.

दुसरी एक गोष्ट जाणण्या योग्य आहे की जीवात्म्याची (स्व) ओळख झाल्यास ईश्वर साक्षात्कार सुलभतेने होतो. 'आपण आहोत' आपले अस्तित्व आहे 'मी आहे' असा विचार म्हणजेच आत्मा शरीरापासून वेगळा आहे, ज्यात गंध, स्पर्श काही नाही. या प्रमाणे 'मी विचार करतो, खातो, अमूक असावे, तमूक नसावे, मी जाणतो, मी जाणत नाही' या सर्व गोष्टीमुळे आत्म्याचे अस्तित्व जाणवते. हा व्यवहार जीवात्म्याचे अस्तित्व सिध्द करतो. या प्रमाणे आपल्या स्वरूपाचा निश्चय झाला की एक सत्तात्मक ज्ञानवान

 

पदार्थ आहे तो शरीरात राहून सर्व कामे करतो. जर जीवात्मा नसता तर या रचनात्मक जगाचे मूल्य शून्य झाले असते. मनुष्येतर प्राणी चिमण्या, कबूतरे इत्यादी अंडी देतात, घरटी बांधतात, दाणे टिपतात हा सर्व व्यवहार त्या चेतन आत्म्यामुळेच करतात जर आत्मा नसेल तर स्वप्नामध्ये स्वप्न कोण पाहतो ? तो जीवच होय. जर आपण चेतन पदार्थ आहोत ज्यात रूप, रस, गंध, स्पर्श नाही तर ईश्वरही असा निराकार पदार्थ का होऊ शकत नाही ?

हे सर्व जग आत बाहेर ईश्वर युक्त आहे. एक कणही रिकामा नाही पण व्यक्तीला उगीचच वाटते की ईश्वर निश्चित लांबी रूंदी असणारा असता तर बरे झाले असते ! 'अल्पज्ञ जीव संपूर्ण ईश्वराला जाणून घेईल'. 'मी अनन्त ईश्वराला जाणू शकणार नाही'. 'माझे ज्ञान अल्प आहे' इत्यादी प्रश्नांची उकल या प्रकारे करता येईल की ईश्वराचे गुण अनन्त आहेत, ते सर्व जाणण्याने ईश्वराला मानता येते, असा विचार आवश्यक नाही. आपले आत्मस्वरूप प्रथम जाणावे नंतर परमेश्वराला जाणावे.

ईश्वराचे दर्शन झाल्यावर कोणत्या अनुभूती होतात ? जशी हवा वाहते, त्वचा इंद्रियांना स्पर्श करते, धक्का देते हे गुण व गुणी एक आहेत हे समजाविण्यासाठी गुण व गुणी यांना वेगवेगळे म्हटले जाते. ज्याप्रमाणे थंडपणा व तरलता हे पाण्याचे गुण आहेत. पाण्यापेक्षा वेगळे नाहीत त्याच प्रमाणे सत् , चित्, आनंद, ज्ञान इत्यादी गुण ईश्वरापासून वेगळे नाहीत. या गुणांनी ईश्वराचा साक्षात्कार होतो. या गुणांशिवाय ईश्वराला जाणता येत नाही परंतु केवळ ईश्वरानंदही शरीराची उदरपूर्ती करू शकत नाही. शारीरिक दुःखाचे एका मर्यादेपर्यंतच निवारण होऊ शकते. थोडे दुःख असेल तर अनुभव न होणे, अनुभव झाल्यास रोखणे, अति होण्याने न रोखता येणे इत्यादी. शरीराविना समाधी लागत नाही. मानसिक क्लेशरूपी शत्रूंना तर समाधीच्या माध्यमाने उखडता येते. समाधी अवस्थेत सर्व संसार ईश्वरामध्ये बुडालेला दिसून येतो. तिन्ही काळातील व्यवहार समाप्त होतो.

## खऱ्या योग्याचे लक्षण

(१) जो संपूर्ण दिवसभर ईश्वराशी संबंध जोडतो.

(२) संपूर्ण संसाराचा (आपले शरीर, मन, बुद्धी इत्यादी सहित) निर्माता, पालक, रक्षक, ईश्वराला मानतो.

(३) वेद व वेदानुकूल ऋषिकृत ग्रंथांवर अत्यंत श्रद्धा ठेवतो.

(४) ईश्वर, जीव, प्रकृती (त्रैतवाद) यांच्या स्वरूपाला यथार्थपणे जाणतो.

(५) सांसारिक विषयभोगात चार प्रकारच्या दुःखाचा अनुभव करतो.

(६) विषयभोगात सुख घेत नाही व आपल्या मन, इंद्रियांवर त्याचा पूर्ण अधिकार असतो.

(७) ईश्वर प्रदत्त साधनांचा ईश्वरी आज्ञेच्या अनुकूल (धर्मपूर्वक) साधनाच्या रूपात योग्य प्रमाणात उपयोग करतो.

(८) फळाची आशा न धरता (तीन एषणा सहित) निष्काम भावनेने कर्म करतो.

(९) कामनापूर्ती न होणे, वियोग, अपमान, विश्वासघात, असफलता, संधी हुकणे इत्यादी स्थितीमध्ये चिन्तित, भयभीत, क्षोभयुक्त दुःखी होत नाही.

(१०) सर्व संसार ईश्वरमय आहे, असे मानतो.

(११) दैनिक क्रिया व्यवहारामध्ये (विचार करणे, बोलणे, घेणे, देणे, समजणे, समजाविणे इत्यादीमध्ये) अत्यंत सावध असतो.

(१२) जो अविद्येने (अनित्यशुची इत्यादी) रहित असतो व विद्येने युक्त असतो.

(१३) जो संपूर्ण अविद्याजनित संस्कारांना दाबून टाकण्यात समर्थ असतो.

(१४) यमाचे पालन सार्वभौम महाव्रत समजून करतो अर्थात् त्यासाठी मृत्यू आला तरी चालेल.

(१५) जो नेहमी प्रसन्न, संतुष्ट, निर्भय,उत्साही, पुरूषार्थी, आशावादी असतो.

(१६) शरीर, बल, विद्या इत्यादींचा एषणांसाठी प्रदर्शन करीत नाही.

(१७) एखाद्याने सांगितल्यास असत्याचा त्याग व सत्याचे ग्रहण ताबडतोब करतो.

(१८) धन, बल, कीर्ती इत्यादी प्राप्तीच्या प्रलोभनाने आदर्शांचा त्याग किंवा त्यांच्या बरोबर तडजोड कधीही करीत नाही.

(१९) शुद्ध ज्ञान, शुद्ध कर्म व शुद्ध उपासना या तिन्हींचे समायोजन करून चालतो.

(२०) गंभीर, मौन, एकान्तसेवन करणारा, संयमी तपस्वी असतो (विशेषतः प्रारंभिक काळामध्ये)

(२१) देश, जात, प्रांत, भाषा, मत, पन्थ, रूप, रंग, लिंग इत्यादी भेदभावांनी रहित सर्वांबरोबर प्रेमाने वागणारा, सर्वांचा हितचिंतक, दयाळू, कल्याण करणारा असतो.

(२२) योगदर्शन, उपनिषद किंवा इतर आध्यात्मिक ग्रंथात आलेल्या सत्य सिध्दातांना योग्य प्रकारे समजून त्याप्रमाणे आचरण करणारा असतो.

 

# ज्ञान कर्म उपासना

ज्ञान - कर्म - उपासना
विवेक - वैराग्य - अभ्यास
जाणणे - करणे - लांभ घेणे
विधी - उपाय - लक्ष्य

ज्ञान-कर्म-उपासना या मध्ये संपूर्ण मानवी जीवन येते. मानवाचे अंतिम ध्येय सर्व दु:खांपासून सुटका करून घेऊन परमानंद मुक्ती सुख प्राप्त करणे होय. आज काल अनेक मतावलंबी कुणी ज्ञान, कुणी कर्म तर कुणी भक्तीचे एकांगी मत प्रस्थापित करतात. परंतु मानवी जीवनाच्या पूर्णतेसाठी, सफलतेसाठी तिन्ही उपाय आवश्यक आहेत.

**शुद्ध ज्ञान - शुद्ध कर्म - शुद्ध उपासना**

**ज्ञान :** कोणत्याही वस्तूचे गुण कर्म स्वभाव यथार्थपणे तात्त्विक रूपाने जाणणे ज्ञान होय. वस्तूला योग्य रूपात जाणणेच 'ज्ञान' होय. वस्तूला योग्य जाणूनच हा निर्णय घेता येतो की वाईटाचा त्याग व उत्तमाचा स्वीकार करणे योग्य आहे म्हणजेच वस्तूचे यथार्थज्ञान हा विवेक होय.

**कर्म :** मनाने, वाणीने, शरीराने एखाद्या गोष्टीचा त्याग करणे किंवा स्वीकार करणे म्हणजेच कर्म होय. चांगल्याचा स्वीकार, असत्य, अन्याय, अधर्म, अहितकारी गोष्टींचा त्याग करणे हे कर्म (वैराग्य) आहे. वाईटाचा त्याग व चांगल्याचा स्वीकार, सोडणे व धरणे या दोन्ही गोष्टी वैराग्यामध्ये येतात.

**उपासना :** प्रथम वस्तूला जाणणे, पुन्हा प्राप्तीचा प्रयत्न करणे, प्राप्त झाल्यावर त्याचा उपयोग करणे हीच उपासना होय. धरलेल्याला (चांगली गोष्ट) धरून ठेवणे व सोडलेल्याला (वाईट गोष्ट) सोडून देणे हाच अभ्यास होय.

उपासना करण्याचा प्रयत्न म्हणजे ध्यान, संध्या इत्यादी आहेत पण जेव्हा समाधीव्दारे ईश्वरात मग्न होऊन ज्ञान, शांती, आनंद बल प्राप्त होतात ती उपासना आहे हे जाणावे, ती करावी व लाभ घ्यावा. उपासनेने, अभ्यासाने परिपक्वता व दृढता येते.

मानव निर्मितीचा मूळ आधार शुद्ध ज्ञान, शुद्ध कर्म, शुद्ध उपासना आहे. कर्माचे क्षेत्र वाढत वाढत जाऊन उच्च निष्काम कर्माच्या प्रकारात मोडते. हे अत्यंत

 

परिश्रम साध्य आहे. अत्यंत तीव्र इच्छा, योग्यता, तप, त्याग व पुरुषार्थाने अत्यंत कठीण काम ही सहज साध्य होते. तीव्र इच्छा करणारा माणूस ईश्वर प्राप्ती करण्यात सफल होतो. परंतु योग्यता कमी असेल तर कमी प्रगती होईल. जेव्हा ज्ञान कर्म उपासना या तिन्हींचा समन्वय होतो तेव्हा तो योगी बनतो व तेव्हाच ईश्वर प्राप्ती होते.

## ज्ञान (विवेक)

ज्ञान : ईश्वरापासून पृथ्वीपर्यंत पदार्थांचे सत्य विज्ञान जाणून त्यांचा यथायोग्य उपयोग करुन घेणे याचेच नाव ज्ञान (विद्या) आहे. शुद्ध तात्त्विक ज्ञानाशिवाय शुद्ध कर्म घडत नाही व शुद्‌ध कर्मा शिवाय शुद्‌ध उपासना होत नाही. विपरीत ज्ञान, विपरीत कर्म, विपरीत उपासनेने मानव दुःखसागरात बुडतो.

## ज्ञानाचे प्रकार

ज्ञान चार प्रकारचे असते. व्यक्तीचे ज्ञान बदलत असते.
अभावात्मक - संशयात्मक - भ्रमात्मक - निर्णयात्मक

**(१) अभावात्मक :** एखाद्या सत्तात्मक वस्तूचे ज्ञान न होणे, सत्तात्मक वस्तू अस्तित्त्वात असतानाही त्यावर विश्वास न करणे, त्याच्या अस्तित्त्वाचे ज्ञान न होणे. जसे साम्यवादी नास्तिकांचे ईश्वराच्या अस्तित्त्वाबाबत अभावात्मक ज्ञान आहे.

**(२) संशयात्मक :** एका वस्तूबद्दल दोन प्रकारचे विपरीत ज्ञान बाळगणे, जसे ईश्वर निराकार आहे किंवा साकार आहे ? जन्म घेतो किंवा नाही ? न्यायी व दयाळू आहे किंवा नाहीं ?

**(३) भ्रमात्मक :** वस्तूच्या गुण, कर्म, स्वभावापेक्षा विपरीत ज्ञान असणे किंवा मानणे जसे ईश्वर चौथे आकाश, गोलोक, परमधाम इत्यादीमध्ये असतो असे मानणे.

**(४) निर्णयात्मक :** जो पदार्थ जसा आहे त्याला तसेच मानणे, यथार्थरूपाने जाणणे, मानणे, कृती करणे ही निश्चयात्मक ज्ञानाची अवस्था आहे. निर्णयात्मक ज्ञानाशिवाय वस्तूचा पूर्ण लाभ घेता येत नाही.

ज्ञानाच्या या चार अवस्थेमध्ये परिवर्तन ही होते. प्रत्येक वस्तूबाबत निर्णयात्मक ज्ञान असले पाहिजे. जर निर्णयात्मक ज्ञान असेल तर कृती करण्यात मनुष्य सफल होऊ शकतो. ज्याचे ज्ञान योग्य, त्याचे कर्म योग्य, ज्याचे कर्म योग्य त्याची उपासना योग्य होईल.

 

उपासना योग्य असेल तर त्याची समाधी योग्य तऱ्हेने लागेल व ईश्वराचा साक्षात्कार होईल. ईश्वर साक्षात्काराने ईश्वराचे बल, ज्ञान, आनंद यांची प्राप्ती होईल व दु:खापासून पूर्ण सुटका होईल.

एका वेळी एकाच प्रकारचे ज्ञान होते. परिपक्व अवस्था होईपर्यंत माणसाचे ज्ञान बदलत असते. मिथ्या ज्ञानाने अन्याय, अधर्म, अविद्या, दु:ख किंवा अशांती कायम असते. जेथे शांतता असेल तेथेच सुख असते. व जेथे परस्पर प्रेम असेल तेथेच शांतता असते. जेथे विश्वास असेल तेथेच प्रेम असते व जेथे सत्य असेल तेथेच विश्वास असतो व ते सत्यही यथार्थ असेल तर परिपक्व नसलेले ज्ञान सदैव बदलत असते. साधकाला संधी मिळताच विषयभोग, छळकपट, धनोपार्जन इत्यादींना तो योग्य मानू लागतो.

ज्ञानाचा व्यावहारिक विकास झाल्यास व्यक्ती महान बनते. ऱ्हास होण्याने अधम बनते यथार्थ ज्ञान प्राप्त झाल्यावर ही जर साधकाने ते प्रयत्नपूर्वक टिकविले नाही तर त्या निर्णयात्मक ज्ञानाचा स्तर निम्न होतो. कधी ज्ञानाचा स्तर इतका उच्च होतो की करोडोंच्या प्रलोभनालाही ठोकर मारली जाते तर कधी तीच व्यक्ती इतक्या निम्न स्तराची बनते की एका कवडीसाठी ही मन डगमगू लागते.

स्वत:शिकून जो इतरांना शिकवितो व जे प्राप्त झाले आहे त्याचा प्रसार करतो त्याचे ज्ञान स्थायी व उपकारी असते. पण जो स्वत: ऐकतो व दुसऱ्यांना ऐकवीत नाही, स्वत: शिकतो दुसऱ्यांना शिकवीत नाही, स्वत: वाचतो, इतरांना वाचावयास लावत नाही त्याचे ज्ञान स्थायी व उंपकारक नसते.

## . तीन प्रकारे ज्ञानप्राप्ती

**(१) शाब्दिक :** वेद इत्यादी शास्त्र अभ्यासून आप्त, ज्ञानी पुरूषांकडून ऐकून जे ज्ञान प्राप्त होते ते शाब्दिक ज्ञान होय. आपले ईश्वराबाबत ज्ञान ही असेच शाब्दिक आहे.

**(२) आनुमानिक :** शरीराबाबत विचार करताना असे आढळून येते की शरीरातील धातू कोण बनवितो ? सृष्टिनिर्मिती कोण करतो ? तिचे पालन कोण करतो ? यावरून ईश्वराबाबत आनुमानिक ज्ञान होते हे ब्रह्मांड नियमपूर्वक चालते. एखादी अदृश्य नियामकं शक्ती या ब्रह्मांडाला चालवीत आहे. हेच आनुमानिक ज्ञान समाधीमध्ये प्रत्यक्ष होते.

(३) **प्रत्याक्षिक** : शरीरातील आत्म्याला बाह्य ज्ञान इंद्रियांव्दारे होते व आंतरिक ज्ञान आत्म्याव्दारे प्रत्यक्ष होते.

## ज्ञानाचे क्षेत्र

या संसारात अनन्त वस्तू आहेत. सर्व गोष्टींचे ज्ञान या अल्प जीवनकालात प्राप्त करणे शक्य नाही किंवा परमानंद मुक्तीसाठीही शक्य नाही. देहाच्या एका अवयवाचे, नेत्राचे पूर्ण ज्ञान हजारो डॉक्टर मिळूनही प्राप्त करू शकत नाहीत. या ब्रह्मांडाचा शोध घेणाऱ्या वैज्ञानिकांनी दहा अब्ज आकाशगंगांचा शोध लावलेला आहे. त्यापुढील शोध लावण्यासाठी त्यांची साधने अपूर्ण आहेत हे ब्रह्मांड त्याच्यापुढे किती पसरलेले आहे त्याचे ज्ञान मानवाला या जन्मीच काय अनन्त जन्म जन्मान्तरी ही शक्य नाही. तरीही वेद व ऋषीव्दारे जे ज्ञान दिले गेलेले आहे त्याचा अनुभव घेऊन अनेकजण तरून गेलेले आहेत. त्यांनी आपल्या समोर ज्ञानाचे तात्त्विक रूप स्पष्ट केलेले आहे. ते ज्ञान तीन पदार्थांचे आहे-

ईश्वर - जीव - प्रकृती
साध्य-साधक - साधन
भोगदाता - भोक्ता - भोग्य पदार्थ
दाता - ग्राहक - वस्तू

## पदार्थांचे व्यावहारिक ज्ञान

ईश्वरासंबंधी आपले शाब्दिक ज्ञान खूप आहे. पण तात्त्विक ज्ञान अत्यंत कमी आहे. ईश्वराच्या सत्तेचे ज्ञान व्यावहारिक रूपात समजावे. प्रकृती, जीव, ईश्वर या विषयी आपले ज्ञान अत्यंत कमी आहे.

ज्ञान व विद्या जरी अनन्त आहेत तरीही जीवाचे इतके सामर्थ्य आहे की तो आपले सामर्थ्य वाढवून मोक्ष प्राप्त करू शकतो. परंतु कोणताही जीव कधी सर्वज्ञ बनू शकला नाही किंवा बनू शकणार नाही. सर्वज्ञ केवळ ईश्वरच आहे. कारण तो सर्वव्यापक आहे. जो सर्वव्यापक नाही तो सर्वज्ञही असू शकत नाही. एकदेशी राहणाऱ्या जीवाने कितीही ज्ञान वाढविले महाज्ञानी झाला तरी ही तो सर्वज्ञानी बनू शकत नाही. अज्ञानी व्यक्ती दररोज आरशात पाहून समजते की मी काळी, गोरी, वृद्ध, तरूण, स्त्री, पुरूष आहे परंतु योगी ज्ञानी, विवेकी आपल्या शरीराचा अन्त व प्रारंभ यांचे निरीक्षण करून वर्तमाना पलीकडे आपले शुद्ध आत्मरूप पाहतो.

 

**सत् :** प्रकृती ही अस्तित्वात असलेला पदार्थ आहे नाश पावणारी असली तरी तिचा अभाव नसतो. ईश्वर व आत्मा या वस्तू ही सत्तात्मक गुणाच्या आहेत त्यांचा कधी नाश होत नाही किंवा त्यांचा अभाव होत नाही.

**चित् :** जो सर्वत्र आत बाहेर चहुकडे भरलेला आहे त्या ज्ञानी चेतन ईश्वराचे सर्वत्र अस्तित्व न जाणून इतरांबाबत वाईट विचार करून व्यक्ती वाईट गोष्टीत फसते. ईश्वर सर्व माणसे, सर्व कीट, पतंग, पशू पक्षी यांची क्षणाक्षणाची क्रिया जाणतो. ईश्वराला ज्ञानवान चेतन जाणूनच मदतीची याचना केल्यास सफल होता येते जीव हा ही चेतन, एकदेशी (एकास्थानी) ज्ञानी आहे तरीही तो अल्पज्ञच आहे.

**आनंद:** ईश्वर आनंदस्वरूप आहे. साखर, शिरा इत्यादी पदार्थात जशी मधुरता आहे तशी मधुरता ईश्वरात् आहे. व या मधुरतेत चार प्रकारच्या दु:खाचा लवलेश नाही. ईश्वरी उपासनेमुळे आनंद वाढत जातो. साखर वगैरेची मधुरता कमी कमी होत बेचव होते. सांसारिक सुखाने रोगी व ईश्वरीय सुखाने निरोगी बनता येते. व्यक्ती हे सर्व मानते, जाणते पण तिला हे विशेष आवडत नाही कारण ते ज्ञान तिने व्यवहारात आणले नाही. ईश्वराला वास्तविक नित्यानंदाचे भांडार मानणाऱ्या व्यक्तीला इतर कोणत्याही वस्तूमध्ये ईश्वरापेक्षा जास्त अभिरुची नसते.

**सर्वशक्तिमान :** आपल्या नियमाप्रमाणे ईश्वर उपादान कारणाने संपूर्ण कार्यजगत उत्पन्न करतो. कुणाचेही साह्य न घेता तो सर्व कार्य करू शकतो म्हणून तो सर्वशक्तिमान आहे. तीन वस्तू जगाचे मूळ कारण असून त्यांचा विवेक, वैराग्य, अभ्यास करणे हे मुक्तीचे साधन आहे.

## वैदिक धर्मात ईश्वराचे स्वरूप

प्रथम ईश्वराच्या अस्तित्वाविषयी विचार केला पाहिजे. ईश्वराविषयी मुख्यत्वे दोन मान्यता आहेत. पहिली ही की ईश्वर एक सत्तात्मक वस्तू आहे व दूसरी ही की ईश्वर कोणतीही सत्तात्मक वस्तू नाही.

या दोन मान्यतांमध्ये प्रथम मान्यताच योग्य आहे. कारण प्रमाणांनी ईश्वराची सत्ता सिद्ध होते जी गोष्ट प्रमाणांनी सत्य सिद्ध होते तीच मानण्यायोग्य असते दुसरी नव्हे, कारण एखाद्या वस्तूचे अस्तित्त्व व अनस्तित्व याचे प्रमाणच निर्णयाचे कारण आहे "जन्माद्यस्ययत:"(वेदान्त द. अ. १-१-२) अर्थ - ज्यामुळे या संसाराची उत्पत्ती,

स्थिती व प्रलय होतो तोच ईश्वर होय, जर ईश्वर नसेल तर भूमी इत्यादी लोक व माणसांची शरीरे यांची उत्पत्ती होऊ शकत नाही. कर्त्याशिवाय कार्य होऊ शकत नाही.

**प्रश्न :** भूमी इत्यादी लोक व माणसांची शरीरे स्वत: उत्पन्न होतात. ईश्वराला मानण्याची आवश्यकता काय आहे?

**उत्तर :** भूमी इत्यादी लोक व माणसांची शरीरे ज्या परमाणूंनी बनलेली आहेत ते परमाणू जड आहेत अर्थात ज्ञानरहित आहेत म्हणून ते स्वत: एकत्रित येऊन भूमी, शरीर इत्यादींचे रूप बनवू शकत नाहीत. ज्याप्रमाणे लोखंडाचे कण स्वत: भूमीतून निघून रेलवेचे इंजन बनू शकत नाहीत त्याचप्रमाणे भूमीचे कण ही स्वत: भवन बनू शकत नाहीत. असेच सर्वत्र समजले पाहिजे. दुसरी एक गोष्ट ईश्वराचे अस्तित्व सिद्ध करते ती ही की एखाद्या जीवाला मनुष्य शरीर प्राप्त झाले तर एखाद्याला कुत्रा गाढव इत्यादींचे. मानव योनीत कुत्रा वगैरे योनी पेक्षा अधिक स्वतंत्रता आहे. याच प्रमाणे मनुष्य शरीरामध्ये ज्ञान इत्यादींचा जितका विकास होऊ शकतो तितका पशू वगैरे योनींमध्ये होऊ शकत नाही. हे जीवाच्या कर्माचे फळ आहे. जर ईश्वर नसेल तर कर्माचे फळ मिळू शकत नाही.

**प्रश्न :** कर्म स्वत: जीवाला फळ देऊ शकते. ईश्वराला मानण्याची काय आवश्यकता आहे ?

**उत्तर :** कर्म एखादी चेतन वस्तू नाही जे जीवाला आपले फळ स्वत: देऊ शकते. दुसरी गोष्ट ही आहे की कर्म ज्यावेळी केले जाते त्याच वेळी नष्ट होते मग कालान्तराने फळ कसे देऊ शकेल ? कर्मामुळे जे संस्कार बनतात ते ही कर्म फळ देऊ शकत नाहीत. कारण ते चेतन वस्तू नाहीत. आपण या जगात पाहतो की जो चेतन असतो तो कर्म करणाऱ्यांना त्या कर्माबद्दल विविध रूपात फळ देतो.

**प्रश्न :** ही भूमी इत्यादी लोक कोणत्याही व्यक्तीने बनविलेले दिसत नाहीत मग हे उत्पन्न करणारा ईश्वरच कशावरून ?

**उत्तर :** ज्या वस्तूचे तुकडे पडतात ती वस्तू अनादी असू शकत नाही. जसे माणसाचे हे शरीर तोडल्याने तुटते तशी भूमी ही तोडल्याने तुटते. म्हणून भूमी ही उत्पन्न होते ती अनादी नाही. भूमी इत्यादी पदार्थ स्वत: उत्पन्न होऊ शकत नाहीत त्यांना उत्पन्न करणारा चेतन पदार्थ ईश्वर आहे. तात्पर्य ईश्वराचे अस्तित्व

 

यावरून सिद्ध होते.

**प्रश्न :** वैदिक ईश्वराचे स्वरूप काय आहे ?

**उत्तर :** (१) यजुर्वेदात ईश्वराच्या स्वरूपाचे वर्णन खालील प्रकारे केलेले आहे.

सपर्यगाच्छुक्रमकायमव्रणम स्नाविरं शुध्दम पाप विध्दं ।
कविर्मनीषी परिभू : स्वयंभूर्याथातथ्यतोऽर्थान व्यदधाच्छा
श्वतीभ्य :समाभ्य: (यजुर्वेद ४०/८)

**पदार्थ:** हे माणसांनो ! जो ब्रह्म (शुक्रम्) वेगवान सर्व शक्तिमान (अकायम्) स्थूल, सूक्ष्म व कारण शरीर रहित (अव्रणम्) छिद्ररहित व छेद न करण्यायोग्य (अस्नाविरम्) नसनाडी इत्यादी संबंध रहित (शुध्दम्) अविद्या इत्यादी दोष रहित असण्याने नेहमी पवित्र व (अपापविध्दम्) जो पापयुक्त नाही, पाप करणारा नाही व पापाची इच्छा धरणारा नाही (परिअगात) सर्वत्र व्याप्त (कवि:) सर्वज्ञ (परिभू:) दुष्ट पापी लोकांचा तिरस्कार करणारा व (स्वयंभू) अनादी स्वरूप, ज्याची संयोगाने उत्पत्ती, वियोगाने विनाश होत नाही व ज्याला माता, पिता, गर्भवास, जन्म, वृद्धी व मरण नसते. तो परमेश्वर (शाश्वतीभ्य:) यथार्थ भावाने (अर्थान्) वेदाव्दारे सर्व पदार्थांना (विअदधात्) विशेष करून सांगतो (स:) तोच परमेश्वर तुम्ही उपासना करावी असा आहे.

योगदर्शन पाद १/२४-२५-२६ या तीन सूत्रात ईश्वराच्या स्वरूपाचे वर्णन या प्रकारे केलेले आहे.

(२) क्लेश कर्मविपाकशयैरपरामृष्ट: पुरूषविशेष ईश्वर : ।
'तत्रनिरतिशयं सर्वज्ञबीजम्' । 'स एष पूर्वेषामपि गुरू: कालेनानवच्छेदात्'

**अर्थ :** जो अविद्या क्लेशांनी रहित आहे. जो शुभ अशुभ किंवा मिश्रित कर्म करीत नाही केवळ निष्काम शुभ कर्मच करतो. जो कर्माचे फळ भोगत नाही व कर्माचे फळ भोगण्याने उत्पन्न होणारे संस्कार ज्याच्या मध्ये नसतात तो पुरुषाविशेष ईश्वर आहे. ज्याच्या पेक्षा कोणीही ज्ञानी नाही व जो सर्वज्ञ आहे, सर्व पूर्वज, वर्तमान व भविष्यामध्ये होणाऱ्या गुरुंचाही गुरु आहे, जो काळाच्या बंधनात अडकून विनाशाला प्राप्त होत नाही तो ईश्वर आहे.

(३) आर्य समाजाच्या दुसऱ्या नियमानुसार ईश्वर, सच्चिदानंदस्वरूप, निराकार, सर्वशक्तिमान, न्यायकारी, दयाळू, अजन्म, अनन्त, निर्विकार, अनादी,

अनुपम, सर्वाधार, सर्वेश्वर, सर्वव्यापक, सर्वान्तर्यामी, अजर, अमर, अभय, नित्य, पवित्र व सृष्टिकर्ता आहे त्याचीच उपासना करणे योग्य आहे.

**प्रश्न :** ईश्वर सातव्या आकाशात, चौथ्या आकाशात, परमधाम, वैकुंठ इत्यादी एका ठिकाणी मानल्याने कोणती हानी होते ?

**उत्तर :** जो एखाद्या स्थानी राहतो, तो सर्वज्ञ होऊ शकत नाही व जो सर्वज्ञ नाही तो सर्व जीवांच्या कर्मांना जाणून त्यांचे योग्य फळ देऊ शकत नाही तो न्यायी होऊ शकत नाही. ईश्वर सातव्या आकाशात राहतो ही गोष्ट प्रत्यक्ष प्रमाणांनी सिद्ध होऊ शकत नाही म्हणून ती अमान्य आहे.

**प्रश्न :** जसा जीव शरीराच्या एका स्थानी राहून संपूर्ण शरीराचे व्यापार जाणतो तसा परमेश्वर ही परमधामामध्ये एका स्थानी राहून सर्व काही जाणू शकतो व कर्माचे फळ देऊ शकतो.

**उत्तर :** हा दृष्टान्त योग्य नाही कारण शरीरात एका स्थानी राहणारा जीव संपूर्ण शरीराच्या व्यापारांना जाणू शकत नाही. जर जीवाने संपूर्ण शरीराच्या व्यापाराला जाणले असते तर कोणतीही व्यक्ती रोगी झाली नसती. मोठ मोठे डॉक्टरही शरीराविषयी पूर्ण रूपाने जाणत नाहीत व ते रोगी होतात त्यासाठी ही मान्यता खोटी आहे की जीव एका स्थानी राहून संपूर्ण शरीराविषयी जाणतो, तोच केवळ सर्वज्ञ होऊ शकतो जो सर्वव्यापक असतो एका स्थानी राहणारा तसा नसतो.

**प्रश्न :** जर ईश्वर सर्वव्यापक आहे तर जीव व प्रकृतीला राहण्यासाठी एखादे स्थान शिल्लक राहता कामा नये.

**उत्तर :** ईश्वर दगडाप्रमाणे स्थान व्यापत नाही किंवा जीवही तसे स्थान घेरत नाही. म्हणून ईश्वराच्या सर्वव्यापकत्वामध्ये जीव प्रकृती यांच्यामुळे बाधा उत्पन्न होत नाही.

**प्रश्न :** ईश्वरा खेरीज जीव व प्रकृती यांना स्वतंत्र अनादी पदार्थ मानण्याची काय आवश्यकता आहे ? ईश्वर स्वतःच जीव व जगातील भूमी इत्यादी सर्व पदार्थांना आपल्या स्वरूपाने उत्पन्न करील.

**उत्तर :** ईश्वर निर्विकार व निराकार आहे म्हणून जीव, प्रकृती व भूमी इत्यादींना आपल्या स्वरूपाने उत्पन्न करीत नाही व चेतना पासून जडाची उत्पत्ती होऊ शकत नाही म्हणून प्रकृती हा एक अनादी पदार्थ आहे त्यापासूनच ईश्वर

जगातील सगळ्या वस्तू बनवितो. जीव सुद्धा स्वतंत्र अनादी पदार्थ आहे. जर जीवाला भिन्न पदार्थ मानले नाही तर सुख दु:ख कोण भोगील ? ईश्वर आनंदाने परिपूर्ण आहे त्याला इतर कोणत्याही प्रकारच्या सुखाची आवश्यकता नाही व प्रकृती अचेतन आहे ती सुख दु:खाचा अनुभव करू शकत नाही म्हणून शुभ अशुभ कर्म करणारा व सुख दु:ख भोगणारा जीव अनादी पदार्थ आहे.

**प्रश्न** : काही लोक केवळ ब्रह्माला अनादी मानतात. जीव प्रकृतीला मानत नाहीत. काही लोकांची ही मान्यता आहे की प्रकृती एक अनादी पदार्थ आहे. ते जीव व ईश्वराचे अस्तित्व मानत नाहीत. काही लोकांच्या मते जीव प्रकृती हे दोन अनादी पदार्थ आहेत ते ईश्वराचे अस्तित्व मानत नाहीत.

**उत्तर** : या तिन्ही प्रकारच्या मान्यता प्रमाणांनी खोंडता येतात म्हणून मान्य करण्याजोग्या नाहीत. वेदामध्ये ईश्वर, जीव, प्रकृती या तिन्हींना अनादी मानलेले आहे.

'व्दा सुपर्णा सयुजा सखाया समानं वृक्षं परिषस्वजाते ।
तयोरन्य: पिप्पलं स्वाव्दत्यनश्नन्नन्योऽभिचाकशीति ॥'
(ऋ मं. १ सू. १६४ मंत्र २०)

महर्षी दयानंद सरस्वतींनी या मंत्राचा अर्थ स.प्र. ग्रंथाच्या ८ व्या समुल्लासामध्ये या प्रकारे केलेला आहे.

"(व्दा) जे ब्रह्म व जीव दोन्ही (सुपर्णा) चेतनता व पालन इत्यादी गुणांनी सारखे (सयुजा) व्याप्य-व्यापक' भावाने संयुक्त (सखाया) परस्पर भिन्न असून सनातन अनादी आहेत व (समानम्) तसाच (वृक्षम्) अनादी मूलरूप कारण व शाखारूप कार्ययुक्त वृक्ष जो स्थूल होऊन प्रलय काळामध्ये विछिन्न होतो, तो तिसरा अनादी पदार्थ आहे या तिन्हींचे गुण, कर्म, स्वभाव ही अनादी आहेत (परिषस्वजाते) एक दुसऱ्याच्या कवेत आहेत (तयोरन्य:) या जीव व ब्रह्म यापैकी एक जो जीव आहे तो या वृक्षरूपी संसारात पाप पुण्यरूपी फळांचा (स्वादत्ति) भोक्ता आहे व दुसरा परमात्मा कर्माच्या फळांना (अनश्नन) न भोगता चहुकडे अर्थात् आतबाहेर सर्वत्र प्रकाशित होत आहे. जीवापेक्षा ईश्वर भिन्न, ईश्वराहून जीव भिन्न व या दोन्हींपेक्षाही प्रकृती भिन्न आहे हे तिन्ही पदार्थ अनादी आहेत.

**प्रश्न** : वेदामध्ये ईश्वर, जीव प्रकृतीला अनादी मानलेले आहे. परंतु हे तीन अनादी का आहेत ?

 

**उत्तर :** 'सदकारणवन्नित्यम्' (वैशेषिक ४-१-१) अर्थात् ज्या वस्तूला कारण नसते ती नित्य असते. नित्य वस्तू अनादी असते. या जगात आपणास दिसून येते की जेव्हा तीन कारणे विद्यमान असतात तेव्हा एखाद्या कार्याची उत्पत्ती होते जसे (माठ) मातींचा घडा बनविणारा कुंभार निमित्त कारण आहे, माती उपादान कारण आहे व चक्र, दण्ड इत्यादी साधारण कारण आहे. या तीन कारणांनी मातीचा घडा बनतो. ईश्वर व जीव तसेच प्रकृतीला कारणे नाहीत ते अनादी आहेत. ज्या वस्तूची ही तीन कारणे असतात ती उत्पन्न होते. ज्याची नसतात ती उत्पन्न होत नाहीत. उत्पन्न न होणाऱ्या वस्तूला अनादी म्हणतात.

**प्रश्न :** ईश्वर, जीव व प्रकृती हे प्रमाणांनी सिद्ध झाले परंतु या तिन्हींचे परिज्ञान होण्याने माणसाला कोणता लाभ होतो ?

**उत्तर :** सर्व प्राणी अविद्या इत्यादी पाच क्लेशातून सुटका करून घेऊन शाश्वत संपूर्ण (दुःखरहित) आनंदाची प्राप्ती करून घेऊ इच्छितात. याविषयी कोणताही मतभेद नाही. पण जो पर्यंत ईश्वर जीव प्रकृती यांचे वास्तविक ज्ञान होत नाही व त्या ज्ञानानुसार माणूस ईश्वराची उपासना व शुभ निष्काम कर्म करीत नाही तो पर्यंत तो पूर्ण आनंद प्राप्त करू शकत नाही म्हणून आपल्या मुख्य उद्दिष्टाच्या प्राप्तीसाठी या तीन वस्तूंचे पूर्ण ज्ञान अवश्य मिळविले पाहिजे.

या तिन्हींना साध्य, साधक, साधन ही म्हणतात. या तिन्हींचे पूर्ण ज्ञान न होणेच सांसारिक दुःखाचे मुख्य कारण आहे. वेदामध्ये व वेदानुकूल ऋषीकृत ग्रंथांमध्ये हे निर्णयात्मक ज्ञान आहे की ईश्वर साध्य, जीव साधक व प्रकृती साधन आहे. ईश्वर हा अनन्त आनंद, ज्ञान, बलयुक्त असून तो प्राप्त करण्यायोग्य आहे. जीव हा नित्यानंद, ज्ञान, बल यांची प्राप्ती करू इच्छितो. म्हणून तो साधक आहे. ईश्वररूपी साध्य प्राप्त करण्यासाठी प्रकृतीचा साधनरूपाने प्रयोग होतो म्हणून प्रकृती हे साधन आहे.

**प्रश्न :** ईश्वराला साध्य, जीवाला साधक व प्रकृतीला साधन मानून जी व्यक्ती निष्काम कर्म करते व नियमपूर्वक ईश्वराची प्रार्थना व उपासना करते ती संपूर्ण दुःखातून मुक्त होते व नित्यानंद प्राप्त करते याचे प्रमाण काय ?

**उत्तर :** (१) वेदाऽहमेतं पुरुषं महान्तमादित्य वर्णं तमसः परस्तात् ।
तमेव विदित्वाति नान्यः पन्था विद्यते ऽ यनाय
(यजुर्वेद ३१/१८)

**पदार्थ :** हे जिज्ञासू पुरुषा !(अहम्) मी ज्या (एतम्) या पूर्वोक्त (महान्तम्) श्रेष्ठ गुणांनी युक्त (आदित्यवर्णम्) सूर्याच्या प्रकाशाप्रमाणे (तमसः) अंधःकार व अज्ञानापासून (परस्तात्) पृथक अस्तित्व असलेल्या (पुरूषम्) स्वरूपाने सर्वत्र पूर्ण परमेश्वराला (वेद) जाणतो (तमएव) त्यालाच (विदित्वा) जाणून तुम्हाला (मृत्युम्) दुःखदायक मृत्यूला (अतिएति) पार करून जाता येते. परंतु (अन्यः) याशिवाय भिन्न (पन्था) मार्ग (अयनाय) इष्ट स्थान मोक्षासाठी (न विद्यते) विद्यमान नाही. (ऋषिभाष्य)

या वेदमंत्रात हे स्पष्ट दिसून येते की जी व्यक्ती ईश्वराला यथायोग्य व्यावहारिक रूपात जाणून ईश्वराचा प्रत्यक्ष साक्षात्कार करते ती सर्व दुःखातून सुटका करून घेऊन नित्यानंदाची प्राप्ती करून घेते. यापेक्षा वेगळा असा कोणताही मार्ग नाही -

(२) 'रसो वै सः । रसं ह्येवायंलब्ध्वाऽऽनन्दी भवति'

(तैत. उप. व्र ७)

ईश्वर हा आनन्दस्वरूप आहे. त्या आनंदस्वरूपाला प्राप्त करून हा जीव आनंदी होतो.

(३) भिद्यते हृदयग्रन्थिश्छिद्यन्ते सर्वसंशयाः।
क्षीयन्ते चास्यकर्माणि तस्मिन्दृष्टे पराऽवरे

(मुण्ड २-२-८)

जो ईश्वर अगदी जवळ व अगदी दूर आहे त्याचे प्रत्यक्ष दर्शन होण्याने जीवाच्या हृदयातील अविद्या व संशय नष्ट होतात व अशुभ कर्मांच्या संस्कारांचा नाश होतो.

**प्रश्न :** ईश्वराचा साक्षात्कार करून जो जीव मोक्ष प्राप्त करतो तो पुन्हा संसारात जन्म घेतो किंवा नाहीं ?

**उत्तर :** घेतो.

**प्रश्न :** छान्दो. उपनिषद प्र. ८ खंड १५ मध्ये लिहिले आहे की 'नच पुनरावर्त्तते नच पुनरावर्तति' जीव मोक्ष प्राप्त केल्यानंतर पुन्हा संसारात जन्म घेत नाही.

**उत्तर :** उपनिषदाच्या वचनाचा वरीलप्रमाणे अर्थ नाही याचा अभिप्राय असा की ३१ नील, १० खर्व व ४० अर्व हा मुक्तीचा जो काळ स्वामी दयानंद सरस्वतींनी सत्यार्थ प्रकाशच्या ९ व्या समुल्लासात लिहिलेला आहे की त्या काळात जीव

 

जन्म घेत नाही. उत्तम ज्ञान, कर्म, उपासना यांनी जी मुक्ती मिळते ती सीमित असते म्हणून त्याचे फळही सीमित असते. जर सीमित गोष्टींचे फळ असीमित असेल तर तो अन्याय ठरेल.

**प्रश्न :** मुक्त जीवाचा ही पुनर्जन्म होतो त्याच्या जन्माचे कारण काय ?

**उत्तर :** मुक्त जीवाचे पूर्वकृत पाप व पुण्य हेच त्या जन्माचे कारण होय.

(ऋ मं. १ सूल २४ मं. २)

या भाष्यात स्वामी दयानंद सरस्वतींनी लिहिलेले आहे.

''अयमेव मुक्तानापि जीवानां महाकल्पान्ते पुनः पाप पुण्यतुल्यतया पितरि मातरिचमनुष्यजन्म कारयतीतिच''

मोक्ष प्राप्त झालेला जीव महाकल्पाचा अंत झाल्यावर पुन्हा पाप पुण्याप्रमाणे माता पिता व स्त्री इत्यादीं व्दारे मनुष्य जन्म प्राप्त करतो.

**प्रश्न :** ज्या ईश्वराच्या साक्षात्काराने जीवाला मोक्ष मिळतो त्या ईश्वराचे प्रत्यक्ष (दर्शन) होण्याचे प्रमाण कोणते ?

**उत्तर :** ईश्वराच्या प्रत्यक्ष दर्शनाचे शब्द प्रमाण खालील प्रमाणे -

(१) 'तव्दिष्णोः परमं पदं सदा पश्यन्ति सूरयः'

त्या व्यापक परमेश्वराचे स्वरूप विव्दान लोक सदैव पाहतात.

(२) 'त्वमेव प्रत्यक्षं ब्रह्मासि । त्वामेव प्रत्यक्षं ब्रह्म वदिष्यामि' तैत. १

अर्थ :- तूच प्रत्यक्ष ब्रह्म आहेस तुलाच प्रत्यक्ष ब्रह्म म्हणेन.

(३) 'जेव्हा जीवात्मा शुध्द होऊन अत्यंत तन्मयतेने परमेश्वराचा विचार करतो त्याचवेळी त्यांना एकमेकांचे प्रत्यक्ष दर्शन होते. (सत्यार्थ प्रकाश ७ समु.) येथे दोघे प्रत्यक्ष होतात याचा अभिप्रांय असा की ईश्वर व ईश्वराचा आनंद, ज्ञान इत्यादी गुणांची प्रत्यक्ष अनुभूती होते.

(४) 'तसे अनादी परमेश्वराला पाहण्याचे साधन शुध्द अन्तःकरण विद्या व योगाभ्यास होय. पवित्र झालेला आत्माच परमेश्वराला प्रत्यक्ष पाहतो' स.प्र. १२.

**प्रश्न :** ईश्वराला प्रत्यक्ष (साक्षात्कार) पाहण्याचे साधन कोणते ?

**उत्तर :** शुध्द ज्ञान, शुध्द कर्म, शुध्द उपासना ही ईश्वराचा साक्षात्कार करण्याची साधने होत.

**प्रथम साधन :** ईश्वर, जीव, प्रकृती यांच्याविषयी पृथक पृथक व्यावहारिक ज्ञान असले पाहिजे केवळ शाब्दिक ज्ञान नव्हे.

**दुसरे साधन :** ईश्वराच्या साक्षात्कारासाठी निष्काम अर्थात् शुभ कर्म केले पाहिजे. लौकिक फळ प्राप्त व्हावे यासाठी नाही.

**तिसरे साधन :** वेद व वेदानुकूल ऋषिकृत ग्रंथामध्ये लिहिल्या प्रमाणे शुध्द उपासना केली पाहिजे. योगदर्शनकारानी ईश्वरी साक्षात्कारासाठी यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान, समाधी ही साधने लिहिलेली आहेत. जी व्यक्ती ईश्वराचा साक्षात्कार करू इच्छिते तिने या सर्वांचे तन, मन, धनाने श्रध्दापूर्वक सदैव पालन करावे. व्यवहारातही यमनियमाचे पालन करावे व आसन लावून प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान करून समाधी पर्यंत पोचावे, संप्रज्ञात समाधीनंतर असंप्रज्ञातमध्ये ईश्वराचा साक्षात्कार होतो.

**प्रश्न :** ध्यान करण्याचा पद्धत कोणती ?

**उत्तर :** वेदमंत्रात सांगितल्याप्रमाणे प्रथम ईश्वराच्या वास्तविक स्वरूपाचे पूर्ण ज्ञान होणे आवश्यक आहे. ईश्वराच्या नावाचे ज्ञान होणेही आवश्यक आहे. नामी व नाम यांचे यथार्थ ज्ञान प्राप्त करून, ध्यान करताना त्या नामाचे अर्थासहित स्मरण केले पाहिजे. जसे 'ओ३म्' हे ईश्वराचे मुख्य नाव आहे. याचा एक अर्थ 'सर्वरक्षक' असा आहे. ध्यान काळात तीन कार्ये करावी लागतात.

(१) ओ३म् इत्यादी वाक्यांचे वारंवार उच्चारण करणे.

(२) वाक्याच्या अर्थाचा विचार करणे इतर विषयाचा नाही.

(३) ईश्वर समर्पण :- ज्याला भाव म्हणतात

'योगदर्शन' मध्ये समाधीपादच्या २४ व्या सूत्रात ईश्वराचे स्वरूप सांगितलेले आहे. पुन्हा २७ व्या सूत्रात नामाचे वर्णन व जपाचा विधी वर्णिलेला आहे. 'तज्जपस्तदर्थभावनम्' ओ३म् च्या नावाचा जप करावा त्याबरोबरच त्याच्या अर्थाचा विचार करावा. 'योगदर्शना' प्रमाणे (१-२९) विधीपूर्वक जप करण्याने हा लाभ होतो की आपल्या स्वरूपाचा व ईश्वराच्या स्वरूपाचा प्रत्यक्ष प्रत्यय येतो व (योगदर्शन १/३०, ३१) या प्रमाणे व्याधी व विघ्नांचे निवारणही होते. ईश्वराचा गुण, कर्म, स्वभाव योग्य रीतीने न जाणता जप करण्याने विशेष लाभ होत नाही. जप करणाऱ्या व्यक्तीचे आचरण सुद्धा ईश्वराच्या आज्ञेनुसार असले पाहिजे तेव्हा पूर्ण सफलता प्राप्त होते अन्यथा नाही.

**प्रश्न :** ईश्वराचा गुण, कर्म, स्वभाव कसा आहे ?

**उत्तर :** आर्य समाजाच्या दुसऱ्या नियमामध्ये ईश्वराचा गुण, कर्म, स्वभाव सांगितलेला आहे. ईश्वर जसा आहे तसे जाणून त्याचे ध्यान केले जावे.

**प्रश्न :** ईश्वर सर्वशक्तिमान आहे तेव्हा तो सर्व काही करू शकतो का ?

**उत्तर :** ईश्वर सर्व काही करू शकतो असे मानणाऱ्यांना हा प्रश्न विचारता येईल की ईश्वर स्वतःला नष्ट करून आपल्या प्रमाणे दुसरा ईश्वर निर्माण करू शकतो काय ? या प्रश्नाचे त्यांच्याजवळ कोणतेच उत्तर नाही कारण हे कार्य अशक्य आहे. सर्वशक्तिमानचा वास्तविक अर्थ हा आहे की आपल्या नियमामध्ये राहून उपादान कारणाव्दारे दुसऱ्याचे साहय न घेता आपले कार्य करणे. प्रकृती हे जगाचे उपादान कारण आहे. ईश्वर त्यापासून भूमी, शरीर इत्यादी सगळी सृष्टी बनवितो, संचालन करतो व प्रलय करतो. तसेच जीवांना त्यांच्या कर्माचे फळ ही देतो. ही कार्ये करताना तो कुणाची मदत घेत नाही. म्हणून तो सर्व शक्तिमान आहे.

**प्रश्न :** ईश्वर न्यायी व दयाळू आहे. या दोन गोष्टींमध्ये परस्पर विरोध दिसून येतो.

**उत्तर :** यात विरोध मुळीच नाही. जर एखाद्या चोराने चोरी केली व राजाने त्याला कारागृहात टाकले व शिक्षा केली हा चोराच्या बाबतीत न्याय झाला व चोराला शिक्षा केल्याने शेकडो लोकांचे दुःख दूर झाले ही त्यांच्यावर दया झाली. एखादा मुलगा वाईट काम करतो तेव्हा त्याचे आईवडील त्याला योग्य शिक्षा देऊन वाईट कामापासून परावृत्त करून उत्तम कर्म करण्यास प्रवृत्त करतात. असे करण्यामुळे बालकाबरोबर न्याय झाला व दयाही झाली. जर ईश्वरोपासकाच्या मनात कधी संशय उत्पन्न झाला तर त्याचे समाधान केले पाहिजे.

**प्रश्न :** पुष्कळशी माणसे हे मानतात की ईश्वर शरीर धारण करतो मग ईश्वराची मूर्ती बनवून ध्यान करणे ठीक नव्हे काय ?

**उत्तर :** योग्य नव्हे. कारण वेदामध्ये ईश्वराला 'अकायम्' अर्थात् शरीर रहित असे म्हटले आहे. ईश्वराची मूर्ती बनवून ईश्वराचे ध्यान केले जाऊ शकत नाही कारण ध्यान करणारा जेव्हा मूर्ती पाहील तेव्हा त्याला मूर्तीच दिसेल व ध्यानामध्ये खंड पडेल. जेव्हा ध्यान करणारा ईश्वराचे ध्यान करील तेव्हा मूर्ती दिसणार नाही. ईश्वर जर शरीर धारण करीत नाही तर त्याला शरीरधारी अवतार इत्यादी रूपात मानून त्यांचे ध्यान करणे अयोग्य आहे.

वैदिक धर्मात ईश्वराचे जे स्वरूप दर्शविलेले आहे तेच त्याचे वास्तविक स्वरूप आहे. दुसरे कोणतेही नाही कारण प्रत्यक्ष प्रमाणांनी त्याची सिध्दी होते. जी वस्तू जशी आहे त्याला त्याच रूपाने मनात धारण करून त्याचा शोध घेतला जातो. त्याचे नाव ध्यान होय. ईश्वर जर निराकार आहे तर त्याला साकार मानून एखाद्या माणसाने लाखो जन्म घेतले व त्याचे ध्यान केले तरी त्याला त्याचा साक्षात्कार होणार नाही.

वेदप्रतिपादित ईश्वराच्या दृष्टीने मनुष्य, पशू, पक्षी इत्यादी सर्व पुत्रांप्रमाणे असून समान आहेत. सर्व प्राण्यांचा ईश्वर एकच आहे, अनेक नाहीत. तो एकाच प्रकारचा आहे, अनेक प्रकारचा नाही. ईश्वराची आज्ञा पालन करणे हा सर्वांचा एकच धर्म आहे, अनेक नाहीत. भक्ती व मुक्तीची साधने सर्वांना समान आहेत, भिन्न प्रकारची नाहीत.

जर जगातील सर्व लोक वैदिक ईश्वराला जाणून त्याची स्तुती, प्रार्थना, उपासना करतील व आपला व्यवहार ही त्याच्या आज्ञेनुसार करतील तर सगळ्या समस्या सुटतील.

परमेश्वर अव्दितीय आहे त्याच्या पेक्षा मोठा किंवा तुलना करण्या योग्य कोणीही नाही व कधीही होणार नाही म्हणूनच त्याला परमेश्वर असे म्हणतात.

परमेश्वर जगाचा आत्मा आहे तो आत्म्याचाही आत्मा आहे कारण तो सर्व जगात आत बाहेर पसरलेला आहे अर्थात् तिळा एवढीही जागा रिकामी नाही.

कोणत्याही प्रकारची मान्यता असली तरी वस्तूचे (मूळ) स्वरूप बदलत नाही. कित्येक लोक म्हणतात ''तुम्ही ईश्वराला माना आम्ही मानत नाही, तुम्ही खरे बोला आम्ही बोलत नाही यामुळे कोणता फरक पडणार आहे ? प्रत्येकाचे म्हणणे बरोबर आहे. प्रत्येकाचा आपापला विश्वास असतो. तुम्ही चोरी व हिंसा यात पाप समजता, आम्ही समजत नाही. सर्वांचा धर्म वेगवेगळा आहे, मग काय हरकत आहे ? तुम्ही निराकाराला मानता आम्ही 'अहं ब्रह्मास्मि' ला मानतो. सर्वजण आपापल्या धर्माचे पालन करतात मग काय हरकत आहे ? काहीही मानता येते ''

हे लक्षात ठेवले पाहिजे की एखाद्याच्या मानण्या न मानण्याने वस्तूचे स्वरूप बदलत नाही. सृष्टीच्या आरंभी ईश्वर जसा होता तसाच आज ही आहे. जीव व प्रकृती जशी प्रारंभी होती तशीच आजही आहे. सतयुग, कलियुग इत्यादीमुळे

 

कधी पदार्थाचे स्वरूप किंवा सत्य बदलत नाही. ईश्वरासंबंधी ज्ञान, विवेक नसल्यामुळे आज नास्तिकता वाढत आहे. ईश्वरा विषयी श्रद्धा कमी होत आहे.

**सामान्य प्रश्न :** तुम्ही ईश्वराला मानता काय ?

**उत्तर :** या गोष्टी सोडून द्या त्याशिवाय अन्न पचत नाही की काय ? ईश्वर, भाकरी, कपडा, घर, नौकरी देईल काय ? नास्तिक जास्त सुखी आहेत. पाश्चात्य वैज्ञानिक बेकन, बुकनिन इत्यादींनी म्हटले आहे कीं आता ईश्वराची आवश्यकता नाही. जर ईश्वर असेल तर त्याला नष्ट केले पाहिजे. कार्ल मार्क्स ईश्वर व धर्माला अफू समजतो. धर्म व ईश्वराच्या बाबतीत पाश्चात्य देशातील धर्म संप्रदायात अवैज्ञानिक व विपरीत मान्यता आहेत. अशा धर्माच्या नावावर मानव समाजाचा जेवढा संहार झाला तितका इतर युध्दे वगैरे कारणांनी झालेला नाही. नास्तिक लोकांनी विचारलेल्या प्रश्नांची उत्तरे तेथील आस्तिक लोकांजवळ नाहीत. त्यांच्या सभा मंदिर पूजेच्या स्थानी बोर्ड लागलेला असतो 'धर्मावर प्रश्न विचारू नयेत' 'कोणावर आक्षेप घेऊ नका' 'इतरांची निंदा करू नका' जो पर्यंत आस्तिकांजवळ या सामान्य आक्षेपाचे उत्तर नाही तो पर्यंत धर्म सुरक्षित नाही.

**आक्षेप १ :** जगात अव्यवस्था आहे

**उत्तर :** ही अव्यवस्था ईश्वराकडून नाही. माणूस कर्म करण्यास स्वतंत्र असल्यामुळे ही अव्यवस्था माणसांकडूनच उत्पन्न झालेली आहे. घरी आईवडील असल्यामुळे मुले गोंधळ करीत नाहीत पण आई वडील नसल्यास गोंधळ करतात. श्रेष्ठ धार्मिक आई वडिलांची मुले ही दुष्ट, चोर, मद्यपी असल्यास आई वडिलांची आज्ञा मानीत नाहीत जसे राजा अधिकारावर असूनही त्याच्या राज्यात चोर व डाकू असतात तसे ईश्वराचे अस्तित्व असूनही अधार्मिक माणसांमुळे जगात अव्यवस्था निर्माण झालेली आहे.

**आक्षेप २ :** ईश्वराची मुळीच आवश्यकता नाही. जग आपोआप बनले आहे. जसे जंगलातील वृक्ष हिमालयातील जडीबुटी वगैरे.

**उत्तर :** ही धारणा चुकीची आहे. जगातील कोणतेही कार्य आपोआप होत नसते (प्रतिज्ञा) (हेतु) कर्त्याशिवाय कोणतेही कार्य होत नाही.

(उदाहरण) जसे घर वगैरे कर्त्याशिवाय बनू शकत नाही तसे जडीबुटी गवत वगैरे ही जड वस्तू न हलविता तशीच पडून राहते. जड परमाणूचा स्वत: संयोग किवा

वियोग होत नसतो.

**आक्षेप ३ : ईश्वर सर्वांना आनंदित का करीत नाही ?**
**उत्तर :** ईश्वराच्या आज्ञेनुसार जो चालतो त्यालाच ईश्वर आनंद देतो. जो त्याची उपासना करतो त्याला तो आनंद देतो. सर्वांजवळ टी.वी. असूनही जो चॅनल ऑन करतो त्यालाच प्रसारण दिसते. मधात तरंगणारा माणूस तोंड बंद ठेवून मधाचे माधुर्य चाखू शकत नाही.

**आक्षेप ४ : नास्तिक अधिक सुखी का दिसतात ?**
**उत्तर :** ईश्वर न्यायी असून कर्माचे फळ देणारा आहे, जो यथायोग्य परिश्रम करील तो ईश्वरी व्यवस्थेनुसार भौतिक सुख प्राप्त करील जर त्याबरोबरच आस्तिकता असेल तर ईश्वर प्रदत्त विशेष मानसिक आनंद शांती प्राप्त होईल. जो अव्यवहारी आस्तिक असून कामचुकार व आळशी आहे त्याला भौतिक सुखही मिळणार नाही, आध्यात्मिक उच्च स्तराच्या सुखाची गोष्ट तर दूरच खऱ्या आस्तिकासारखे नास्तिकाला सुख कधीही मिळू शकत नाही. हा सिध्दान्त आहे. .वैदिक (वैज्ञानिक) षड्‌दर्शनाच्या तार्किक ज्ञानाव्दारे ही राष्ट्रविघातक, संस्कृतिविनाशक नास्तिकांना सडेतोड उत्तर देता येते.

**ईश्वर :** ईश्वर एक अशी वस्तू आहे की ज्यात रूप; रस, गंध, स्पर्श, शब्द इत्यादी गोष्टी नाहीत तरीही ती एक वस्तू आहे. जर ईश्वराच्या अस्तित्वात विश्वास, दृढ श्रद्‌धा नसेल तर योगाभ्यासाव्दारे कोणत्या गोष्टीच्या प्राप्तीसाठी प्रयत्न करावे ? स्वत: आत्म्यात रूप, रंग नाही तरी आपल्याला त्याची अनुभूती होते की आपण एक वस्तू आहोत. आपल्यामध्ये ज्ञान, बल, प्रयत्न, सामर्थ्य आहे. त्याच प्रमाणे ईश्वर एक पदार्थ आहे, जो ज्ञान, बल, आनंद इत्यादी गुणांनी युक्त असून सर्वत्र विद्यमान आहे. कोणी श्रद्‌धा ठेवो अथवा न ठेवो, मानो अथवा न मानो पण ईश्वर गुणांनी युक्त सत्तात्मक पदार्थ आहे. भावात्मक वस्तूला लाखो करोडो लोकांनी न मानले तरीही त्याचा अभाव नसेल भावच असेल पण ज्याचा अभाव असेल त्याला सर्वजण मानत असतील तरीही त्याचे अस्तित्व नसणार. समाजात इतक्या वाईट गोष्टी आहेत की त्यामुळे आपण ईश्वराला अस्तित्व असलेला पदार्थ मानत नाही, जाणत नाही, त्याप्रमाणे व्यवहार करीत नाही, ईश्वराच्या वेदोक्त आज्ञांचे पालन करीत नाही. असत्य बोलू नये, अन्याय करू नये. भेदभाव करू नये इत्यादी. ईश्वर आपल्याला ज्ञान, बल, आनंद, धैर्य इत्यादी देऊ शकतो पण विश्वासच नसेल तर प्राप्ती कशी होईल ?

 

# भ्रान्तिदर्शन

**भ्रान्तिदर्शन :** विपरीत, मिथ्या, उलट ज्ञान. आज ईश्वरासंबंधी व्यापक रूपाने लोकांमध्ये मिथ्या ज्ञान पसरलेले आहे.

शरीरधारी ईश्वर सर्वव्यापक होऊ शकत नाही व सर्वज्ञही होऊ शकत नाही, सर्व शक्तिमानही होऊ शकत नाही आणि सृष्टिकर्ता ही बनू शकत नाही म्हणून शरीरधारी रूपात ईश्वर दिसणे हे भ्रान्तिदर्शन आहे, ईश्वर दर्शन नाही.

ध्यान व उपासनेत दिसणारी नक्षत्रे, चकचकीतपणा व प्रकाश हा सर्व भौतिक प्रकाश असून तो ईश्वर होऊ शकत नाही परंतु ईश्वराला प्रकाशस्वरूप असे जे म्हणतात तो ज्ञानाचा प्रकाश होय. हा सूर्य इत्यादीचा प्रकाश नाही. अविद्येचे दुसरे नाव तम आहे. जशी आपण प्रार्थना करतो 'हे ईश्वरा ! आम्हाला तम अर्थात् अंध:कारापासून (अविद्या) प्रकाशाकडे (विद्या) घेऊन चल. कारण तुझ्यात अज्ञानाचा थोडाही अंश नाही. तू ज्ञानस्वरूप आहेस' म्हणून ईश्वरामध्ये भौतिक प्रकाश नाही तर ज्ञानाचा प्रकाश आहे. जर ईश्वराला सूर्यासारखे मानले तर ईश्वर सर्वव्यापक सृष्टीमध्ये कुठेही अंध:कार नावाची वस्तूच शिल्लक राहणार नाही परंतु आपण पाहतो की जेथे सूर्य असतो तेथेच भौतिक प्रकाश असतो व जेथे तो नसतो तेथे अंध:कार असतो ईश्वरानेच या सूर्याला भौतिक प्रकाशाने युक्त केले आहे हे ठीक आहे. ईश्वर प्रकृतीच्या सत्त्व, रज, तम या तीन गुणांनी सूर्याला प्रकाशित करतो. त्याने प्रकृती पासूनच माणसांची शरीरे, इंद्रिये व मने इत्यादीही बनविलेली आहेत.

## ईश्वराविषयी भ्रांती

(१) ईश्वर एके ठिकाणी राहतो. जसे,वैकुंठ, परमधाम, चौथे व सातवे आकाश इत्यादी.

(२) ईश्वर शरीरधारी आहे, अवतार घेतो.

(३) ईश्वर पापांना क्षमा करतो.

(४) ईश्वर कर्म न करताही सुख दु:ख देतो.

(५) ईश्वर मनाला येईल तसे करू शकतो.

(६) सर्व ईश्वरच करवितो.

(७) ईश्वरापासून हे जग बनलेले आहे.

(८) ईश्वराला कोणतीच इच्छा नाही.

 

(९) ईश्वर निराकारही आहे, साकारही आहे.
(१०) ईश्वर डोळयांनी दिसतो.
(११) जीवच ईश्वर बनतो.
(१२) ईश्वर भविष्याच्या साऱ्या गोष्टी जाणतो.
(१३) जीव हा ईश्वराचा एक अंशच होय.

## वैदिक धर्मात जीवात्म्याचे स्वरूप

**जीवात्म्याला स्वतःबद्दलचे ज्ञान असण्याची आवश्यकता :** जो जीवात्मा ईश्वराला प्राप्त करू इच्छितो तो आपली स्वतःची शक्ती, गुण, स्वरूप यांना जाणल्या खेरीज ईश्वराला जाणू शकत नाही. जेव्हा व्यक्ती, आरशात पाहून हा विचार करते की मी पुरूष, स्त्री, काळी, गोरी, ठेंगणी, बालक, वृद्ध आहे, हे ज्ञान मिथ्या आहे. याऐवजी मी स्त्री पुरूष इत्यादी शरीर धारण करणारा / करणारी आहे. हा विचार केला पाहिजे. आज माणसाने पृथ्वीच्या कणाकणाचा शोध घेतलेला आहे, तो चंद्रावर पोचलेला आहे. प्राकृतिक पदार्थांचे त्याला ज्ञान आहे परंतु स्वतःच्या बाबतीत मात्र तो अल्पज्ञानी आहे.

परिभाषा, सिद्धांत बदलल्याने विचार व व्यवहार बदलतात. कुराण व बायबल यात आत्म्याविषयी फार कमी लिहिलेले आहे व जी विधाने केलेली आहेत ती सुध्दा पुष्कळदा चुकीची आहेत. जसे माणसाला सोडून कुणातच आत्मा नाही. स्त्रीमध्ये पूर्ण आत्मा नाही. पाकिस्तानात तर स्त्रीला अर्धा आत्मा मानल्यामुळे तिला निवडणुकीत अर्धे वोट (मत) देण्याचा अधिकार आहे.

अग्नी इत्यादी भौतिक पदार्थांबाबत आपले जसे व्यावहारिक ज्ञान असते तसेच आत्म्याबाबतही असावे. माझ्या आत्म्याला शस्त्र घाव घालू शकत नाही, अग्नी जाळू शकत नाही हे जाणल्यावरच शक्ती व निर्भयता येते. दयानंदावरं विष प्रयोग झाला, मतिदासाला चिरले, बैरागीचे कातडे सोलले, गुरू गोविंद सिंहाच्या मुलांना भिंतीत चिणून ठार मारले, कुणाला कढईमध्ये तळले गेले या सर्वांनी आत्म्याचे खरे व नित्य स्वरूप जाणले म्हणूनच म्हटले की आमच्या आत्म्याला कोणी काही करू शकत नाही. त्यांनी आपल्या अनित्य शरीराला आत्मा मानले नाही आत्म्याला जाणूनच माणूस अत्यंत सामर्थ्यवान बनतो. हे खऱ्या ज्ञानामुळे घडते. जीवात्म्याला रंग, रूप, भार, काहीच नसतो. जसे भौतिक वस्तूंमध्ये रंग, रूप, स्पर्श, लांबी, रूंदी इत्यादी गुण असतात तसे जीवात्म्यामध्ये नसतात.

एक विचित्र गोष्ट म्हणजे "५०१ आश्चर्य जनक तथ्य" या पुस्तकात जीवात्म्याचा भार (वजन) २१ ग्रॅम लिहिलेले आहे. काही वैज्ञानिकांनी प्रयोगही केलेले आहेत. मरणासन्न व्यक्तीला एका डब्यात बंद करून त्याचे वजन केले गेले. थोडया वेळाने ती व्यक्ती मृत्यू पावली अर्थात् आत्मा निघून गेला तेव्हा वजन केले गेले तेव्हा ते २१ ग्रॅम कमी भरले म्हणून त्यांनी निष्कर्ष काढला की जीवात्मा २१ ग्रॅमचा आहे. या २१ ग्रॅममध्ये कितीतरी मुंग्याचे वजन भरेल . असे आत्म्याबद्दल अज्ञान आहे.

जैन लोक म्हणतात, आत्मा वाढतो, कमी होतो. हत्तीमध्ये असेल तर वाढतो व मुंगीमध्ये जाईल तर कमी होतो.

सत्य वैदिक सिध्दान्तं असा की जीवात्मा अपरिणामी असल्यामुळे वाढणे किंवा कमी होणे असा प्रकार घडत नाही व अभौतिक वस्तू असल्यामुळे स्थान व्यापत नाही. एका सुईच्या टोकावर विश्वातील सर्व जीवात्मेही सामावू शकतात.

## जीवात्म्याची सिद्धी

(१) दर्शन स्पर्शनाभ्यामेकार्थ ग्रहणात् । (न्या. दर्शन ३-१-१)
एक सफरचंद आपण डोळयांनी पाहतो, नाकाने वास घेतो, त्वचेने स्पर्श करतो पण या सर्वांशी संबंधित असतो त्यालाच आत्मा म्हणतात. प्रत्येक इंद्रिय एका विषयाला जाणू शकते परंतु सर्वांना आत्माच जाणू शकतो.

(२) इन्द्रियान्तरविकरात् : (न्याय दर्शन ३-१-१२) आपण कधी लिंबाची चव घेतलेली असते, मिष्टान्न खाल्ले असते. त्याचा स्वाद माहीत असतो. कालान्तराने तिला भोग्य वस्तू (लिंबू, मिष्टान्न) पाहून तोंडाला पाणी सुटते. पाहिले डोळयांनी पण लाळ तोंडात उत्पन्न झाली. त्या दोघांचा अन्वय संबंध जोडणारा शरीरातील जीवात्माच असतो.

(३) सव्यदृष्टस्येतरेण प्रत्यभिज्ञानात् (न्यायदर्शन ३-१-७) आपण दोन्ही डोळे बंद करतो एका नव्या वस्तूला डाव्या डोळ्याने पाहिले त्यालाच उजव्या डोळ्यांनी पाहिले तर जे डाव्या डोळ्याने पाहिले तेच उजव्या डोळ्याने दिसले या ज्ञानाचा अन्वय लावणारा आत्मा असतो.

(४) इच्छाव्देषप्रयत्नसुखदु:खज्ञानान्यात्मनो लिंगम् (न्याय द. १-१-१०)
इच्छा, व्देष, प्रयत्न, सुख, दु:ख व ज्ञान ज्या वस्तूत असेल तेथे आत्मा आहे हे सिध्द होते.

(५) पष्ठीव्यपदेशादपि (सांख्य द. ६-३) माझा डोळा, माझा कान, माझे नाक अशी स्वामित्वाची भावना असणारा आत्मा होय.

(६) देहादि व्यतिरिक्तोऽ सौ वैचित्र्यात् (सांख्यदर्शन ६-२) आत्म्याचे लक्षण, शरीर, इंद्रिये इत्यादींपासून वेगळे असल्यामुळे तो शरीर इंद्रिये इत्यादींपेक्षा भिन्न आहे.

(७) अहमिति शब्दस्यव्यति रेकान्नागमिकम् (वैशे. दर्शन ३-२-९)
'मी' चे अस्तित्व त्याचा प्रत्यक्ष अनुभव आत्म्यामुळेच होतो
'मी' ही अनुभूती हे प्रत्यक्ष ज्ञान आहे.

(८) **अनुमान प्रमाण :** इंद्रियांचा विषय बंद करून नंतर स्थिर आसनावर बसून शरीराची अनुभूतीही बंद झाल्यावर जेव्हा विचारही समाप्त होतात तेव्हा जो शेष उरतो तो 'मी आहे' हाच आत्मा होय.

## जीवात्म्याचे गुण, कर्म, स्वभाव व स्वरूप

(१) आत्मा ही एक अस्तित्व असणारी वस्तू, पदार्थ, द्रव्य आहे. कारण त्यात गुण क्रिया असतात. केवळ गुण ही असतात. गुणांना धारण करणाऱ्याला द्रव्य, पदार्थ, वस्तू असे म्हणतात. जे स्थान घेरते, भरीव असते तेच द्रव्य असते असे नाही म्हणून प्रकृती बरोबरच जीव व ईश्वर याही वस्तूच आहेत.

**गुण :** नैमित्तिक व स्वाभाविक असे आत्म्याचे दोन प्रकारचे गुण असतात. स्वाभाविक गुण, ज्ञान, प्रयत्न इत्यादी तर नैमित्तिक गुण सुख दुःख इत्यादी 'मी' च्या अस्तित्वाची जाणीव हे स्वाभाविक ज्ञान आहे. व चक्षू, श्रोत्र इत्यादी इंद्रियांव्दारे जे ज्ञान उत्पन्न होते ते नैमित्तिक आहे.

**कर्म :** ईश्वर प्रदत्त उपकरणाशिवाय जीवाचे सामर्थ्य निरूपयोगी आहे. जीव मोक्षामध्ये प्राकृतिक साधनांशिवाय ईश्वराच्या सामर्थ्याने मोक्षसुख अनुभवतो. जेव्हा शरीरापेक्षा वेगळी अशी आत्म्याची अनुभूती होते तेव्हा पाप कमी होत जाते. शक्ती व्यर्थ जात नाही. जीवन बदलते इतकी शक्ती निर्माण होते की समोर विषय असतानाही त्याचा भोग करीत नाही. त्यात सुख दु:खाची अनुभूती करीत नाही आत्म्याचे स्वरूप जाणण्यानेच हे शक्य होते.

(२) **जीवात्म्याचे स्वरूप :** जीवात्मा नित्य, अनादी, काळाच्या दृष्टीने अनन्त, निर्विकार, निराकार, अल्पज्ञ, एकदेशी, अल्पशक्तिमान आहे. तात्त्विक दृष्टीने अविकारी आहे

माणसाचा देह जड असून आत्मा चेतन आहे. इच्छा, प्रयत्न, ज्ञान इत्यादी आत्म्याचे गुण आहेत. कर्तृत्व ही त्याची शक्ती आहे. अहंज्ञान त्याच्या स्वरूपाचे बोधक आहे. जीवात्माही अनादी आहे व मोक्ष प्राप्त करणे त्याच्या पुरूषार्थाचे लक्षण आहे. त्याची शक्ती परिमित आहे. स्वभावाने तो अपूर्ण आहे. कर्मानुसार तो अनेक लोकलोकान्तरी भ्रमण करतो व मुक्त होऊन परमेश्वरात विश्राम करतो.

(३) शरीरात आत्मा कुठे राहतो ? जीवात्म्याचे विशेष स्थान हृदय असते. काही लोक मस्तकामध्ये स्थित असलेल्या हृदयात त्याला मानतात व काही लोक छातीच्या मध्यभागी मानतात. महर्षी दयानंदांनी वक्षस्थलस्थित हृदय हे आत्म्याचे स्थान मानले आहे. दोन स्तनांमध्ये, कंठाच्या खाली, नाभीच्या वर हृदयप्रदेश आहे असे म्हटले आहे. उपनिषदात असेही संकेत प्राप्त होतात की ज्यामुळे जीवात्म्याची स्थाने एक नसून अनेक आहेत असे भासते. महर्षी दयानंदांनी म्हटले आहे की जीवात्म्याला सुख दुःख भोगण्यासाठी ईश्वराने अनेक स्थाने निर्माण केलेली आहेत. स्थान विशेषात ईश्वराने जीवात्म्याला बांधून ठेवलेले नाही. परंतु जोपर्यंत जीवन असते. तोपर्यंत तो शरीरात राहतो. ब्रह्मोपनिषदाच्या एका प्रकरणात याचा संकेत मिळतो. जीवाची तीन स्थाने आहेत. जागृत अवस्थेत तो नेत्रांमध्ये असतो. आपण एकमेकांना नेत्रांनी पाहतो. पशूही डोळ्यांनीच पाहतात. स्वप्नामध्ये जीवात्मा कंठामध्ये असतो व सुषुप्तीमध्ये हृदयात असतो. ब्रह्मकुमारी वगैरे अनेक संप्रदायांमध्ये असे मानले जाते की प्रत्येक योनीचे जीवात्मे वेगवेगळ्या प्रकारचे असतात. कुत्र्याचा आत्मा सदैव कुत्र्यातच राहील. परंतु ही मान्यता वेद व ऋषी यांच्या विरुद्ध आहे. सर्व जीवात्मे एकाच प्रकारचे आहेत परंतु कर्मानुसार त्यांना वेगवेगळ्या योनी प्राप्त होतात.

प्रत्यक्ष व शब्द प्रमाण यात मतभेद निर्माण झाल्यास केवळ अनुमान प्रमाणच वस्तूला शंभर टक्के सत्य सिद्ध करण्यास समर्थ असते जर पूर्ण रूपाने सिद्ध न झाल्यास ते अनुमान प्रमाण नव्हे. तर ती शक्यता असू शकते.

(४) **नित्यता :** जीव व ईश्वर कूटस्थ नित्य (अपरिणामी) व प्रकृती परिणामी नित्य आहे.

(५) **लिंग :** जीवात्म्यामध्ये स्त्री, पुरूष, नपुंसक असा लिंगभेद नाही.

(६) **आकार :** आत्मा हा आकाराने अत्यंत सूक्ष्म अणुरूप आहे. तो इतका सूक्ष्म आहे की हत्तीसारख्या विशाल शरीरात व अतिसूक्ष्म जीवाणूच्या शरीरात ही राहू शकतो. आत्मा अभौतिक आहे, तो स्टीलच्या हजारो पत्र्यांच्या पलीकडे त्यांना भेदून पार जाऊ शकतो.

(७) जीवात्म्याचा जन्म मृत्यू होतो काय ? : जीवात्मा न जन्मतो न मरतो, तो अजर, अमर, नित्य, अनादी, अनन्त आहे. जेव्हा जीवात्म्याचा शरीराबरोबर संबंध येतो तेव्हा त्याला जन्म म्हणतात व जेव्हा शरीर सोडतो तेव्हा त्याला मृत्यू असे म्हणतात.

(८) जीवात्म्यांची संख्या किती आहे ? जीवात्मे अनन्त आहेत आपण जीवात्म्यांच्या संख्यांची गणना करू शकत नाही. एका घरात किती डास, कोळी, मुंग्या असतात. अनेक घरांत किती असतील त्यांची संख्या कोणालाही मोजता येत नाही परंतु ईश्वर ही संख्या जाणतो. ईश्वराच्या गणनेत जीवात्मे सीमित असतात तर आपल्या दृष्टीने असीमित असतात.

(९) जीवात्म्याची शरीरे किती आहेत ? जीवात्म्याची तीन शरीरे असतात. कारणशरीर, सूक्ष्मशरीर व स्थूलशरीर. कारणशरीर ही प्रकृती असते. ती सर्वांची समान असते. सूक्ष्मशरीर १८ तत्त्वांनी बनलेले आहे. ते सृष्टीच्या आरंभी प्राप्त होते. जो पर्यंत मुक्ती किंवा प्रलय होत नाही तो पर्यत हे शरीर राहते. ही १८ तत्त्वे प्रत्येक प्राण्यात विद्यमान असतात. ५ ज्ञानेंद्रिये, ५ कर्मेंद्रिये, ५ तन्मात्रा, १ मन १ अहंकार, १ बुद्धी. काही प्राण्यात गोलक नसतात पण इंद्रिये असतात जसे सापाला पाय नसतील परंतु पाद हे कर्मेन्द्रिय असते.

(१०) शरीरात आत्म्याच्या किती अवस्था असतात ? शरीरात आत्म्याच्या चार अवस्था असतात. एक जागृत, दुसरी स्वप्न, तिसरी निद्रा (सुषुप्ती) व चौथी तुरीय जी समाधीची अवस्था होय.

(११) शरीरात जीवात्म्याचे कोष किती असतात ?
शरीरात जीवात्म्याचे पाच कोष असतात ते येणे प्रमाणे-अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय, आनंदमय हे होत.

(१२) जीवात्म्यामध्ये भेद आहेत काय ? त्यांच्यात भेद नाहीत सर्व जीवात्मे सारखेच असतात. स्वरूप व स्वभावाचा कोणताच भेद नाही. परंतु भेदाचे कारण न्यूनाधिक ज्ञान, विज्ञान, संस्कार व कर्म हे होत.

(१३) जीवात्म्यामध्ये किती प्रकारच्यां शक्ती असतात ?
जीवात्म्यामध्ये २४ प्रकारच्या शक्ती असतात. पाहणे, ऐकणे, विचार करणे, निर्णय घेणे इत्यादी. जीवात्मा मुक्तीमध्ये ईश्वर प्रदत्त ज्ञानाने आनंद प्राप्त करतो.

(१४) जीवात्मा शरीर धारण का करतो ? किती काळपर्यंत शरीर धारण करतो ?
जीवात्मा नवीन कर्म करण्यासाठी व केलेल्या कर्माचे फळ भोगण्यासाठी शरीर धारण करतो व जो पर्यंत अविद्या असते तो पर्यंत तो शरीर धारण करतो, जन्ममृत्यूचे चक्र अविद्येमुळेच आहे. ईश्वराच्या सान्निध्याने अज्ञान समाप्त होऊन आवागमनाचे चक्र ही समाप्त होते.

(१५) जीवाची मुक्ती व बंधन म्हणजे काय ?
दुःखातून सुटका म्हणजे मुक्ती "ज्ञानान्मुक्ति बन्धो विपर्ययात्" जेव्हा जीवात्मा अज्ञानी असतो तेव्हा तो बद्ध होतो व ज्ञानी झाल्यावर मुक्त होतो. जेव्हा प्रकृतीपासून मुक्त होतो तेव्हा दुःख उत्पन्न होत नाही. तो ईश्वराच्या सान्निध्यात राहतो. जी व्यक्ती आपल्या अविद्येच्या संस्कारांना दग्धबीज करते त्या व्यक्तीला मुक्ती मिळते. शिल्लक राहिलेल्या कर्माप्रमाणे मुक्ती नंतर पुन्हा मनुष्ययोनी प्राप्त होते.

(१६) मुक्ती किती वर्षी पर्यत असते ?
३१ नील, १० खर्व, ४० अर्व वर्षे मुक्तीमध्ये आनंद भोगता येतो.

(१७) एक शरीर सोडून दुसरे शरीर प्रांप्त करण्यास किती वेळ लागतो ?
अत्यंत कमी वेळ लागतो. उपनिषद म्हणते "एक कीटक जसा आपला एक पाय उचलून पुढील ठिकाणी टाकतो" तितका वेळ लागतो. प्रत्येक दिवशी, प्रत्येक तासात, प्रत्येक निमिषात या ब्रह्मांडात सतत प्राणी उत्पन्न होतात. काही अपवाद ही असतात. जर एखाद्या महान जीवात्म्याला एखाद्या महान घरात जन्म घ्यावयाचा असेल व असा परिवार त्यावेळी उपलब्ध नसेल तेव्हा त्या जीवात्म्याला थोडया काळासाठी ईश्वर आपल्या व्यवस्थेत ठेवतो व योग्य परिवार मिळाल्यास जन्म देतो.

(१८) जीवात्मा आपल्या इच्छेने एक शरीर सोडून बाहेर जाऊ शकतो काय ?
नाही. ईश्वराने या शरीरात असे बांधून ठेवलेले आहे की जो पर्यंत शरीर नष्टभ्रष्ट होत नाही तो पर्यंत तो (जीवात्मा) शरीराबाहेर जाऊ शकत नाही.

(१९) शरीरामध्ये कर्ता कोण आहे ? भोक्ता कोण आहे ?

भ्रमाने लोक शरीरालाच कर्ता मानतात. परंतु तसे नाही आत्मा कर्ता असून भोक्ताही तोच आहे. मग भोजन कोण करतो? केवळ शरीर किंवा केवळ आत्मा खात नाही. आपण कितीही खाल्ले तरी आत्मा तेवढाच राहतो व केवळ शरीरही आत्म्याशिवाय खाऊ शकत नाही. ज्या शरीरात जीवात्मा असतो. तो आपल्या शरीराचे रक्षण करण्यासाठी त्याला खाऊ घालतो परंतु सुख दुःखाची अनुभूती जीवात्म्यालाच होते.

(२०) प्रलयात जीवात्म्याची स्थिती कशी असते ?

प्रलयात बद्ध जीवात्मे मूर्छित अवस्थेत असतात व जे मुक्त जीवात्मे असतात ते आनंदात असतात.

(२१) मृत्यू समयी (जीवात्मा) शरीर कसे सोडतो ?

काही लोकांचे मत असे आहे की जीवात्मा मृत्यूनंतर कानातून , डोळ्यातून, तोंडातून किंवा मस्तक फोडून निघतो. हे मत बरोबर नाही कारण जीवात्मा अति सूक्ष्म आहे. त्याच्यासाठी अवरोधंक नसते तो कुठूनही जाऊ शकतो.

(२२) जीवात्मा दुसऱ्याकडून झालेल्या कर्माचे फळ प्राप्त करू शकतो काय ?

नाही. दुसऱ्याच्या कर्माचे फळ भोगत नाही. परंतु दुसऱ्यानी केलेल्या कर्मामुळे सुख दुःख भोगू शकतो.

(२३) जीवात्मा ईश्वराचा अंश आहे काय ?

जीवात्मा ईश्वरातच राहतो. परंतु त्याचा अंश नाही. जर ईश्वराचा अंश असता तर नेहमी आनंदित राहिला असता, मूर्ख व अज्ञानी राहिला नसता.

(२४) जीव व ईश्वरामध्ये समानता आहे काय ?

साधर्म्यानि जीव व ईश्वरात समानता आहे व वैधर्म्यानि दोन्हीमध्ये भेद आहे.

**समानता :** दोन्ही नित्य, निराकार, अपरिणामी व निरवयवी आहेत.

**दोन्हीमध्ये भेद**

| जीव | ईश्वर |
|---|---|
| एकदेशी | सर्वव्यापक |
| अल्पज्ञ | सर्वज्ञ |
| अल्पशक्तिमान | सर्वशक्तिमान |
| क्लेश, कर्म, विपाक, आशयासहित | क्लेश, कर्म, विपाक, आशय रहित |

# जीवात्मा व शरीरासंबंधी ज्ञान

माणूस आपल्या आत्मस्वरूपाला जाणल्या शिवाय स्वतः सुखी होऊ शकत नाही किंवा इतरांना सुखी करू शकत नाही. आज करोडो व्यक्ती पशूपक्ष्यांमध्ये आत्मा आहे असे मानत नाहीत एखाद्या वस्तूची परिभाषा बदलल्याने व्यवहार बदलतात विपरीत ज्ञानामुळे आज पशू पक्ष्याबाबत अनर्थ घडून त्यांचा नाश होत आहे. आपणही शरीराला आत्माच मानत आहोत, हे आपले अज्ञान आहे.

विश्वविद्यालयात अनेक विषय शिकविले जातात परंतु आत्म्याचा विषय शिकविला जात नाही. ज्या अज्ञानामुळे पशू, पक्षी दुःखी असतात त्यामुळे मानव ही स्वतः दुःखी व अशान्त आहे. त्याला कुठेच स्वस्थता नसते. त्याने कितीही भौतिक उन्नती केली तरीही अस्वस्थता असतेच.

सर्व जीवात्मे स्वरूपाने समानच आहेत. परंतु कर्मानुसार वेगवेगळी योनी मिळते मस्तक हे आपल्या अन्तःकरण मनाचे कार्यालय आहे. मुमुक्षू व्यक्ती मनाला प्रकृतीच्या मार्गाकडून ईश्वराच्या मार्गाकडे वळविते.

शरीराविषयी जोपर्यंत आपले ज्ञान व्यावहारिक, क्रियात्मक जीवनात उतरत नाही तो पर्यंत ते फलदायी होत नाही. जसे वीजेच्या तारेला स्पर्श केल्याने, विष घेण्याने किंवा सपनि दंश केल्यास मृत्यू येतो हे व्यावहारिक ज्ञान असल्यामुळे व्यक्ती त्यापासून आपला बचाव करून घेते.

शरीराविषयी अयथार्थ ज्ञान म्हणजे हे शरीर वृध्द होणार नाही, मरणार नाही असे वाटणे हे शरीर नित्य, पवित्र,चेतन, सुखदायक आहे असे मानून त्याला अत्यंत प्रेम करणे, मोह बाळगणे हे अज्ञान (अविद्या) होय.

**यथार्थ ज्ञान :** हे सुंदर दिसणारे शरीर घाणीचे माहेरघर आहे. यातून प्रत्येक क्षणी घाम, मल इत्यादी निघत असतात. तोंडात एखादा मिष्ट पदार्थ घालून थोडया वेळाने बाहेर काढल्यास पाहावेसे वाटत नाही. जेथे वमन केले तेथे कोणी बसणार ही नाही. शुद्ध वायू ग्रहण करून विषारी वायू सोडला जातो. शरीरावरचे कातडे काढल्यास शरीर पाहणे किंवा चुंबन घेणे कोण पसंत करील ? सुंदर केस खाता येतात का ? ईश्वराची ही कृपा आहे की आपल्या मायेने या शरीरावर सुंदर कातडीने आच्छादित केलेले आहे. यामध्ये मांस, मज्जा, नाडयाचा विस्तार, अस्थिपंजर व मल भरलेला आहे. कुष्ट, देवी इत्यादी रोग झाल्यावर हे शरीर कुणाला आवडेल ?

विवेक जागृत झाल्यानंतर शरीराची आसक्ती समाप्त होईल. कितीही सुंदर शरीर असेल तरी मृत्यू झाल्यावर त्याला कोणीही स्पर्श करणार नाही. शरीराचा उपयोग केला पाहिजे परंतु हे केवळ भोग्य नाही. याच्याव्दारे ईश्वरप्राप्ती करावयाची आहे. त्यात आसक्त न होता त्यागपूर्वक भोग करावयाचा आहे. स्वाध्याय, सत्संग, अभ्यास न केल्यामुळे निश्चयात्मक ज्ञान हे भ्रमात्मक किंवा अभावात्मक ज्ञानात परिवर्तित होते. अनभ्यासामुळे विवेक नष्ट होऊन चोरी, व्यभिचार, हिंसा इत्यांदीना योग्य मानले जाते. सुंदर वस्त्रात असलेल्या सुंदर शरीरावर आसक्त असलेल्या डॉक्टराला त्याच सुंदर शरीराचे ऑपरेशन करताना वासना निर्माण होत नाही. तेथे त्याचा विवेक काम करतो म्हणून कोणत्याही वस्तूबद्दल अत्यंत सूक्ष्म व सखोल ज्ञान प्राप्त केले पाहिजे.

## जीव ईश्वर संबंध

या जगात मानव जे कार्य करतो ते दुसऱ्याशी संबंधित असते. स्वत: तो कोणतेही कार्य स्वतंत्ररूपाने करू शकत नाही. या जगात जी व्यक्ती आपल्याशी संबंधित लोकांना जाणून त्यांच्याशी योग्य व्यवहार करते तीच सफल होते. जर गुरू शिष्य संबंध योग्य नसेल तर विद्या प्राप्त होऊ शकत नाही जो स्वत:शीच योग्य व्यवहार करणे जाणत (स्वप्रतिष्ठा) नाही, तो सफल होऊ शकत नाही.

आत्म्याला ईश्वरानंदाची आवश्यकता आहे. आत्माच आत्म्याचा बंधू किंवा शत्रू आहे. ईश्वर व जीवाचा संबंध पिता पुत्राचा संबंध आहे ''त्वं हि न: पिता वसो त्वं माता शतक्रतो बभूविथ'' (ऋ. ८-९८-११) जर हे समजले तर योगात सफलता प्राप्त होते. जर हे जाणले नाही किंवा ईश्वराशी अयोग्य संबंध जोडला तर विफलता निर्माण होते. सांसारिक माता पित्या पेक्षा ईश्वराचे मातृत्व पितृत्व अधिक आहे. जगात चांगले धार्मिक पुत्र व कन्या आपले माता पिता यांच्याशी चांगले संबंध ठेवतात परंतु त्यांचे ईश्वराशी असेच संबंध आहेत काय ? जर नसतील तर ते विफल होतील. ते ईश्वराशी नाममात्र संबंध ठेवतात. ईश्वराच्या अस्तित्वाबाबत संशय किंवा भ्रम असेल तर त्याच्या बरोबर योग्य व्यवहार कसा करता येईल ? संशय दूर झाल्यावरच ईश्वराशी संबंध जोडण्याची सिद्धता होऊ शकते. आपण तत्त्वाने ईश्वराचे मूल्य मानतो पण व्यवहारात बॅटरीचे मूल्य त्यापेक्षा अधिक मानतो. जोपर्यत व्यवहारात ईश्वराचे मूल्य कळणार नाही तोपर्यत त्याच्याशी संबंध जुडणार नाही. साधकाने शब्द व अनुमान प्रमाणाने ईश्वराला मानले पाहिजे, संशय दूर केला पाहिजे व पुन्हा प्रत्यक्ष प्रमाणाने अनुभव

घेतला पाहिजे.

व्यवहारात प्रयोग, निरीक्षण, परीक्षण करीत राहिले पाहिजे. नाम व नामी यांचे ज्ञान जिज्ञासू व्यक्तीला झाले पाहिजे. नाव व वस्तू या दोन्हींचा अर्थ व त्याचे फळ जाणूनच विद्या प्राप्त होते. आमचा पिता सर्वव्यापक ईश्वर 'ओ३म्' असून तो सर्वरक्षक आहे. त्याच्याशिवाय संसार टिकू शकत नाही. जड पदार्थ व चेतन पदार्थ सर्वजण त्याच्या आश्रयाने टिकलेले आहेत.

(१) **माता, पिता, राजा, गुरू** : वेदामध्ये ईश्वराला जीवाचा स्वामी, सहायक, सुहृद मित्र, माता पिता, राजा व गुरू म्हणून स्वीकारलेले आहे. या जगात हा जीव ईश्वराच्या साह्यानेच मुलांचे रक्षण करतो. या जगातील माता पिता यांच्यापेक्षा श्रेष्ठ माता पिता ईश्वर आहे. लौकिक माता तर मोह व अज्ञानामुळे विपरीत कार्य करणाऱ्या आपल्या बालकालाही संपूर्ण संपत्तीचा मालक बनविते. परंतु ईश्वराने ही धरती आर्यांना दिलेली आहे. ''आर्य ईश्वरपुत्र' (निरुक्त) श्रेष्ठ आज्ञाधारक ईश्वराचे गुण, कर्म, स्वभाव धारण करणाऱ्या उद्योगी माणसांना ही संज्ञा दिलेली आहे. अवज्ञा करणाऱ्या अडाणी संतानांना दिलेली नाही. पित्याच्या आज्ञेप्रमाणे वागणारा तो पुत्र, अन्यथा नाही. कारण ईश्वर आमची माता व पिता आहे. म्हणून जर आम्ही त्याच्या विचारानुसार वागलो तर त्याचे पुत्र, अन्यथा नाही. जर आपण त्याचे पुत्र बनू इच्छितो तर ईश्वराच्या आज्ञा पाळल्या पाहिजेत.

(२) **गुरू शिष्य व स्वामी सेवक संबंध** : ईश्वर आपला गुरू असून आपण त्याचे शिष्य आहोत, ईश्वराचे असे आदेश आहेत की त्यांचे पालन जरूर केले पाहिजे. ईश्वराच्या आज्ञेचे पालन करणे धर्म आहे, विपरीत चालणे अधर्म, अन्याय, अविद्या, अज्ञान आहे. ईश्वर सर्वज्ञ, सर्वशक्तिमान, आनंदाने परिपूर्ण असल्यामुळे कधीही चूक करीत नाही. ईश्वर परिपूर्ण आहे म्हणून आपले न्यून किंवा कमी पूर्ण करण्यासाठी कोणतेही स्वार्थाचे कार्य करीत नाही. परंतु लौकिक गुरूमध्ये ही शक्यता असते. ईश्वर सर्वश्रेष्ठ आहे. त्याचा निर्णय अंतिम असतो. चांगल्या व वाईटाबाबत प्रत्येकाच्या कल्पना वेगवेगळ्या असतात परंतु काय चांगले व काय वाईट याचा अंतिम निर्णय परमगुरू परमेश्वराचाच स्वीकारावा लागतो.

(३) **उपास्य-उपासकाचा संबंध** : ईश्वर उपासना व भक्ती करण्यायोग्य आहे असे जाणून उपासना केल्यास लाभ होईल. एक वैज्ञानिक प्रकृती (विकृती) ची

उपासना आपल्या कल्याणासाठी करतो. तो सांसारिक वस्तूंची उपासना करतो त्यामुळे ही कामना कधी पूर्ण होऊ शकत नाही. कितीही मोठा वैज्ञानिक, धनवान, चक्रवर्ती राजा असेल तरी प्रकृतीचा उपासक कधी पूर्ण सुखी झालेला नाही. एखाद्या बरोबर सुखासाठी संबंध जोडणे ही त्याची उपासना होय. जीव कर्म करण्यास स्वतंत्र, फळ भोगण्यास ईश्वराधीन आहे. हाच जीव व ईश्वर यांचा संबंध आहे.

सांसारिक उपासनेत चार प्रकारचे दु:खमिश्रित सुख मिळेल पण ईश्वराच्या उपासनेने ईश्वराचे विशुद्ध ज्ञान, बल, आनंद प्राप्त होईल. कोणतीही व्यक्ती क्षणभरही ज्ञान, कर्म, उपासना, याखेरीज राहू शकत नाही. एक तर संसाराची उपासना नाही तर ईश्वराची उपासना होऊ शकते.

(४) **व्याप्य-व्यापक संबंध** : जीव ईश्वराचा व्याप्य व्यापक संबंध कोणत्या रूपात असतो ? एका लोखंडाच्या गोळ्याला तापविल्यानंतर अग्नीच्या आत बाहेर तो गोळा अग्नीसारखाच दिसेल गोळा व्याप्य व अग्नी व्यापक आहे. आत बाहेर असणारा अग्नी व्यापक व आत असणारा गोळा व्याप्य होय. ईश्वर सर्वव्यापक असल्यामुळे साधक ईश्वराला कुठे शोधेल ? या सांसारिक जगात ज्या वस्तूला आपण शोधतो ती बहुतेक दूर असते. पण जो व्याप्य व्यापक संबंध जाणत नाही तो ईश्वरालाही जाणत नाही. त्याला तो दूर कुठे तरी शोधून प्राप्त करू इच्छितो. साधकाची पहिली चूक म्हणजे ईश्वराला कुठे तरी दूर शोधतो दुसरी म्हणजे आपल्या जवळ खाली वर उजवीकडे डावीकडे अस स्वीकार करतो पण ईश्वर शरीरातही आहे असे मानत नाही. तिसरी गोष्ट ईश्वर बाहेर आहे असे मानून आपल्या शरीरातही शोधणे सुरू करतो परंतु जीव स्वत: जेथे असतो तेथे स्वत:ला सोडून बाकीच्या शरीरात ईश्वराला शोधतो. कारण त्याला व्याप्य व्यापक संबंधाचे खरे ज्ञान नाही. जेव्हा साधक हे जाणून घेईल की ईश्वर माझ्यातही आहे तेव्हाच तो त्याला प्राप्त करू शकतो. आपल्याला सोडून तो इतर ठिकाणी ईश्वराला शोधेल तर तो कधीही प्राप्त होणार नाही ज्याप्रमाणे समुद्रात डुबकी मारता येते त्याप्रमाणे ईश्वरात मग्न होण्याची विद्या आली पाहिजे. अज्ञान, अधर्म दग्ध करण्याने काष्टरूपी संसार जळून भस्म होतो व ज्ञानाग्नीमध्ये ईश्वर दिसू लागतो शरीर, भोजन, घर, भाऊ, शेजारी, बाजार इत्यादीमध्ये व्यक्तीला ईश्वराचे विस्मरण होते. व्याप्याला व्यापकाच्या प्रभावाने दाबून टाकले पाहिजे. व्याप्याचा प्रभाव समाप्त झाल्यावर व्यापकाचा प्रभाव दिसेल.

# ईश्वराचा संबंध जोडण्याने व्यक्तीची निर्मिती

ईश्वराच्या साह्याखेरीज मानव निर्माण होत नाही. जेथे पाश्चात्यांचे दर्शन संपते तेथे वैदिक दर्शन सुरू होते. ईश्वराचे गुण, कर्म, स्वभाव व वेदाचा आदेश अंतिम आदेश आहे. ईश्वराची आज्ञा पालन करणाऱ्याला कधी कोणी विचलित करू शकत नाही. त्यासाठी एखाद्या वेळी मृत्यू झाला तरीही चालेल. सत्याला जाणणाऱ्या पाच कसोटया आहेत.

(१) जे जे ईश्वराच्या गुण, कर्म, स्वभावाला व वेदाला अनुकूल असेल ते ते सत्य त्याविरूद्ध ते असत्य

(२) जे जे सृष्टिक्रमाच्या अनुकूल ते ते सत्य व त्याविरूद्ध ते असत्य. जर एखाद्याने म्हटले 'माता पिता यांच्याशिवाय पुत्र झाला' असे कथन सृष्टिक्रमाच्या विरूद्ध असल्यामुळे सर्वस्वी असत्य मानले पाहिजे.

(३) 'आप्त' अर्थात धार्मिक, विद्वान, सत्यवादी, सत्यमानी, निष्कपटी व्यक्तीच्या उपदेशानुकूल असले पाहिजे.

(४) आपल्या आत्म्याची पवित्रता, विद्या यांच्या अनुकूल अर्थात् जसे आपल्याला सुख प्रिय व दुःख अप्रिय असते तसेच सर्वत्र समजावे.

(५) **आठ प्रमाण :** प्रत्यक्ष, अनुमान, उपमान, शब्द, ऐतिह्य, अर्थापत्ती सम्भव व अभाव यांच्या अनुकूल म्हणून जे सत्य आहे त्यावर दृढ राहावे. असत्याला बिलकुल थारा देऊ नये. सत्य जाणणे, मानणे, करणे हे ईश्वराचेच काम आहे. आपण सत्याच्या मार्गाने चालावे, ईश्वराचा निषेध न करता आदेश मानवा, चांगले कार्य करून धन प्राप्त करावे जो स्वतःचे खोटे कर्म, छलकपट, कुवासना, अविद्या, चोरी इत्यादी सहजतेने मान्य करतो. तो इतरांच्याही चोरी वगैरे दुर्गुणांना मान्यता देतो. आपले दोष दूर केल्यास इतरांचे दोषही दूर करता येतात. जेव्हा आमचा पिता, माता, आचार्य, राजा ईश्वरच आहे. तेव्हा हा क्षुद्र मानव कुणाचे किती नुकसान करू शकेल ? म्हणून सत्याची कास धरा अन्यथा विनाशाच्या गर्तेत पडाल.

# वैदिक धर्मात प्रकृतीचे स्वरूप

 

प्रकाश क्रिया स्थितिशीलं भुतेन्द्रियात्मकं भोगापवर्गार्थं दृश्यम् ।
(योग दर्शन २/१८)

मूळ रूपाने प्रकृती त्रिगुणात्मक आहे म्हणून दृश्य कार्य प्रकृती ही तीन गुणांनी युक्त असते. कारण कारणाचे गुणच कार्यात येतात. सत्त्वगुण प्रकाशात्मक, रजोगुण, क्रियाशील प्रवृत्ती करणारा व तमोगुण स्थितिशील, प्रकाश व क्रिया यांना स्थिर करणारा असतो. हा दृश्याचा स्वभाव असतो. त्यानंतर त्याचे स्वरूप भूतेन्द्रियात्मक असणे हे होय. भूत या शब्दाने सूक्ष्म व स्थूल दोन्ही प्रकारच्या भूतांचे ग्रहण होते. इंद्रिय शब्दाने बाह्य व आंतरिक दोन्ही इंद्रियांचे ग्रहण होते या प्रकारे महत्तत्त्व, अहंकार, पाच सूक्ष्मभूत, अकरा इंद्रिये व पृथ्वी इत्यादी पाच स्थूल भूतापर्यंत सर्व प्रकृती विकृतीचे स्वरूप कळते. संपूर्ण कार्यरूप जगताला 'दृश्य' म्हटले जाते.

**दृश्याचे प्रयोजन** :- या दृश्य जगाचे प्रयोजन म्हणजे पुरुषाला भोग व अपवर्ग प्राप्त करून देणे होय. बुद्धीच्या साहयाने जीवात्मा हे दोन्ही प्राप्त करतो. म्हणून हे बुद्धिकृत म्हटले जातात. परंतु बुद्धी अचेतन असल्यामुळे स्वतः प्रवृत्त होत नाही पुरुषाच्या प्रेरणेमुळेच बुद्धीचा संपूर्ण व्यापार होत असल्यामुळे बुद्धिकृत भोग व अपवर्ग पुरुषच भोगतो. जसे राजाच्या आज्ञेप्रमाणे योध्दे लढाई करतात परंतु त्याचा परिणाम 'हार जीत' ही राजाचीच मानली जाते. योद्ध्यांची नाही.

जीवात्मा जेव्हां बाहय विषयांशी संपर्क करण्याची कामना करतो तेव्हा तो बुद्धीने निश्चय करून मनाला व बाहय इंद्रियांना प्रेरित करतो. या प्रमाणेच इंद्रियांनी जे ज्ञान प्राप्त होते ते मनाव्दारे बुद्धीला व बुद्धीव्दारे पुरुषाला मिळते म्हणून या पुरुषाच्या अतिशय जवळ राहणारी बुद्धी पंतप्रधानाप्रमाणे असते. परंतु आपण भ्रमाने बुद्धीला भोक्ता मानतो.

प्रकृतिजन्य प्रत्येक कार्यवस्तूमध्ये हे त्रिगुण (सत्त्व, रज, तम) मुख्य व गौण भावाने राहतात एका वेळी एकच गुण मुख्य असल्यामुळे तो दुसऱ्या गौण गुणांवर मात करतो व आपला प्रभाव टाकतो. हे सर्व वेगवेगळे असून आपली शक्ती कायम ठेवून मुख्य गुणांबरोबर सहकार्याच्या भावानेच कार्य करतात. गौण रूपाने राहणारे गुण योग्य संधी मिळताच, उपयुक्त निमित्त मिळताच आपापले कार्य प्रकट करण्यास समर्थ होतात म्हणून शांत व मूढ परिणामांचा क्रम न्यूनाधिक रूपाने सदैव चालतो.

"बुद्धेरेव पुरुषार्थऽ परिसमाप्तिर्बन्धः"
(व्यास भाष्य)

# प्रवाहाने अनादी संसार चक्र

**संपादक ज्ञानेश्वरार्य,**
दर्शन योग महाविद्यालय,
आर्यवन, रोजड सागपुर,
(साजरकांठा) गुजरात




**प्रमाण -**

"सत्त्वरजस्तमसां साम्यावस्था प्रकृतिः प्रकृतेर्महतोऽहङ्कारात्पञ्चतन्मात्राज्युभयामिन्द्रियं, तन्मत्रेभ्यः स्थूलभूतानि, पुरूष इति पञ्चविंशतिर्गणः"

(सांख्यदर्शन १-६१)

**प्रमाण -**

ओ३म् शतं तेऽयुतं हायनान् द्वे युगे त्रीणि चत्वारि कृष्मः ।
इन्द्राणी विश्वे देवास्ते ऽनु मन्यत्तां हृणीयमनाः ॥

(अथर्ववेद ८-२-२१)

**आयुत = १०,००० (दहा हजार)**

**पर कल्प ४,३२,००,००,००० वर्षे (संवत २०४७ चे १० कालचक्र)**

 

अर्थात् बुद्धी इत्यादी जे सूक्ष्म शरीराचे घटक आहेत ते जन्मजन्मान्तरी पुरुषाबरोबर राहतात. पुरुष त्यांच्या साहयानेच सुख दुःखाचा भोग करतो. म्हणून मोक्ष होईपर्यंत बुद्धी इत्यादी पुरुषांसाठी कार्य करतात व त्यांच्या कार्याची समाप्ती न होणे हेच पुरुषाचे बंधन आहे ''तदर्थावसानो मोक्ष'' (व्यास भाषा) अर्थात् जेव्हा विवेकख्याती होते तेव्हाच बुद्धीचे कार्य संपते व पुरुष आपल्या स्वरूपाला समजून घेतो. म्हणून प्रकृतीच्या संपर्कापासून पृथक होणेच पुरुषाचा ''मोक्ष'' म्हटला जातो.

सत्वरजस्तमसां साम्यावस्था प्रकृति प्रकृतेर्महान् महतोऽ हंकारो ऽ
हंकारात्पञ्चतन्मात्राण्युभयमिन्द्रियं तन्मात्रेभ्य ;स्थूलभूतानि पुरुष इति
पञ्चविंशतिर्गणः।

(सांख्य द. १/६१)

अर्थात् सत्त्व, रजस, तमस् या तीन वस्तुंच्या संघाताचे नाव प्रकृती आहे. प्रकृतीपासून महत्तत्त्व = बुध्दी, बुध्दिपासून अहंकार त्यापासून पाच तन्मात्रा (सूक्ष्मभूत) व दहा इंद्रिये आणि अकरावे मन, पाच तन्मात्रांनी पृथ्वी इत्यादी पाच स्थूल भूत हे चोवीस व पंचविसावा पुरुष (जीवईश्वर) हा समूह आहे.

ईश्वर सृष्टिकर्ता, जीवभोक्ता व प्रकृती भोग्या आहे. सृष्टी एक महायज्ञ आहे. तिची रचना करणाऱ्या ईश्वराने (ओ३म्ने) अनंत कोटी ब्रह्मांड रचलेले आहे. या संपूर्ण सृष्टीचा राजा परमेश्वर आहे. तो महान असून प्रकृती सूक्ष्म व जड आहे. ती ईश्वराच्या आधाराने राहते. ईश्वर महान व सूक्ष्म आहे.

बालकाच्या जन्मासाठी माता-पिता केवळ कर्म करतात पण निर्मिती ईश्वर करतो. माता भोजन करते; पण स्तनात दूध ईश्वरच निर्माण करतो.

## सृष्टिरचना

दोन अब्ज वर्षांपूर्वी ही पृथ्वी सूर्य चंद्र वगैरे काही नव्हते. बद्ध जीवात्म मूर्छित अवस्थेत होते. जशी झोपेत काही अनुभूती नसते तशी प्रलयकाळीही ती नसते. सत्त्व, रज तम कणांना एकत्र करून ईश्वराने आपले ज्ञान व सामर्थ्य यांनी महत्तत्त्व, अहंकार नंतर पाच ज्ञानेंद्रिये, पाच कर्मेंद्रिये, मन व पाच तन्मात्रा (सूक्ष्मभूत) एकूण अठरा तत्त्वे पुन्हा पाच भूतांपासून सूर्य, चंद्र, तारे, पृथ्वी इत्यादी स्थूल जग बनविले. वनस्पती, मासे, कीटक, पतंग, पशू इत्यादी नंतर शेवटी माणसाच्या शरीराची रचना झाली. संपूर्ण माणसे तरुणच उत्पन्न झाली व अमैथुनी सृष्टीची निर्मिती झाली.

प्राण्यांची उत्पत्ती चार प्रकारची आहे

 

(१) जरायुज - मनुष्य, पशू इत्यादी
(२) अण्डज - पक्षी, कीटक इत्यादी
(३) उद्भिज - वृक्ष इत्यादी
(४) स्वेदज - घामातून उवा, गव्हातील कीडे इत्यादी.

ईश्वराने अग्नी, वायू, आदित्य, अंगिरा या चार ऋषींना चार वेदांचे ज्ञान दिले. अमैथुनी सृष्टीची निर्मिती होऊन १ अब्ज, ९६ कोटी, ८ लाख, ५३ हजार १०० वर्षे झाली. ४ अब्ज ३२ कोटी वर्षे या सृष्टीचे एकूण वय आहे. त्यानंतर विनाशाची प्रक्रिया होईल, त्याचा विचार करूनच वैराग्याची भावना जागृत करता येते. जीवन व पृथ्वीचा आधार असलेली ''सूर्याची उष्णता'' दोन अब्ज काही वर्षांपर्यंत कमी होत जाईल तेव्हा यावर आधारित माणूस, पशू, पक्षी, कीटक, वनस्पती इत्यादी हळूहळू क्षीण होत जातील व नष्ट होतील. या उत्पत्ती प्रलय प्रक्रियेने संसाराची नश्वरता समजून येते व प्रलयावस्थेचे संपादन करून वृत्ती निरोध करून जीवात्मा ईश्वराला शरण जाऊन समाधी प्राप्त करून घेऊ शकतो.

## संसारासंबंधी व्यावहारिक ज्ञान

जोपर्यंत माणसाची या संसाराबद्दलची तृष्णा समाप्त होत नाही तोपर्यंत ईश्वराबद्दल भक्ती (श्रध्दा) निर्माण होत नाही. जोपर्यंत या संसाराला जाणण्याने, दर्शन करण्याने तृप्ती होणार नाही तोपर्यंत यापासून सुटका होणार नाही. सूक्ष्म दृष्टीने विचार केल्यास रंग व आकार यामध्ये थोडे बहुत अंतर आढळेल ; परंतु भूगोलावरील सर्व प्राणी (माणसे) एकसारखेच आहेत. जन्माची प्रक्रिया एकसारखीच आहे .उलट सुलट काम करण्याच्या सवयी सारख्याच आहेत. अन्याय, शोषण, शत्रू, मित्र सर्वत्र सारखेच आहेत. याचप्रमाणे सर्व देशांमध्ये पशू-पक्षीही समान आहेत. जसे जल, नदी, पर्वत, वाळवंट, लिंब, पिंपळ, भाजीपाला, जंगल, वनस्पती येथे जशा आहेत तशाच युरोप, अमेरिकेतही आहेत. याप्रकारे विचार केल्यास जगदर्शनाची तृष्णा समाप्त होईल. झोपडीत बसूनही योगी अनुमान प्रमाणाने जग जाणण्याची इच्छा पूर्ण करू शकतो.

कोणताही पदार्थ आपला गुण सोडत नाही. कोणतीही वस्तू अकस्मात नसतेच. जी वस्तू संघातरूप असते ती संयोगानेच बनलेली असते. जसा कपडा, घर संघातरूपानेच बनलेला असतो. संयोगाने बनलेल्या वस्तुंचा वियोग होतोच. पृथ्वी संघात रूपानेच बनलेली आहे. ती निश्चितपणे पृथक पृथक होणार ! ज्याने बनविलेली आहे तोच तिचा नाश करील.

 

# पदार्थ

ईश्वर, जीव, प्रकृती स्वरूपाने अनादी आहेत. हा संसार व जीवांचे कर्म प्रवाहाने अनादी आहेत हे कधी संपत नाहीत. हे जग व जगातील पदार्थ संयोगामुळे उत्पन्न होतात व विनाश पावतात. त्यांचे संघटन व विघटन होत असते. पाप-पुण्य बरोबर झाल्याने मनुष्य जन्म प्राप्त होतो. संस्कार नष्ट (दग्धबीज) करण्याने आत्मा शुद्ध होऊन त्याला मुक्ती मिळते. शुद्ध ज्ञान, शुद्ध कर्म, शुद्ध उपासना यांनी मुक्ती प्राप्त होते. सृष्टीचा संपूर्ण नाश कधीच होत नाही. बध्द जीव प्रलयामध्ये मूर्छित अवस्थेत असतात. मुक्त जीव ईश्वराच्या सान्निध्यात ज्ञानानन्दात राहतात.

# भोग

संसार भोगल्यावर खात्री पटते की यात पूर्ण सुख नाही म्हणून संसाराला कमीत कमी (अति आवश्यक) भोगावे. संसार 'सत्' आहे. तो भोगण्यासाठी आहे; पण त्यात बुडू नये, तरून जावे. सर्व काही ईश्वराचे मानून कर्तव्य पालन करीत त्याग भावनेने उपयोग करून घ्यावा. भोग्य वस्तू स्वतःच्या न मानता त्यांचे केवळ पालन, पोषण, रक्षण हे कर्तव्य मानावे. आपण गाईचे दूध पितो व तिला चारा-पाणीही देतो तसे पालन, पोषण, रक्षण हे आपले कर्तव्य मानावे.

# पञ्च क्लेश

अविद्यास्मिता रागद्वेषाभिनिवेशः पञ्चक्लेशाः । (यो. २/३) चित्ताच्या पाच वृत्तींना (प्रमाण, विपर्यय, विकल्प, निद्रा, स्मृती) यथायोग्य रोखण्याने व यागसाधनेमध्ये संपूर्ण दिवस प्रवृत्त राहण्याने हे पाच क्लेश नष्ट होतात. जेव्हा या क्लेशांचा प्रवाह चालू असतो तेव्हा प्राणी त्रस्त असतात. हे क्लेश सत्त्वादी गुणांच्या सहकार्याने चित्ताला भोगोन्मुख करतात. हे क्लेश कर्मांचे व कर्म क्लेशांचे परस्पर सहाय्यक बनून प्राण्यांच्या कर्म विपाक = कर्मफलांना अर्थात जाती, आयू, भोग व भोगांना प्रकट करतात.

(१) **अविद्या** : विद्येपेक्षा वेगळे अयथार्थ ज्ञानच अविद्या आहे. अविद्येचे क्षेत्र अत्यंत विस्तृत व महान आहे. तरीही या चार विभागांच्या मध्ये अविद्येचा समावेश होतो. अनित्याशुचि दुःखानात्मसुनित्य शुचिसुखात्मख्यातिर विद्या (यो. द. २/५)

(अ) **अनित्य** : शरीर वगैरे स्थूल पदार्थ व लोक लोकांतर हे नित्य आहेत असे

समजणे व जे नित्य पदार्थ अर्थात् ईश्वर, जीव, प्रकृती (जगाचे कारण असणारी) यांना अनित्य समजणे.

(ब) **अशुची :** मलमूत्रांचा समुदाय असलेल्या, दुर्गंधीरूपी मलाने परिपूर्ण असलेल्या शरीराला पवित्र मानणे आणि तलाव, विहीर, कुण्ड किंवा छोटी विहीर व नदी हे तीर्थ समजून पापापासून मुक्त होण्याचा प्रयत्न करणे व त्यांचे जल प्राशन करणे. एकादशी इत्यादी खोटी व्रते करून भूक-तहान इत्यादी दुःखांना सहन करणे, स्पर्श इंद्रियांच्या भोगात अत्यंत प्रीती असणे इत्यादी अशुध्द पदार्थांना शुध्द मानणे व सत्यविद्या, सत्यभाषण, धर्म, सत्संग, परमेश्वराची उपासना, जितेन्द्रियता, सर्वोपकार, सर्वांबरोबर प्रेमभावना इत्यादी शुध्द व्यवहार व पदार्थ यांच्यामध्ये अपवित्र बुध्दी ठेवणे.

(क) **दुःखात सुखाची बुध्दी :** अर्थात् विषयतृष्णा, काम, क्रोध, लोभ, मोह, शोक, इर्षा,द्वेष इत्यादी दुःखस्वरूप व्यवहाराद्वारे सुख मिळण्याची आशा करणे, जितेन्द्रियता, निष्कामता, शम, संतोष, विवेक, प्रसन्नता, प्रेम, मित्रता इत्यादी सुखरूप व्यवहारांत दुःखबुध्दी ठेवणे.

(ड) **अनात्मामध्ये आत्मबुध्दी :** अर्थात् जडांमध्ये चेतन व चेतनामध्ये जड भावना करणे अविद्येचा चौथा भाग होय. अविद्येपेक्षा विपरीत असा पदार्थ म्हणजे जो पदार्थ जसा आहे तो तसाच समजणे ही विद्या होय. यामुळे जीव बंधनातून मुक्त होऊन मुक्तीचा आनंद प्राप्त करतो.

(२) **अस्मिता :** बुध्दी (मन = चित्त) यांना आत्म्यापेक्षा वेगळे न मानणे.

(३) **राग :** सुखात प्रीती हा राग होय.

(४) **द्वेष :** दुःखात अप्रीती हा द्वेष होय.

(५) **अभिनिवेश :** सर्व प्राणीमात्रांची नेहमी अशी इच्छा असते की मी सदैव शरीरात राहावे, मरू नये. मृत्यूचा या दुःखाला अभिनिवेश असे म्हटले आहे. या पाच क्लेशांना योगाभ्यास विज्ञानाने नष्ट करून, ब्रह्मप्राप्ती करून मुक्तीचा परम आनंद भोगला पाहिजे.

**क्लेशांची अवस्था पाच प्रकाराची असते.**

(१) **प्रसुप्त :** जन्मजन्मांतरी भोगलेल्या भोगांचे संस्कार निद्रिस्त असतात.

(२) **तनु :** सतत सत्संग, उपदेश इत्यादींनी दुर्बल झालेले संस्कार .

(३) **विछिन्न :** एक संस्कार प्रबळ होतो त्यावेळी विपरीत दबलेला असतो.जसे द्वेषाच्या स्थितीत प्रेम न उत्पन्न होणे.

(४) **उदार :** प्रकट स्थिती जसे तरुणपणी प्रेम.

(५) **दग्धबीज भाव :** योगात विशिष्ट सिध्दी प्राप्त झाल्यावर जळालेल्या दाण्याप्रमाणे स्थिती.

## संसारात शाश्वत सुख नाही

जोपर्यंत संसारात दुःखाची अनुभूती होणार नाही, त्याचा उबग येणार नाही. तोपर्यंत ईश्वराचे सुख, ज्ञान, बल, आनंद यामध्ये रुची उत्पन्न होणार नाही. संसारात सुख आहे पण पूर्ण सुख नाही. कोणते ना कोणते दुःख असतेच, जे थोडे सुख असते तेही दुःखमिश्रित असते म्हणून बुद्धिमान ऋषी लोक त्याला ही दुःख मानून आसक्तीचा त्याग करतात व पूर्ण सुख (मुक्ती, ब्रह्मानंद, ईश्वरप्राप्ती) इच्छितात.

(१) कुत्रापि कोऽपि सुखी न (सांख्य ६/७) अर्थात्
या जगात कुठेही कुणीही पूर्ण सुखी नाही.

(२) विविध बाधनायोगाद् दुःखमेव जन्मोत्पत्तिः (न्याय ४-१-५५) अनेक प्रकारच्या दुःखांचा संबंध असल्यामुळे शरीरात येणे (जन्म घेणे) दुःखच होय.

(३) अथाऽतो ब्रह्मजिज्ञासा । (वेदान्त १-१-१) संसार भोगून झाला, दुःखच दुःख आहे. आता ब्रह्माला जाणण्याची इच्छा बाळगली पाहिजे.

(४) आत्मेन्द्रियमनोऽर्थ सन्निकर्षात् सुख-दुःखे (वैशे. द. ५-२-१५) आत्मा जेव्हा मन, इन्द्रिये व विषय यांच्याबरोबर संबंधीत असतो तेव्हा सुख-दुःखांची उत्पत्ती होते.

(५) परिणाम ताप संस्कारदुःखेर्गुणवृत्तिविरोधाच्च दुःखमेव सविवेकिनः(यो२-१५)

या जगात जे पदार्थ असतात त्यात विवेकी व्यक्तीसाठी चार प्रकारचे दुःख मिसळलेले आहे. भोग भोगून मी तृप्त होईन ही भावना मिथ्या आहे. इंद्रियांचे सामर्थ्य शिथील किंवा समाप्त झाल्यानंतरही मनाची भोगण्याची इच्छा शिल्लक असते हे परिणाम दुःख होय. भोगण्यासाठी तयार परंतु त्यात बाधा येण्याने कोणी बाधक झाला तर ते 'ताप दुःख' जसे चांगला पुत्र असेल तर तो बिघडू नये, कुकर्मी होऊ नये हे 'ताप दुःख' संयोगानंतर वियोग हे तापदुःख.

भोगताना आपण सुख-दुःखाची अनुभूती करतो, त्याची छाप चित्तावर पडते व

पुन्हा भोगण्याची इच्छा होते. तोच भोग जर मिळाला नाही किंवा कमी मिळाला, हलका भारी किंवा वेळेवर मिळाला नाही तर दुःख होते हे संस्कार दुःख होय व 'गुणवृत्तिविरोध दुःख' सत्त्व, रज, तम, गुण हे परस्पर विरोधी असल्यामुळे कधी एखादा विचार तर कधी दुसराच विचार, काय करावे व काय करू नये. तसेच पाप-पुण्याच्या वृत्तिविरोधी संघर्षामुळे दुःख होते.

(६) . न वै सशरीरस्य सतः प्रियाऽप्रिय योरपहतिरस्ति (छांद. उप. ८-१२-१)

जोपर्यंत शरीर असते तोपर्यंत सांसारिक सुख-दुःख झाल्याशिवाय राहात नाही. निष्काम भावनेने काम करून सुख दुःखाची अनुभूती न घेतल्यास दुःख त्रास देणार नाही. जसे ऋषीमुनींना ते होत नाही. विपरीत दुःखाची अनुभूती योगावस्थेत होत नाही.

## उपसंहार

मी, माझा, यांचा संबंध इतका दाट आहे की, व्यक्ती एक क्षणभरही त्यापासून दूर होऊ शकत नाही. हा स्व-स्वामी संबंध संपल्याखेरीज ईश्वर प्राप्तीमध्ये रुची उत्पन्न होऊ शकत नाही. हे शरीरही आपले नाही आपण त्याचा वापर करणारे आहोत, मालक नाही. जेथे ममत्व तेथे अविद्या व जेथे अविद्या तेथे दुःख आहे. या संपूर्ण पिण्ड व ब्रह्मांडाला बनविणारा स्वामी ईश्वर आहे. इराकमध्ये लाखो लोक मेले, कोणी रडले नाही. पंजाब-काश्मीरमध्ये रोज कितीतरी मारले जातात तेव्हा कोणी रडत नाही; परंतु आपल्या व्यक्तीचा मृत्यू झाल्यास काय अवस्था होईल ? हाच स्व-स्वामी संबंध होय.

ईश्वर, जीव, प्रकृतीचे यथायोग्य ज्ञान (विवेक) झाल्यानंतर व व्यावहारिक अनुभूती प्राप्त झाल्यानंतर इतर काही जाणणे शिल्लक राहात नाही. उपनिषदामध्ये म्हटले आहे 'जे जाणून घेतल्यानंतर काही जाणणे शिल्लक राहात नाही' जीव, ज्ञान, बल, आनंद प्राप्त करू इच्छितो. ईश्वराला जाणल्यानंतर जीवाला सर्व काही मिळते.

व्यक्ती प्रकृती विकृतीला जाणून स्वतःच्या आत्म्याला ही जाणू शकते ; परंतु जेव्हा ती ब्रह्माला जाणते तेव्हाच ती कृतकृत्य होते. तिची पूर्ण तृप्ती होते. ब्रह्माच्या प्राप्तीनंतर प्राप्त करण्यायोग्य काहीही राहात नाही.

भिद्यते हृदयग्रन्थिश्छिद्यन्ते सर्व संशयाः।
क्षीयन्ते चास्य कर्माणि तस्मिन् दृष्टे परावरे (मु.उप २-२-८)

अत्यंत दूर व अत्यंत जवळ असलेल्या ईश्वराचा साक्षात्कार झाल्यानंतर आत्म्याची अविद्या नष्ट होते. संपूर्ण संशय नष्ट होतात. संपूर्ण कुसंस्कारांचा नाश होतो.

# कर्म

कर्माची परिभाषा व लक्षण :- सुखाच्या प्राप्तीसाठी व दुःखापासून सुटका करून घेण्यासाठी जीवात्मा, मन, इंद्रिये, शरीराने जो प्रयत्न करतो ते 'कर्म' होय.

**कर्माचे भेद :** कर्माशुक्लाकृष्णं योगिनास्त्रेविधमितरेषाम् (यो.द. ४/७)
योग्याचे कर्म अशुक्लाकृष्ण (निष्काम) कर्म असते व इतर संसारी माणसांचे तीन प्रकारचे (१) शुक्ल = सकाम, शुभ कर्म (२) कृष्ण = अशुभ कर्म (३) शुक्ल कृष्ण = मिश्रित कर्म असते.

कोणतेही कर्म निष्फळ नसते. कर्माचे फळ कर्ताच भोगतो, इतर कोणी नाही. सिध्दांताची तात्त्विक समज असलेला पवित्र मनुष्यच मुक्ती प्राप्त करू शकतो. ब्रह्मज्ञानी जीवनभर संसाराचा उपकार करण्यात गुंतलेला असतो.

योगी रागद्वेषांनी रहित कर्म करतो ते निष्काम कर्म होय. कर्तव्य भावनेने ईश्वराच्या आज्ञेनुसार व ईश्वरप्राप्तीला लक्ष्य ठरवून जे शुभ कर्म केले जाते ते निष्काम कर्म होय. परोपकार इत्यादी शुभ कर्मांबरोबरच ईश्वराची उपासना सुध्दा आवश्यक आहे. केवळ परोपकार इत्यादी कर्मानेच मुक्ती मिळत नाही; परंतु मुक्तीमध्ये हे सहाय्यक असतात.

**फळाच्या दृष्टीने भेद :** (१) क्रियमाण- जे कर्म सध्या केले जाते.
(२) संचित - जे कर्म केलेले आहे.
(३) प्रारब्ध - ज्या कर्माचे फळ प्राप्त होत आहे.

**साधनांच्या आधाराने भेद :** (१) शारीरिक (२) वाचिक (३) मानसिक
कर्त्याची परिभाषा :- कर्त्तुम्, अकर्त्तुम् अन्यथाकर्त्तुम् यः स्वतंत्र स कर्ता - अर्थात जी व्यक्ती एखादे कार्य करण्यास, न करण्यास् किंवा विपरीत करण्यास स्वतंत्र आहे तिलाच कर्ता म्हटले जाते.

 

## कर्मांची संख्या

दहा शुभ (शुक्ल) व दहा अशुभ (कृष्ण)

| | शरीराने | वाणीने | मनाने |
|---|---|---|---|
| शुभ | १. रक्षण<br>२. दान<br>३. सेवा | ४. सत्य<br>५. मधुर<br>६. हितकर | ७. सार्थक<br>८. दया<br>९. अस्पृहा (अनिच्छा)<br>१०. आस्तिकता |
| | शरीराने | वाणीने | मनाने |
| अशुभ | १. हिंसा<br>२. चोरी<br>३. व्यभिचार | ४. असत्य<br>५. निंदा<br>६. कठोरता | ७. व्यर्थ<br>८. द्रोह<br>९. स्पृहा<br>१०. नास्तिकता |

## कर्माचे फळ परिणाम व प्रभाव

आपण केलेल्या कर्माचे फळ मिळते व दुसऱ्याच्या कर्माचाही परिणाम व प्रभाव होतो.

एका लहान मुलाचे अज्ञानामुळे ब्लेडने बोट कापले जाते हा 'परिणाम' होय. दुसरा बालक त्याचे रक्त पाहून रडतो हा प्रभाव. आई येते व त्याला मार देते हे कर्माचे फळ होय.

## कर्माचे फळ जाती, आयू व भोग

**जाती** : योनी - जशी मनुष्य, पशू, पक्षी वगैरे.

**आयू** : जन्मापासून मृत्यूपर्यंतचा काळ जसे कीटक, पतंग यांचे आयुष्य काही तास तर पशू-पक्ष्यांचे काही वर्षे. मनुष्याचे आयुष्य शंभर वर्षे. माणूस आपले आयुष्य एका मर्यादेपर्यंत वाढवू शकतो. अमक्या दिवशी इतके वाजता मृत्यू येईल या दृष्टीने आयुष्य निश्चित नसते.

**भोग** : सुख-दुःखाची साधने प्राप्त होणे हे योनी (शरीर) नुसार होते. मांस खाणारे वाघ वगैरे, गवत खाणारे गाय, घोडे इत्यादी. अन्न,फळे, वनस्पती खाणारी माणसे.

# कर्मफळ विवरण

संपादक ज्ञानेश्वरार्य,
दर्शन योग महाविद्यालय,
आर्यवन, रोजड सागपुर,
(साजरकांठा) गुजरात

१) नष्ट होणे – या कर्माचे फळ मुक्ती भोगून परतल्यावर प्राप्त होणे अर्थात, ते कर्म मोक्षाचे फळ पूर्ण होईपर्यंत नष्ट होणे

(२) एकत्र मिळून फळ देणे
शुभ कर्मांच्या फळ (सुख) बरोबर अशुभ कर्मांचे फळ (दुःख) ही मिळणे
अशुभ कर्माचे फळ दुःख सोबतच शुभ कर्माचे फळ सुखही मिळणे

(३) कर्म दबून राहणे
तात्पर्य –
मृत्यूच्या वेळी ज्या योनीचे कर्म अधिक तीच योनी ईश्वर देईल अन्य योनीचे कर्म दबून राहील, ज्या योनीत त्या कर्मांचे प्रमुखत्व नसेल.

(४) धनसंपत्ती भोग्य पदार्थात वृद्धी आयु वाढणार नाही.
(३) आयू वाढेल धन इत्यादी भोग पदार्थ वाढणार नाहीत.
(२) आयू व भोग्य पदार्थ दोन्ही वाढतील किंवा कमी होतील.

१) जाती: – मनुष्य, पशु, पक्षी कीटक, पतंग स्थावर इत्यादी योनी
२) आयू – जशी जाती त्यानुसार आयू
३) भोग – जशी जाती तसा भोग अर्थात, सिंह इत्यादी प्राणी मांसाहारी गाय इत्यादी तृणहारी मनुष्य शाकाहारी

तात्पर्य:– जोपर्यंत अविद्या राहील तोपर्यंत कर्माचे फळ जाती, आयू, भोग निरंतर मिळतील.

तात्पर्य:– जेव्हा अविद्या नष्ट होते तेव्हा (जीवनमुक्त व्यक्तीचा) कर्मांचे फळ जाती, आयू व भोग या रूपात मिळत नाही. ती कर्मे मुक्तीचे स्तर उंचावणारे असतात

प्रमाण -

क्लेशमूल: कर्माशयो दृष्टादृष्ट जन्मवेदनीय: ।

योगदर्शन २-१२

सति मूले तद् विपाको जात्यायुर्भोगा: ।

योगदर्शन २-१३

 

**एकत्रित फळ प्राप्त होणे** : एका कर्माचे फळ सुख व दुसऱ्या कर्माचे फळ दुःखही एकाच वेळी मिळते. जसे घरात फ्रीज, टी.व्ही.ने सुख मिळते पण त्याचबरोबर रोगामुळे दुःखही भोगावे लागते. कर्मफळाचा नाश होणे म्हणजे मुक्ती काळापर्यंत पूर्वीच्या न भोगलेल्या कर्माचे फळ आतापर्यंत प्राप्त न झाल्यामुळे मुक्तीकाळ संपल्यानंतर भोगणे

.

व्यक्तीने स्वतःच शिक्षा भोगली किंवा माता, पिता, गुरू, राजा इत्यादींकडून शिक्षा झाल्यास त्या कर्माचे फळ ईश्वराकडून मिळत नाही जर न्यूनाधिक मात्रेमध्ये शिक्षा झाल्यास किंवा घेतल्यास उरलेले फळ ईश्वर देतो. कर्माची वासना (संस्कार) समाप्त केल्यास सकाम कर्म होणार नाही त्या निष्काम कर्माचे लौकिक फळ मिळणार नाही. जीवन्मुक्त योग्याला त्याच्या पूर्वी केलेल्या कर्माची शिक्षा मिळते तरी ज्ञानाच्या उच्च स्तरामुळे ती तो सहज स्वीकारतो. कर्मांवर काळाचा प्रभाव पडत नाही. शुभ कर्म करतानाही जर चांगले फळ मिळत नसेल तर समजावे की कर्मविधीमध्ये काही तरी चूक असली पाहिजे. कर्ता आळशी आहे अथवा साधन उपयुक्त नाही. मुक्तीसाठी संपूर्ण कर्मफलांचा नाश होणे आवश्यक नाही पण अविद्येचा नाश होणे जरूरी आहे.

## कर्म करीत जीवन जगणे

कोणताही मनुष्य एक क्षणही कार्य केल्याशिवाय राहू शकत नाही. मन, वाणी, शरीर या तीन प्रकारच्या साधनांनी माणूस कोणत्या ना कोणत्या इच्छेची पूर्तता करू इच्छितो किंवा इच्छा सोडून देऊ इच्छितो. जीवात्म्याचे कर्म प्रवाहाने अनादी आहे व ते त्याच्या बरोबरच असते. जे मुक्त जीव सृष्टीमध्ये फिरत आहेत त्यांच्या पूर्वीच्या कर्माची फळे ही भोगणे शिल्लक असतात. कर्म भिन्न असतात व संस्कार भिन्न असतात. पुरूषार्थाने कर्माचे संस्कार नष्ट करता येतात. आज सुध्दा जर चांगल्या वाईट सकाम कर्मांच्या संस्कारांना दग्धबीज करून निष्काम कर्म करीत राहिल्यास मुक्ती प्राप्त होईल.

वेदाची आज्ञा अशी आहे की व्यक्तीने कर्म करीत शंभर वर्षे जगण्याची इच्छा बाळगावी. शुभ कर्म करण्याने एक लाभ होतो की व्यक्ती वाईट कर्मांपासून बचाव करू शकते. जीवात्मा जेव्हा वाईट कर्म सोडून देतो तेव्हा तो आनंदात राहतो.

एक गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे की ईश्वर कधी विश्रान्ती घेतो काय ? व्यक्ती नेहमी कामापासून सुटका करून घेऊ इच्छिते. वर्तमानकाळात बहुतेक अशी

मनोवृत्ती आहे की -

(१) काम करण्यास कोणी तयार नाही पण फळ सर्वजण प्राप्त करू इच्छितात.
(२) आजची व्यक्ती चुकीचे कार्य करते परंतु फळ मात्र चांगले मिळावे असे वाटते.
(३) माणूस परिश्रम कमी करतो पण फळ मात्र अधिक प्राप्त करण्याची इच्छा बाळगतो.

जो सतत काम करतो तो दुःखी होतो अशी विचारांची धारणाच बनलेली आहे. परंतु कर्म करण्याने दुःख होत नाही. कर्म करण्याने दुःख प्राप्त झाले असते तर ईश्वरही दुःखी झाला असता. अर्थात् ईश्वराची ओढाताण होत नाही. काम करताना व्यक्तीला शक्ती लावावी लागते, ते त्याला कठीण वाटते.

ईश्वराला योग्य तऱ्हेने न जाणल्यामुळे लोक असे मानतात की ईश्वर सर्वशक्तिमान आहे याचा अर्थ ईश्वर वाट्टेल ते करू शकतो पण ईश्वर वाट्टेल ते करू शकत नाही. उपादान कारणाशिवाय ईश्वरही कार्यसृष्टी (जग) बनवू शकत नाही. हे म्हणण्याचे धैर्य फार कमी लोकात असते. चोरी करताना भ्यावे पण ईश्वर जसा आहे तसे म्हणण्यास घाबरता कामा नये. ईश्वरामध्ये अनन्त सामर्थ्य आहे, बल आहे तो निरंतर कार्य करतो.

ईश्वराला कार्य करण्याचा कंटाळा येत नाही म्हणून आपल्यालाही चांगल्या कार्याचा कधी कंटाळा येऊ देता कामा नये. ईश्वराचे नेहमी अनुकरण करावे. ईश्वर कर्म करीतच राहतो. जी व्यक्ती धर्माला, चांगल्या कामाला दान देत नाही तिचे धन वाईट कामात नष्ट होते. चांगली कामे सकाम व निष्काम असतात. जसे ब्रह्मचर्य पालनाने, पुरूषार्थाने आयुष्य वाढविणे, सकाम व निष्काम ही होऊ शकते. जाणून बुजून निष्काम कर्म करीत राहिल्यास योगी बनता येते.

## कर्मफल विवरण

कर्माचे फळ केव्हा, कसे व किती मिळते ही जिज्ञासा सगळ्या धार्मिक व्यक्तींच्या मनात असते. कर्मफळ देण्याचे कार्य मुख्यरूपाने ईश्वराकडून संचालित व नियंत्रित होते तोच त्या विधानाला पूर्णपणे जाणतो. माणूस या विधानाला थोडया कमी अंशाने व स्थूलरूपाने जाणू शकतो. त्यांचे सामर्थ्यच तेवढे आहे. ऋषींनी आपल्या ग्रंथामध्ये कर्मफळाच्या काही महत्त्वाच्या बाबींचा उल्लेख केलेला आहे. ते संबंधित चित्रामध्ये प्रस्तुत करण्याचा प्रयत्न केलेला आहे.

कर्मफळ सदैव कर्माप्रमाणेच मिळते. फळाच्या दृष्टीने कर्म दोन प्रकारचे असते.

(१) सकाम कर्म

(२) निष्काम कर्म, सकाम म्हणजे जे लौकिक फळ (धन, पुत्र, यश इत्यादी) प्राप्त करण्यासाठी केले जाते ते कर्म व निष्काम कर्म म्हणजे लौकिक फळाची अपेक्षा न करता ईश्वराची (मोक्ष) प्राप्ती व्हावी या इच्छेने केले जाते ते कर्म होय.

सकाम कर्म तीन प्रकारचे असते. चांगले, वाईट, मिश्रित. चांगले कर्म म्हणजे सेवा, दान, परोपकार इत्यादी. वाईट कर्म म्हणजे खोटे बोलणे, चोरी करणे इत्यादी. मिश्रित कर्म म्हणजे शेती करणे इत्यादी. यात पाप व पुण्य (काही चांगले काही वाईट) दोन्हीही प्रकारचे कर्म असते.

निष्काम कर्म नेहमी चांगले असते वाईट नसते. सकाम कर्माचे फळ चांगले किंवा वाईट असते जे या जीवनात किंवा मृत्यूनंतर माणूस पशू, पक्षी इत्यादी शरीरांमध्ये पुढील जीवनात जीवन्त अवस्थेतच भोगावे लागते. निष्काम कर्माचे फळ ईश्वरीय आनंदाची प्राप्ती या रूपात मिळते जे जीवन्तपणी समाधी अवस्थेमध्ये व मृत्युनंतर जन्म न घेता मोक्ष अवस्थेत भोगले जाते.

जे कर्म याच जन्मी फळ देणारे असते त्यांना 'दृष्टजन्मवेदनीय' म्हणतात व जे कर्म भविष्यकाळात एखाद्या जन्मी फळ देणारे असते त्यांना 'अदृष्टजन्मवेदनीय' म्हणतात. या सकाम कर्मामुळे मिळणारे फळ तीन प्रकारचे असते. (१) जाती, (२)आयू, (३) भोग, संपूर्ण कर्माचा समावेश या तीन विभागात होतो. जाती = अर्थात् मनुष्य, पशू, पक्षी, कीटक, पतंग, वृक्ष, वनस्पती इत्यादी विभिन्न योनी. आयू = अर्थात् जन्मापासून मृत्यूपर्यंतचा मधला काळ. भोग = अर्थात् भिन्न भिन्न प्रकारचे भोजन, वस्त्र, घर, यान इत्यादी साधनांची प्राप्ती, जाती, आयू, भोग या तिन्हींनी जी सुखाची व दुःखाची प्राप्ती होते तेच वास्तविक कर्माचे फळ आहे. परंतु सुख दुःखरूपी फळाचे साधन असल्यामुळे जाती, आयू, भोग यांना फळाचे नांव दिलेले आहे.

'दृष्टजन्मवेदनीय' कर्म म्हणजे एखाद्याला एकच फळ म्हणजे केवळ आयू किंवा भोग मिळणे. दोन फळ म्हणजे आयू व भोग दोन्ही मिळणे, जसे उचित आहार, विहार, व्यायाम, ब्रह्मचर्य, निद्रा इत्यादीमुळे शरीराचे रोगांपासून रक्षण केले जाते व बल, वीर्य, पुष्टी, भोगसामर्थ्य व आयुष्य वाढविता येते व अनुचित आहारविहार इत्यादींनी बल,

आयू इत्यादी कमी होतात.

'दृष्टजन्मवेदनीय' कर्म जातिरूपी फळ देणारे नसतात कारण जाती (योनी) तर या जन्मात मिळालेली आहे ती जीवित असेपर्यंत बदलता येत नाही. जसे मनुष्य शरीराऐवजी पशूचे शरीर बदलणे. मृत्यूनंतर मात्र शरीर बदलून जाते. परंतु मृत्यू नंतर नवीन योनी देणारे कर्म 'अदृष्टजन्मवेदनीय' म्हणविले जाते. ते दृष्टजन्मवेदनीय म्हणविले जात नाही.

अदृष्टजन्मवेदनीय कर्म दोन प्रकारचे असते (१) नियत विपाक (२) अनियत विपाक कर्मांचा असा समूह की ज्याचे फळ निश्चित झालेले आहे व जे पुढच्या जन्मी फळ देणारे असेल त्याला 'नियतविपाक' म्हणतात. कर्मांचा असा समूह ज्याचे फळ कोणत्या रूपात व केव्हा मिळेल हे निश्चित झालेले नसेल त्यला अनियतविपाक म्हणतात.

कर्मसमूहाला शास्त्रात 'कर्माशय' असे म्हणतात. 'नियतविपाक' कर्माशयांचे सर्व कर्म परस्पर मिळून (संमिश्रित रूपात) पुढच्या जन्मी जाती, आयू, भोग प्रदान करतात या तीनचे संक्षिप्त विवरण पुढील प्रमाणे -

(१) **जाती :** या जन्मी केलेल्या कर्माचे सर्वात मोठे व महत्त्वाचे पूर्ण फळ पुढच्या जन्मी जाती म्हणजे शरीर रूपात मिळते. मनुष्य, पशू, कीटक, पतंग, स्थावर = वृक्ष इत्यादीने शरीराची जातीमध्ये गणना केलेली आहे. ही ज़ाती निम्न कोटीची किंवा उच्च कोटीची असते. जसे माणसांमध्ये पूर्णांग, विकलांग, सुंदर-कुरूप, बुध्दिमान-मूर्ख इत्यादी. तसेच पशूमध्ये गाय, घोडा, गाढव, डुक्कर इत्यादी.

(२) **आयू :** नियत विपाक कर्माशयाचे दुसरे फळ आयू = अर्थात् जीवनकाळाच्या रूपात मिळते. जशी जाती (शरीर = योनी) मिळते त्यानुसारच आयुष्य मिळते जसे माणसाचे आयुष्य १०० वर्षे, गाय, घोडा इत्यादी पशूंची २५ वर्षे, पोपट, चिमणी इत्यादी पक्ष्यांची २-४ वर्षे, माशी, डास, फुलपाखरू इत्यादी कीट पतंगाचे २,४,६ महिने आयुष्य असते. काही प्राणी असे असतात की त्यांचे आयुष्य काही दिवसांचेच असते. माणूस आपले आयुष्य स्वतंत्रतेने वाढवू शकतो किंवा कमी करू शकतो.

(३) **भोग :** 'नियत विपाक' कर्माशयाचे तिसरे फळ भोगाच्या (सुख दु:खांना प्राप्त करून देण्याचे साधन) रूपाने मिळते. जशी जाती (शरीर = योनी) असते त्याच जातीनुसार भोग मिळतात. जसे माणूस आपले शरीर, बुध्दी, मन, इंद्रिये इत्यादी साधनांनी घर, कार, रेल्वे, विमान, मिठाई, पंखे, कुलर इत्यादी साधने बनवून त्यांच्या

प्रयोगाने विशेष सुख भोगतो. परंतु गाय, म्हैस, घोडा, कुत्रा इत्यादी पशू केवळ गवत, चारा, भाकरी इत्यादीच खाऊ शकतात. कार बंगला इत्यादी बनवू शकत नाहीत. वाघ, चित्ता, लांडगा इत्यादी हिंसक प्राणी केवळ मांसच खाऊ शकतात. ते मिठाई, गाडी, घर, वस्त्र इत्यादी सुविधा उत्पन्न करू शकत नाहीत.

जसे पूर्वी कथन केलेले आहे की 'नियत विपाक कर्माशय' यांनी मिळालेले आयुष्य व भोग यावर 'दृष्टजन्मवेदनीय' कर्माशयाचा प्रभाव पडतो. ज्यामुळे आयू, जाती भोग वाढू शकतात किंवा कमी होऊ शकतात. पण हे एका मर्यादेपर्यंतेच (त्या जातीच्या अनुरूप सीमेत) वाढू शकतात.

अदृष्टजन्मवेदनीय कर्माशयामध्ये 'अनियत विपाक' कर्माचे फळ ही जाती, आयू, भोग या रूपातच मिळते परंतु हे फळ केव्हा व कोणत्या प्रकारे मिळते यासाठी शास्त्रात तीन प्रकारच्या गती (स्थिती) सांगितलेल्या आहेत.

१) कर्म नष्ट होणे, २) बरोबर मिळून फळ देणे, ३) दबून राहाणे

**१) प्रथम गती :** कर्म नष्ट होणे. वास्तविक फळ मिळाल्याशिवाय कर्म कधी नष्ट होत नाही येथे नष्ट होणे म्हणजे बरेच दिवस लुप्त होणे. कोणत्याही जीवाचे कर्म सर्वांशाने कधीही नष्ट होत नाही. जीवात्म्याप्रमाणे ते ही अनादी अनन्त आहे. काहीना काही मात्रेत ते राहते मग तो जीव मुक्तीमध्ये का असेना अविद्येचे संस्कार (राग व्देष इत्यादी) नष्ट करून जीव मुक्ती प्राप्त करतो जितक्या कर्माचे फळ त्याने भोगलेले आहे ते सोडून उरलेले जे कर्म आहे ते मुक्तीकाळ पूर्ण होईपर्यंत ईश्वराच्या ज्ञानात असते. या शिल्लक कर्माच्या आधारावरच मुक्तीकाळानंतर जीवाला पुन्हा मनुष्य शरीर प्राप्त होते तो पर्यंत हे कर्म फळ देत नाही. नष्ट होण्याचा अभिप्राय हाच आहे.

**२) दुसरी गती :** एकाच वेळी फळ देणे. अनेक स्थितीमध्ये ईश्वर चांगल्या व वाईट कर्माचे फळ एकाच वेळी देतो. अर्थात् चांगले वाईट कर्माचे फळ चांगली जाती, आयू, भोग मिळतो परंतु त्याचबरोबर अशुभ कर्माचे फळ दु:खही भोगावयास लावतो. त्याच प्रकारे अशुभ कर्माचे प्राबल्य असेल तर निकृष्ट स्तरातील जाती, आयू व भोगरूपी फळ देतो. त्याबरोबरच शुभ कर्माच्या फळाचे सुखही मिळते. उदाहरणार्थ शुभ कर्माचे फळ मनुष्य जन्म तर मिळाला परंतु इतर अशुभ कर्माचे कारण म्हणून त्या शरीराला आंधळा, लुळा किंवा कुष्ठ रोगी बनविले जाते. दुसऱ्या प्रकारे प्रामुख्याने अशुभ कर्माचे फळ गाय,कुत्रा इत्यादी पशूना योनीरूपाने जन्म मिळाला परंतु काही शुभ कर्मामुळे चांगल्या देशात चांगल्या घरी जन्म प्राप्त झाला त्याचा परिणाम असा की उत्तम प्रकारचे

भोजन वगैरे मिळाले.

**३) तिसरी गती :** कर्म दबून राहणे. माणूस अनेक प्रकारचे कर्म करतो त्या सगळ्या कर्मांचे फळ एकाच योनीत एकाच शरीरास मिळणे शक्य नाही म्हणून ज्या कर्माचे प्रामुख्य असेल त्यानुसारच पुढचा जन्म मिळतो. ज्या कर्माची प्रमुखता नसेल ते कर्म पूर्व संचित कर्मांना जोडले जाते व तो पर्यंत फळ मिळत नाही जो पर्यंत त्या कर्माप्रमाणेच पुन्हा मनुष्य शरीरात त्या प्रकारचे प्रमुख कर्म केले गेलेले नसेल. या तिसऱ्या स्थितीत कर्म दबून राहणे याच नावाने ते ओळखले जाते.

**उदाहरण :** एखाद्या माणसाने आपल्या जीवनात माणसाच्या आयू जाती, भोग देणाऱ्या कर्मांबरोबर काही कर्म डुकराचे आयू, जाती, भोग देणारे केले तर प्रमुख असलेल्या कर्मामुळे पुढचा जन्म मनुष्य शरीराचा मिळेल व डुकराची योनी मिळणारे कर्म दबून राहील जो पर्यंत डुकराची योनी देणाऱ्या कर्मांची प्रमुखता नसेल.

उपर्युक्त विवरणाचे सार हे निघते की या जन्मात दुःखापासून मुक्त होण्यासाठी व सुख प्राप्त करण्यासाठी, मोक्ष प्राप्तीसाठी आपल्याला सदैव शुभ कर्म केले पाहिजे व ते निष्काम भावनेने केले पाहिजे.

## उपासना

**उपासनेची परिभाषा :** 'जे कर्म केल्यामुळे ईश्वराच्या आनंदस्वरूपात आपला आत्मा मग्न होतो त्याला उपासना म्हणतात'

अत्यंत मन:पूर्वक परमेश्वराची उपासना केल्यास आनंदाची प्राप्ती होत नसेल तर सूक्ष्मतेने निरीक्षण करावे की आपल्या व्यवहाराने कोणी दुःखी तर नाही किंवा ईश्वराबरोबर केलेल्या व्यवहारात काही कमतरता तर नाही ? कारण ईश्वर जीवाच्या अन्तर्यामी असतो. त्याच्या सारखा हितकर्ता कोणीही नसतो. ईश्वराबरोबर शुध्द सुख प्राप्तीसाठी संबंध जोडणे ही उपासना आहे.

प्रकृती विकृतीचा उपयोग करून घेणे आवश्यक आहे. परंतु तिची उपासना करू नये. उपासना ईश्वराचीच करावी. जे प्रकृतीच्या उपासनेत राहतात ते अंध:काराच्या खाईत पडतात व त्यांना दुःख प्राप्त होते. प्रकृतीची प्रशंसा करावी पण पूजा नव्हे. पृथ्वी इत्यादी पाच भूत व त्यापासून बनलेले पदार्थ ईश्वराकडूनच कारण प्रकृतीने बनलेली कृती आहे. प्रकृती पूजेपेक्षा वाईट व्यक्तिपूजा आहे. स्वार्थी व अज्ञानी माणसांनी लोकांना प्राकृतिकपदार्थाव्दारे व्यक्तींची पूजा करावयास लावून आपल्या

आजीविकेचे साधन बनविलेले आहे. परिश्रमाशिवाय मिष्टान्न खाण्याची ही एक युक्ती आहे.

## उपासकाचे आचरण

साधकाने पक्ष-प्रतिपक्ष व जय- पराजय या शैलीत बोलू नये. प्रारंभिक जिज्ञासूंनी प्रमाण व तर्कापेक्षा आचरणावर भर दिला पाहिजे. जिज्ञासूने खंडनात्मक वाणीचा प्रयोग करता कामा नये. प्रमाण तर्काने सिध्द झाल्यावरही जर आचरण केले नाही तर त्याचा लाभ होणार नाही. जसे गुरू विरजानंदानी 'पूर्वी प्राप्त केलेले अनार्ष विद्येचे गाठोडे यमुनेत फेकून या म्हणजे आर्ष विद्या येईल' असे म्हणताच महर्षीनी त्याचे ताबडतोब पालन केले. त्याप्रमाणे काम, क्रोधाचे, राग व्देषाचे गाठोडे फेकण्यानेच योगानंदाचा सुगंध दरवळेल ईश्वरासंबंधी लोक वाचतात, ऐकतात, चर्चा करतात गातात, बजावतात तरीही ईश्वराच्या स्वरूपाला जाणत नाहीत, समजत नाहीत कारण ऋषींची परंपरा लुप्त झालेली आहे. ऋषी दयानंदांनी ती पुन्हा प्रचलित केली परंतु त्यांच्यानंतर आर्यजगतातं योग्य गुरू परीक्षक न मिळाल्याने व आचरणात न आणण्याने फार प्रचार प्रसार झालेला नाही. ईश्वरी तत्त्व सुद्धा जेव्हा आपण अग्नी, वायू, जल इत्यादींच्या सत्तेप्रमाणे निश्चयात्मक रीतीने स्वीकार करतो तेव्हा त्याचा साक्षात्कार किंवा दर्शन होईल. जशी प्रकृती एक वस्तू आहे, पदार्थ आहे तसाच ईश्वरही एक वस्तू, पदार्थ आहे. तेव्हाच त्याचे ध्यान भक्ती होऊ शकते. ईश्वर ही एक सत्तात्मक वस्तू आहे. ज्याने दिलेल्या उपकरण बुध्दीशिवाय आपण विचारच करू शकत नाही. केवळ एक नाडी (नस) बिघडल्याने एम.ए.पी.एच.डी. मानव नग्न होऊन बाजारात फिरू शकतो. ईश्वर सर्वांच्या शरीराची रचना करून पालन करतो व मनात भय, लज्जा शंका उत्पन्न होऊन वाईट कामापासून रोखतो.

आळस, प्रमाद दूर करून जिज्ञासू विद्यार्थी विद्या शिकेल तर विद्या ग्रहण करण्यात सफल होईल. अध्ययन काळात मुख्य विषय सोडून इतर विषयामध्ये मन घालू नये. श्रध्दा, रूची, प्रेमाने यात मन घालावे. समाजात व्यवहार करताना योगांगाचा प्रयोग केला पाहिजे. व्यवहारात आणल्याशिवाय कोणतेच फळ मिळत नाही. उपासनेमध्ये बाहेरच्या संबंधां बाबत विचार करणे सोडून द्यावे. ईश्वराला भेटण्याचा साक्षात्कार करण्याचा एक उपाय आहे तो म्हणजे श्रध्देने 'ओ३म्' चा जाप करणे. साधकाने अर्थाचा विचार करून ईश्वर समर्पित भावनेने (मी ईश्वराजवळ बसलो आहे) जप करावा. मग तो संबंध आगम (शब्द ) किंवा अनुमान प्रमाणावर आधारित का असेना. याप्रमाणे ईश्वर समर्पित होऊन पहा म्हणजे ईश्वर तुमची समाधी लावील.

ध्यानात ठेवा की संगीताने ईश्वराची स्तुती, प्रार्थना, उपासना करण्याने ईश्वराशी संबंध व प्रेमभाव ही राहतो की संगीतात मन लागते ? तुम्ही नाम स्मरता, गाता पण, तसे मानीत नसाल जाणत नसाल तर समजा अद्याप ईश्वरासंबंधी अनन्य प्रेम उत्पन्न झाले नाही. साधकाला ज्ञान, कर्म, उपासना या तिन्ही स्वरूपांना समजावे लागते. जर ज्ञान योग्य नसेल तर सफलता प्राप्त होत नाही. त्याच प्रमाणे कर्म, उपासना ही योग्य नसेल तरीही सफलता प्राप्त होत नाही.

## साधनेने मुक्ती

कोणत्या प्रक्रियेव्दारे साधना व योगाभ्यास करण्याने मुक्ती मिळते. हा विषय 'साधनेने मुक्ती' चित्रात महर्षी पतंजली रचित योगदर्शनानुसार प्रस्तुत केलेले आहे. योगदर्शनामध्ये सांगितलेल्या यम नियम इत्यादी आठ अंगांचे अनुष्ठान करून मनातील सर्व वाईट वृत्तींनी दूर करून शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध या पाच विषयांच्या तृष्णेला हटवून ईश्वरामध्ये रममाण होण्याचे नाव साधना आहे व मरण इत्यादी सर्व दु:खापासून सुटून ईश्वरीय आनंद भोगण्याचे नाव मुक्ती आहे. पुढील पानावरील चित्रात १० पर्वत दाखविलेले आहेत. जे क्रमश: उंच होत गेलेले आहेत या पर्वताच्या उंचीवरून साधकाच्या योगाभ्यासाचा स्तर दाखविलेला आहे जसजसा साधक योगाभ्यासात सफलता प्राप्त करीत जातो तसतसा त्याचा स्तर उच्च होत जातो.

(१) साधनेच्या प्रारंभिक स्तरात योगाभ्यासी यमनियमाचे पालन करीत स्थिरतापूर्वक ईश्वराचे ध्यान करण्यासाठी सिध्दासन इत्यादी एखादे आसन लावतो व मनाला रोखण्यासाठी 'प्राणायाम' करतो.

(२) मनाला रोखल्यानंतर नेत्र वगैरे इंद्रियांचा आपल्या रूप इत्यादी विषयांशी संबंध राहात नाही अर्थात् इंद्रिये शांत होतात व आपले कार्य बंद करतात या स्थितीचे नाव 'प्रत्याहार' आहे.

(३) या प्रकारे नियंत्रित केलेल्या मनाला ईश्वराचे ध्यान करण्यासाठी एखाद्या ठिकाणी स्थिर करण्याचे नाव धारणा आहे. धारणेची स्थिती प्राप्त करून ईश्वराला प्राप्त करण्यासाठी ईश्वराच्या गुण, कर्म, स्वभावाचे निरंतर चिंतन करणे 'ध्यान' होय.

(४) ध्यान केल्याने साधकाला संसारातील तीन अनादी तत्त्वांच्या (ईश्वर, जीव, प्रकृती) स्वरूपाचे यथार्थ ज्ञान होते या स्थितीला 'विवेकख्याती' असे म्हणतात.

(५) विवेकख्याती प्राप्त झाल्यानंतर योगाभ्यासी व्यक्तीचा सांसारिक

 

विषयभोगासंबंधी राग (मोह) समाप्त होतो. या स्थितीला 'अपर' वैराग्य असे म्हणतात.

(६) अपर वैराग्याच्या प्राप्तीनंतर साधकाला सम्प्रज्ञात समाधीची अवस्था प्राप्त होते. या स्थितीत साधकाची बुध्दी ऋतम्भरा (सत्याला धारण करणारी) बनते. संप्रज्ञात समाधीच्या चार अवस्था असतात वितर्क, विचार, आनंद, अस्मिता. या क्रमश: उत्तरोत्तर उच्च अवस्था असतात. यात साधकाला ५ स्थूल भूत, ५ ज्ञानेंद्रिये, ५ कर्मेन्द्रिये, १ मन, १ बुध्दी, १ अहंकार, मूळ प्रकृती व स्वत:चा (जीवात्म्याचा) साक्षात्कार होतो.

(७) संप्रज्ञात समाधीनंतर साधकाला 'परवैराग्याची प्राप्ती होते. त्या स्थितीत ईश्वराचा आनंद, ज्ञान, बलं इत्यादी गुणांना जाणून ईश्वरासंबंधी अत्यंत प्रेम व श्रध्दा उत्पन्न होते. त्यामुळे साधकाला संसारातील उपादान कारण मूळ प्रकृती अर्थात् सत्त्व, रज, तम नावाच्या तिन्ही गुणांसंबंधीची तृष्णा समाप्त होते.

(८) परवैराग्यानंतर साधकाला ईश्वराचा साक्षात्कार होतो या स्थितीला योगदर्शनात 'असंप्रज्ञात समाधी' असे नाव दिलेले आहे.

(९) असंप्रज्ञात समाधी खूप वर्षे लागल्यानंतर साधक ईशवरापासून ज्ञान, बल इत्यादी गुणांना प्राप्त करतो. हळूहळू आपले अविद्येचे संपूर्ण संस्कार नष्ट (दग्धबीज) करतो ही स्थिती प्राप्त करणाऱ्या साधकाला 'कुशल' 'चरमदेह' 'जीवनमुक्त' म्हटलेले आहे.

(१०) जीवनमुक्त व्यक्ती जेव्हा शरीर सोडते तेव्हा तिला नवीन शरीर प्राप्त होत नाही. ती परमेश्वराजवळ राहून ३१ नील, १० खर्व, ४० अब्ज वर्षांपर्यंत आनंद भोगते यालाच नितान्त मुक्ती, पूर्ण मुक्ती असे म्हणतात. हेच मनुष्याचे सर्वोच्च लक्ष्य आहे.

## ब्रह्मविद्येची श्रेष्ठता

केवळ विद्येच्या (वेद, उपनिषद, गीता इत्यादी) अध्ययनाने, जाणण्याने, नारदा प्रमाणे मंत्रवित् होण्याने प्रभुप्राप्ती होणार नाही त्यासाठी आत्मवित् होणे जरूरी आहे. विद्या ही चार प्रकाराने प्राप्त होते. आगमकालेन, स्वाध्यायकालेन, प्रवचनकालेन, व्यवहारकालेन. उपासकाने या चारहींचा स्वीकार केला पाहिजे.

ऋषी लोक ब्रह्मविद्या जाणणाऱ्यांनाच विव्दानं मानतात अर्थापत्तीने हे सांगता

येते की ब्रह्मवेत्त्याने ब्रह्माला जाणण्यापूर्वी प्रकृती व जीवाला ही जाणले आहे लाखो करोडो व्यक्ती या विद्येला प्राप्त करण्यात गुंतलेल्या असून ईश्वराची उपासना करतात परंतु एखादाच माणूस ईश्वर, जीव, प्रकृतीच्या शुध्द स्वरूपाला समजून ज्ञान, कर्म, उपासनेच्या शुध्द वैदिक पध्दतीचा स्वीकार करतो. ज्या शरीरात आपण असतो त्याची व या संसाराची रचना एक फार मोठे विज्ञान आहे. जी व्यक्ती वेद व ऋषिकृत ग्रंथांना सोडून देईल ती अवश्य भटकेल. ते सूक्ष्म विज्ञान त्या व्यक्तीला समजणार नाही.

## उपासनेचा प्रभाव

उपासकाने सूक्ष्म विचार केल्यास त्याला हे जाणवेल की लौकिक गोष्टींचा आपल्यावर अधिक प्रभाव असतो. ईश्वराचा प्रभाव अत्यंत न्यून असतो. ज्या ज्या कारणांमुळे ईश्वराचा आपल्यावर प्रभाव पडत नाही त्या त्या कारणांना शोधा व ती दूर करा हा विचार केला पाहिजे की जेव्हा माता, पिता, गुरू, राजा यांच्याशी आपण बोलतो तेव्हा आपल्यावर त्यांचा कितीतरी प्रभाव पडतो. उपासना काळात ही इतका प्रभाव ईश्वराच्या उपस्थितीचा पडतो काय ? ईश्वर बुध्दीत ज्ञान का देत नाही ? जो पर्यंत ईश्वराचा प्रभाव अधिक व लौकिक वस्तूंचा प्रभाव कमी होत नाही तो पर्यंत आपण ईश्वराची उपासना करू शकत नाही. व्यक्ती ज्या गोष्टीला अधिक लाभप्रद समजते त्याकडे धाव घेते. ज्यांना लाभप्रद समजत नाही त्याची उपेक्षा करते. एखादा खेळाडू प्रथम येण्यासाठी यश, मान, धन मिळविण्यासाठी स्पर्धेपूर्वी खूप तयारी करतो. तेव्हाच त्याची प्रथम येण्याची शक्यता असते. ओ३म्‌चा जाप ज्ञान प्राप्ती, ध्यान, यम, नियम, आसन, प्राणायाम ही सर्व ईश्वरप्राप्तीची साधने आहेत म्हणून साधकाने पूर्व तयारी केली पाहिजे. उपासकाने मानापेक्षा अपमानाला अमृततुल्य समजावे.

## परमेश्वराची उपासना का केली पाहिजे

१. ईश्वराने केलेल्या उपकारा बद्दल कृतज्ञता प्रकट करण्यासाठी उपासना केली पाहिजे.
२. तो जगाचा निर्माणकर्ता आहे.
३. तो वेदज्ञानाचा दाता आहे.
४. तो सर्वरक्षक व अत्यंत हितकर्ता आहे.
५. उपासनेने मन व इंद्रियांवर नियंत्रण होते.
६. उपासनेमुळे सहनशक्ती वाढते.
७. उपासनेमुळे निष्काम कर्म घडते.

८. वाईट संस्कार नष्ट होऊन चांगले संस्कार उत्पन्न होतात.
९. विशुध्द सुखाची प्राप्ती होते.
१०. ईश्वरीय गुणांची प्राप्ती होते.
११. आत्मसाक्षात्कार होतो.
१२. ईश्वराचा साक्षात्कार व मोक्षाची प्राप्ती होते.

ओ३म् प्रणवने स्तुती = प्र उपसर्गपूर्वक णु स्तुतौ धातुला अप प्रत्यय लावण्याने प्रणव शब्द तयार होतो. ज्याच्या व्दारे उत्कृष्टतेने ईश्वराची स्तुती केली जाते. ते प्रणव म्हणजेच 'ओ३म्' होय.

**स्तुती :** ईश्वर. सच्चिदानंद, निराकार, सर्वशक्तिमान, न्यायकारी अजन्म, अनन्त, निर्विकार, अनादी, अनुपम, दयाळू, सर्व जगाचा पिता, माता, सर्वाधार, सर्वेश्वर, सर्वव्यापक, सर्वान्तर्यामी, अजर, अमर, अभय, नित्य, शुध्द, बुध्द, मुक्त स्वभाव, आनंद दायक, धर्म, अर्थ, काम, मोक्ष प्रदाता आहे. या विशेषणांनी परमेश्वराचीच स्तुती (गुणकीर्तन) केली पाहिजे.

**प्रार्थना :** स्वत:चे प्रयत्न केल्यानंतर सर्व श्रेष्ठ कार्यात ईश्वराच्या साहयाची अपेक्षा बाळगणे.

**उपासना :** ईश्वराच्या आनंदस्वरूपात मग्न होणे. म्हणून पूर्वोक्त निराकार इत्यादी लक्षणांनी युक्त असलेल्याचीच भक्ती करणे. त्याच्याशिवाय कुणाचीही भक्ती करू नये. जसे सुख दु:खाचे ध्यान मनात होते तसेच ईश्वराचे ध्यानहीं मनातच झाले पाहिजे. मूर्तीची आवश्यकता नाही. ईश्वराला सुख किंवा दु:खाप्रमाणेच जाणता किंवा अनुभवता येते. ईश्वराचे अस्तित्व सर्व प्राण्यांमध्ये सर्वत्र समान आहे. परंतु ज्याच्या आत्म्यामध्ये त्या चेतन ईश्वराचा स्वसामर्थ्यानुसार जितका ज्ञानानुभव असेल त्याच्या आत्म्याला तितके सुख मिळेल. जो ईश्वर द्युलोक, पृथ्वीलोक, आन्तरिक मन, इंद्रिये वगैरे सगळ्या पदार्थात ओतप्रोत आहे त्याच ईश्वराला जाणा. तोच मुक्तीचा अमृतसेतु आहे. अन्य गोष्टींचा परित्याग करा.

## ईश्वराचा आनंद कसा ?

ईश्वर आनंदाने परिपूर्ण आहे. जसे उपाशी माणसाला अतिशय स्वादिष्ट योग्य भोजन मिळाल्यानंतर लौकिक सुख प्राप्त होते. (परंतु ही हीन उपमा आहे) अशीच दु:खाची निवृत्ती व आनंदाची प्राप्ती योगाभ्यासा व्दारे ईश्वर प्राप्तीमध्ये होईल.

सांसारिक सुखात चार प्रकारचे दु:ख मिश्रित आहे. साखर किंवा शिरा यांची गोडी शेवटी शेवटी कमी होत जाते. एकवेळ ती मातीप्रमाणे लागेल परंतु ईश्वर उपासनेमध्ये आनंद वाढत जातो. माणूस सांसारिक सुखाने रोगी व ईश्वरीय सुखाने निरोगी बनतो. ईश्वराचा आनंद नित्य व शुध्द आहे.

जो पर्यंत व्यक्ती सांसारिक सुखात चार प्रकारचे दु:ख अनुभवत नाही तो पर्यंत ईश्वरी आनंद प्राप्त करण्यास प्रवृत्त होत नाही. जीवनकाळातच दु:खापासून मुक्ती मिळाल्यावर मृत्यूनंतरही मुक्ती मिळते. केवळ मरण्यानेच मुक्ती मिळत नाही. जीवित असे पर्यंत ज्याने ब्रह्माला जाणले तो कृतकृत्य झाला. ईश्वर अनुपम असल्यामुळे त्याला कशाचीही उपमा दिली जाऊ शकत नाही. परंतु समजण्यासाठीच हीन उपमा दिलेली असते. जो सर्वशक्तिमानाला खरे खुरे जाणतो, मानतो त्याच्या न्यायावर विश्वास ठेवतो तो कधी दु:खी होत नाही. राजा अल्पज्ञतेमुळे योग्य अयोग्य निर्णयही देऊ शकतो. परंतु ईश्वर नेहमी योग्य निर्णय घेतो व जीवाला सुधारण्यासाठी दया ही करतो. धनसंपत्तीच्या तुलनेत योगविद्या प्राप्तीत हजारो प्रकारचे सुख (आनंद) अधिक असते. मी प्रभूला जाणावे, प्राप्त करावे, साक्षात्कार करावा ही भावना तीव्र रूपाने ठेवावी केवळ नामस्मरण करीत राहणे परंतु त्यानुसार आपले चरित्र न सुधारणे हा ईश्वराला प्राप्त करण्याचा निष्फळ प्रयत्न आहे.

## ईश्वराशी व्यवहार

जे काम ज्या पध्दतीने केले जाते त्याच पध्दतीने केले पाहिजे. तेव्हाच सफलता मिळते. आसनावर बसल्यावर सर्व विचार सोडून द्यावे. ईश्वरचिंतन करावे. व्यापार, धंदा इत्यादी अन्य विषयाचे चिंतन करू नये. ईश्वर उपासना करताना सांसारिक विचार करणे योग्य नव्हे. निमंत्रित केलेल्या अतिथीचा अवमान केल्याप्रमाणे ईश्वराबरोबर व्यवहार केल्यास तो कसा प्राप्त होऊ शकेल ?

इंद्रिय दोषांनी व संस्कार दोषांनी अविद्या प्राप्त होते. अज्ञानामुळे उव्देग निर्माण होतो. संध्येला बसताच निश्चय करा की विषयांमध्ये मन घालणार नाही. जप अर्थासह स्वत:ला ईश्वराला अर्पण करून, प्रभूप्रेमाने विव्हल होऊन, ईश्वराला समक्ष समजून प्रभूशी संवाद साधला पाहिजे. या प्रक्रियेने संध्या व उपासनेमध्ये मन लागते.

पास रहता हूँ तेरे सदा मैं अरे
तू नहीं जान पाया तो मैं क्या करूं ?

(कवि प्रकाश)

**व्यवहार काळ** :उपासने व्यतिरिक्त व्यवहार काळात यम नियमाचे पालन करीत वाईट वृत्तींना रोखावे लागते व चांगल्या वृत्तींना जागृत करावे लागते. व्यवहार काळात मनाला देवमार्गावर चालवावे लागते. जसे वेदात म्हटले आहे -

स्वस्ति पन्थामनुचरेम सूर्याचंद्रमसाविव ।
पुनर्ददताघ्नता जानता संगमेमहि (ऋग्वेद)

**ददता**: अर्थात् दानी पुरुषाप्रमाणे असावे. अघ्नता - अहिंसक(व्देषभावनारहित) पुरुषाप्रमाणे असावे. जानता - ब्रह्माला जाणणाऱ्या ज्ञानी पुरुषांचे अनुकरण करावे. सूर्याप्रमाणे अविश्रान्त योग (कल्याण) मार्गावर वाटचाल करावी. संकट आले तरी हसतमुख राहावे.

व्यवहारकाळात चोरी, व्यभिचार, असत्य, ईर्षा, व्देष इत्यादी प्रवृत्तींना रोखून स्वार्थाच्या ऐवजी परोपकार करावा. असत्याला सोडून, सत्य प्रवृत्तींना जागृत करावे परंतु उपासना काळात चांगल्या प्रवृत्तीनाही रोखावे लागते जसे वेदाचे अध्ययन अध्यापन हा धर्म आहे. यज्ञ करणे, दान, पठण पाठणाचा विचार इत्यादीचा विचार जर उपासना काळात केला तर ईश्वराशी संबंध जोडला जाणार नाही. व्यवहारकाळात ही मन इंद्रियांना स्वैर सोडता कामा नये. त्यांना यम नियमात अडकवून ठेवावे.

**उपासना काल** . बालकाचा व्यवहार जसा आपल्या माता, पिता गुरूबरोबर असतो तसाच व्यवहार जीवात्म्याचा परमेश्वरा बरोबर असला पाहिजे. प्रातःकाळी जाग आल्यावर उपासनेला बसण्याची तयारी सुरू करावी लागते. या काळात कोणतीही सांसारिक गोष्ट, चर्चा (विचारणा) प्रश्नोत्तरे न करता मौन धारण करावे. दोन्ही काळी उपासनेपूर्वी त्याज्य असणारे कार्य व विचार यांचा त्याग करावा व करण्यायोग्य कार्य व विचार यांनाच स्वीकारावे.

प्रथम जप, नंतर अर्थविचार व त्यानंतर समर्पण करावे. जप करताना चुकीने एखादा विचार मनात आला तर त्याला दूर करावे. विपरीत संस्कारामुळे असावधानतेने एखादा विचार मनात आला तर त्याच वेळी सावध होऊन त्याला दूर करावे. नंतर परमेश्वराकडे मदतीसाठी वेगाने जावे तेव्हा निश्चितच परमेश्वर साहय करील.

योग विद्येचे ज्ञान-विज्ञान जाणण्यासाठी प्रथम चित्ताच्या अवस्था जाणाव्या लागतात. विव्दान असूनही व्यक्ती हे अनुभवते की चित्त हट्टाने विषयांकडे वळत आहे. ते केव्हा विषयाकडे गेले, कुणी पाठविले हे ती विसरून जाते. त्याचा परिणाम

असा की व्यक्ती मन, इंद्रियांवर नियंत्रण ठेवू शकत नाही. बुद्धीपूर्वक केलेल्या क्रिया स्वाभाविकरीत्या होऊ लागतात. ईश्वर बुद्धीपूर्वक सृष्टीची रचना, पालन व प्रलय करतो. त्याच प्रमाणे जीव इंद्रियांवर ताबा ठेवणे, चांगला विचार करणे, वाईट विचार करणे, चित्ताला रोखणे इत्यादी क्रिया करतो. वास्तविक जीव स्वतःच आपल्या मनाला भटकू देतो परंतु चूक अशी की केव्हा मन भटकते हे जाणू शकत नाही. लक्ष्यपूर्वक पाहिल्यास कळेल की मीच (मनाला) विषयान्तर करण्यास प्रवृत्त केलेले आहे.

मनात विचार तरंग उत्पन्न होतात पण लक्षात येत नाही. परंतु सावधानतेने लक्ष्यात आणल्यास कळेल की मीच एक महिन्यापूर्वी एका व्यक्तीच्या बाबतीत वाईट विचार केलेला होता. बरीच वर्षे महिने गेल्यानंतर विशेष लक्ष दिल्यास पूर्वीच्या विचारांचे स्मरण होते. त्यामुळे उपासक उपासनेमध्ये चित्ताला एकाग्र करू शकत नाही. संध्या करण्यासाठी बसले असता इतर विचार मनात येतात. १५ मिनिटानंतर कळते की मी कुठे तरी भरकटलो होतो. मनाला निरूध्द करण्याचा अभ्यास करीत करीत उपासकाला नंतर ५ मिनिट, १ मिनिट, काही सेकंदात लक्षात येते की मनाला इतर विषयाकडे वळविले होते. पण केव्हा वळविले होते हे लक्षात येत नाही. परंतु विषयान्तर झाल्यावरच लक्षात येते की मनात विषयान्तर झालेले आहे. अनेकदा कळल्यानंतरही माणूस त्या सांसारिक विषयांची इच्छा करतो. तेव्हा त्या व्यक्तीला कळते की मी (मनाला) ईश्वराकडे वळवितो पण मन विषयाकडे ओढ घेत आहे. वास्तविक एकच चेतन आत्मा आहे जो मनाला वळवितो, जीवात्मा आपल्या सूक्ष्म इच्छेनेच मनाला इतक्या तीव्रतेने चालवितो मनाला वळविणारा मी आहे किंवा ते स्वतः पळते याचा पत्ताच लागत नाही. हे सर्व निरर्थक चिंतन असावधनतेमुळे होते. चेतनापूर्वक (तीव्र ज्ञानपूर्वक) प्रयत्न केल्याने वृत्तींचा पत्ता लागतो. ज्या क्रिया अत्यंत सूक्ष्म इच्छांनी होतात त्यांचा पत्ता साधकाला लागत नाही त्याला वैज्ञानिक अचेतन मन म्हणतात. वास्तविक सावधान असावधान जीवात्माच असतो.

अनुभवाने संस्कार बनतात. संस्काराने स्मृती व स्मृतीने मानवाचे चरित्र बनते. चांगल्या व वाईट विचारांची टक्कर होत असते तेव्हा संघर्ष करण्याने विजय प्राप्त होतो. त्यावेळी चित्तातील वृत्ती रोखा, मन शांत होईल. विजय झाल्यावर हृदय भरून येईल. तेव्हा जो आनंद प्राप्त होतो तो अवर्णनीय आहे. मनाला जड (अचेतन) समजून साधकाने वारंवार म्हणावे "माझ्या इच्छेशिवाय हे अचेतन मन व इंद्रिये चालणार नाहीत मी जेथे त्यांना घेऊन जाईन तेथे ती माझ्या मागे येतील"

**अभ्यास :-** श्रद्धापूर्वक, ज्ञानपूर्वक, ब्रह्मचर्यपूर्वक तप करून यम, नियम आसन,

प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यानामध्ये सतत राहणे याला अभ्यास म्हणतात. साधकाने आपल्या आचरणाने, व्यवहाराने दीर्घकाळपर्यंत अर्थात जोपर्यंत वाईट संस्कार दग्धबीज होत नाहीत तो पर्यंत नियमपूर्वक निरंतर अभ्यास करीत स्वच्छ व परिपक्व बनवावे. जर योगाभ्यास मध्येच सोडला तर स्थिती जशीच्या तशी राहील. संस्कार एक दुसऱ्यांना तीव्र वेगाने विद्युत प्रमाणे दाबतात. बुध्दिमान चांगले संस्कार उत्पन्न करतो, वाईट दाबतो. परंतु मूर्ख व्यक्ती चांगल्या संस्कारांना दाबून ठेवते व वाईट संस्कारांना वर आणते. मनात विचार अत्यंत तीव्रतेने येतात. व्यवहार काळात ईश्वराला समक्ष ठेवले नाही तर उपासना काळात ईश्वराला प्राप्त करणे कठीण जाईल.

**संघर्ष :** स्वस्थ (योगस्थ) अवस्थेमध्ये जीवाच्या आधीन विचार तरंग असतात. निरोधाच्या संस्कारांना जागृत केल्यास ईश्वरामध्ये आनंद येऊ लागतो. जेव्हा जीवात्मा सांसारिक तरंग उत्पन्न करतो तेव्हा तो दु:खसागरात बुडतो. मनाला स्वैर सोडल्यास वेगळेच वागेल, विचित्र वागेल व बुध्दी ठिकाणावर राहणार नाही. महान होण्यासाठी काही आदर्श, नियम, व्रत व संकल्प आहेत. त्यांचा स्वीकार करून वागावे लागते. न स्वीकारल्यास पतन होते. ईश्वरसुध्दा आपल्या दृढ नियमानुसार चालतो. साधकाने कधी निराश होता कामा नये. प्रयत्न करून मन घसरू लागल्यास प्रायश्चित करून पुन्हा सन्मार्गावर चालावे. मन, वचन, कर्माने स्वत:शी व इतरांच्या दोषांशी समन्वय करू नये. वाईट विचारांशी फार मोठा संघर्ष करावा लागतो.

मनाचे विचार तरंग (वृत्ती) स्वत:च उत्पन्न होतात की मीं उत्पन्न करतो ? सूक्ष्मतेने विचार केल्यास कळते की मीच केवळ मीच विचार उत्पन्न करतो. अशा प्रकारचा विचार केल्यास साधकाला अनुभूती होते ती ही की माझ्यात साहस, श्रध्दा शक्ती आलेली आहे हे माझ्याच हातात आहे की, कोणता विचार केव्हा उत्पन्न करावा परंतु असे असूनही हे सर्व ईश्वरदत्त मानावे. जर 'अहम्' 'मी' चा विचार केल्यास मिथ्या अभिमान निर्माण होईल. लोकैषणा व स्वामित्वामुळे अभिमान निर्माण होतो. जो साधकाला पथभ्रष्ट करतो.

झोपताना दररोज आत्मनिरीक्षण करावे. इंद्रियनिग्रह अर्थात् त्यांना नेहमी आपल्या ताब्यात ठेवावे. म्हणजे वाईट गोष्टीत फसणार नाहीत. रात्री झोपण्यापूर्वी विचार करावा की आज काय चांगले केले व काय वाईट केले. मग झोपण्याच्या अंतिम क्षणी ईश्वरचिंतनाशिवाय कोणताच विचार करू नये.

प्रात:काळी उठताना ओ३म् सच्चिदानंद स्वरूप इत्यादीचे ध्यान करून हातपाय धुवून ईश्वराचे स्मरण करीत इतर काम करावे.

ईश्वरस्मरणात (१) अन्य वृत्ती उठता कामा नये (२) केवळ ईश्वरामध्ये ध्यान लावून त्याच्या गुणाचे अर्थासहित चिंतन करावे. (३) मनावर पूर्ण नियंत्रण ठेवावे. एकाच ठिकाणी रोज बसावे म्हणजे त्याच जागेवर बसण्याने ईश्वर मिलनाचे विचार येतील. बसण्याची वेळ निश्चित असावी.

आसनावर बसल्यावर आपले उद्दिष्ट आठवावे व प्रभूला भेटण्यासाठी बसलो आहे इतर विचार करणार नाही व मन अचेतन आहे. त्याला मीच कार्यान्वित करीन, असे समजावे. जड व चेतन याचा विवेक जाणावा. ईश्वर प्रणिधान, प्रलयावस्थेचे संपादन करण्याने ईश्वर समर्पित होण्याने, मन ताब्यात येईल. सुंदर दिसणाऱ्या शरीरात मांस, अस्थी, मलमूत्र भरलेले आहे. या विचाराने आकर्षण समाप्त होईल. परंतु त्याचा उपयोग धर्म, अर्थ, काम, मोक्षाच्या उपलब्धीसाठीच करावयाचा आहे.

**सर्वरक्षक सर्वदाता ईश्वर :** ईश्वरच सृष्टीमध्ये सर्व पदार्थांना उत्पन्न करून सर्व प्राण्यांना जीवन देत आहे.-ईश्वर भाकरी, कपडा बनवून देत नाही. परंतु त्यासाठी गहू, कापूस, लोखंड, माती, पाणी इत्यादी देतो. पुढचे काम जीव करतो. ईश्वराच्या साह्याशिवाय कोणताही जड किंवा अचेतन पदार्थ व्यक्तीचे भले करू शकत नाही. जे काही चांगले होते ते ईश्वरप्रदत्त पदार्थांच्या साह्यानेच होऊ शकते. ईश्वर नित्य कल्याण करतो. कधी सूड घेत नाही. जो उपासक ईश्वराबरोबर योग्य व्यवहार, त्याला प्राप्त करण्याची तीव्र इच्छा (जिज्ञासा) पुरुषार्थ, तप इत्यादी करतो तो आपली सत्यकामना पूर्ण करतो.

**ईश्वराच्या शोधासाठी ध्यान :** उपासक, ऋषी, गुरू यांच्याकडून श्रवण करून ईश्वराचा शोध घेतो. एका उच्च तत्त्वाचा शोध घेतो. लौकिक वस्तूतून लक्ष काढून निष्क्रिय बसणे, काही विचार न करणे हे ध्यान नव्हे. "तत्रप्रत्ययैकतानता ध्यानम्" जेथे धारणा केलेली आहे. तेथे एक ज्ञान सतत राहणे ध्यान होय. निर्विषय - सांसरिक विषय वस्तूपासून मनाला दूर करून ईश्वराचा जप करीत शोध घेणे हे ध्यान होय.

**ईश्वराशी संवाद :** "हे प्रभू, मी आपल्या दर्शनासाठी साक्षात्कारासाठी बसलो आहे. वेदानुसार व आर्यसमाजाच्या दुसऱ्या नियमानुसार आपले स्वरूप मी पाहू इच्छितो. आपण सच्चिदानंदस्वरूप, कष्टक्लेशरहित, शुभ अशुभ कर्मरहित, भोग वासनारहित

 

पुरुषविशेष आहात. आपण अनन्त ज्ञानाचे भांडार आहात. आपण माझे माता, पिता, गुरूचे गुरू आहात. आपण मला विद्या देता. आपले नाव 'ओ३म्' आहे. आपल्या नावाच्या जप विचाराचे फळ म्हणजे सर्व विघ्नांचा नाश होतो. हे प्रभू वेदाने तुम्हाला 'सपर्यात् अकायम्' म्हटले आहे.''

जसे भुकेने व्याकूळ झालेल्या बालकाला आपल्या कवेत घेऊन दूध पाजताना माता तृप्त करते. त्याचप्रकारे ईश्वर प्रणिधानाने युक्त जीवाला ईश्वर आपल्या ज्ञानानंदाने पूर्ण करून समाधीस्थ होण्यास मदत करतो.

**गुण-गुणी एक :** गुण व गुणी यांची वेगवेगळी व्याख्या केली जाते. परंतु गुण व गुणी एकच आहेत. स्वतंत्र दोन वस्तू नाहीत. ईश्वर साक्षात्कारामध्ये ईश्वराच्या गुणांद्वारेच त्याचे प्रत्यक्ष अनुभव दर्शन होते. जसे अग्नीचा गुण दाह, प्रकाश आहे, अग्नी त्यापेक्षा भिन्न नाही.

## योगविद्या व विज्ञान

योगाशिवाय कोणीही व्यक्ती जीवनात सफल झालेली नाही, होत नाही, होणार नाही. जीवन व्यवहारात शुभ कर्म करावे व अशुभ कर्म त्यागावे शुभ कर्मांना इतके उच्च बनवावे की केवळ निष्काम कर्म राहील. कोणतीही गोष्ट केवळ बोलण्याने सिद्ध होत नाही. प्रमाणांनी जी सिद्ध होते तीच गोष्ट सत्य असते. योग चित्ताची एक विशिष्ट अवस्था आहे. मनही जड वस्तू आहे. तरीही दोन मिनिटे ताब्यात राहू शकत नाही. जरी वर्षानुवर्षे मन एखादी गोष्ट जाणते, मानते, कार्य करीत असते. जड चेतनाची वैशिष्ट्ये वेगवेगळी आहेत. तरीही मोठमोठे वैज्ञानिक सुद्धा चेतनाला जडाचे मिश्रणच मानतात.

दर्शन व विज्ञान हे दोन्ही मान्य करतात की कारणाचे गुण कार्यात येतात. जसे पिवळ्या रंगाचा धागा वापरून पिवळे वस्त्र बनेल तसे सत्त्व, रज, तम रूपी प्रकृतीपासून बनलेले मनही पृथ्वी, अग्नी, जल, वायूसारखे जड आहे. परंतु चेतनाचा (आत्म्याचा) संयोग होण्याने मन चेतनासारखे दिसते तसा अनुभव येतो. जसे आपले शरीर जड असूनही आत्मसंयोगाने चेतन दिसते. जी वस्तू ज्ञान वगैरे संवेदनशीलतेचा अनुभव करीत नाही ती जड असते. चेतन तत्त्व 'आत्मा' शरीररूपी साधनाशी सम्बध्द होण्याने आपल्या क्रिया करतो. म्हणून ज्यांच्या मते पाच भूतमात्रांच्या संयोगानेच शरीर चेतन होऊन क्रिया करते हे त्यांचे मत बरोबर नाही. त्यांचे मत मानण्याने मृत्यूचाही अभाव झाला पाहिजे. पण ते प्रत्यक्षाच्याविरुद्ध आहे.

जड तत्त्वात क्रिया उत्पन्न करण्यासाठी चेतनाची आवश्यकता असते. व्यवहार, विज्ञान व दर्शन शास्त्राने हे सिद्ध होते. स्थिर वस्तू बाह्य शक्तिविना स्थिरच राहील व चलायमान वस्तू गतीशीलच राहील. जोपर्यंत एखादी बाह्यशक्ती (चेतनतत्त्व) गतीला स्थिर करीत नाही. एक गतिमान व दुसरा गती देणारा, एक रोखणारा, दुसरा रोखविणारा. एक जड दुसरा चेतन ही दोन तत्त्वे (पदार्थ) असतात.

**मन जड आहे :** चित्त (मन) जड आहे पण हे जीवात्म्याला बाह्य विषयांचे ज्ञान करविण्याचे साधन आहे. जसे टेलिफोनला (साधन) हे कळत नाही की त्याच्यावरून कोणते बोलणे चालले आहे.

मनाला रोखता येते. जसे विद्यार्थी जड मनाला परीक्षा देताना तीन तास रोखतो. त्यावेळी त्याला खाणे, पिणे फिरणे इत्यादी गोष्टी आवडत नाहीत. त्यावेळी कोणताच विचार त्याच्या मनात येत नाही. कारण परीक्षेचे महत्त्व तो जाणतो. याचप्रकारे ईश्वराचे महत्त्व समजल्यावर योगाभ्यासीचे मन स्थिर होते.

सामान्य इच्छा या नियम बनविण्याने, संकल्प करण्याने रोखता येतात हे लक्षात ठेवले पाहिजे, की ईश्वराने बनविलेल्या या मनाला मी (ईश्वराने दिलेल्या शक्तीने) चालवितो. हे जड मन आपोआप चालत नाही.

**रोखण्यास कठीण :** (संकल्प) नियमा शिवाय मनाला स्वतंत्रतेने वागण्याची मुभा दिली जाते. दुसरी गोष्ट म्हणजे मनाला चेतन मानले जाते व ते असे की, मनच स्वतः कुठेही जाते. पण जे ज्ञानाने युक्त आहे. तेच चेतन असते. जे याविरुद्ध असते ते जड होय. जसे डोळ्यांबाबत असे म्हटले की हे पाहतातच, मानत नाहीत. ही गोष्ट युक्तियुक्त नाही. कारण डोळ्यांनी आपण आपल्या इच्छेनुसार उघडझाप करू शकतो. याचप्रमाणे मनालाही आपल्या इच्छाशक्तीने विषयापासून दूर सारता येते. बाजूला सारता येते. विचार स्वतः कधी येत नाहीत तर आपण त्यांना आणतो विपरीत ज्ञानाने, संस्कार दोषांनी हे विचार अर्थात् आपणच आणतो.

**मनाच्या पाच अवस्था :** (१) क्षिप्त = चंचल (२) मूढ = मूर्छित ज्ञान विज्ञानाने शून्य (३) विक्षिप्त = यात चित्ताच्या एकाग्रतेचा आरंभ होतो व बाहेरच्या आवाजाने व आंतरिक वृत्तींनी बाधा आल्यास भंग होतो. (४) एकाग्र = यात चित्ताची एकाग्रता सतत असते. (५) निरुद्ध = उच्च ज्ञान, विज्ञान, विवेकानंतर अनंत ईश्वरामध्ये वृत्ती निरोध झाल्यानंतर ही अवस्था येते. त्या काळात सर्दी गर्मी एका मर्यादेपर्यंत त्रास देणार नाही. काम, क्रोध, लोभ नष्ट होत नाहीत. थांबतात. असावधानतेमुळे क्लेश निर्माण झाले तर विवेक अभ्यासाने ताबडतोब रोखता येतात. या अवस्थेत योगी पाहतो की भोगी संसार

क्लेशांनी त्रस्त आहे. मी वरच्या स्थानी आनंदाच्या पर्वतावर उभा आहे. योगाभ्यासी मन रोखण्यास समर्थ होऊ शकतो तर तो खालील बाबी लक्षात घेईल.

(१) मनाला जड (अचेतन) समजावे.
(२) स्वतःच मनाला गती देणारे समजावे.
(३) सांसारिक विषयात दुःखाची अनुभूती असावी.
(४) स्वस्वामी संबंधांचा नाश झाला पाहिजे.
(५) व्याप्य-व्यापकाचे ज्ञान प्राप्त केले पाहिजे.
(६) भोक्ता भोग्य हा भाव नष्ट झाला पाहिजे.
(७) ईश्वर प्रणिधान करावे.
(८) शरीर व संसार अनित्य समजावा.
(९) ऋषींच्या निर्णयावर विश्वास करावा.
(१०) व्यवहार काळातही मनाला नियंत्रित ठेवण्याचा अभ्यास करावा.
(११) प्रलय अवस्थेचे संपादन करावे.

## योगात बाधक अविरती

अविरती = विरक्ती (वैराग्य) नसणे अर्थात् संसारातील वस्तूविषयी वैराग्य भाव नसणे, प्रत्येक वेळी मनात कोणता ना कोणता सांसारिक सुखाचा विचार असणे, सुखानंतर राग, लोभ, मोह निर्माण होतो. वस्तूच्या उपभोगानंतर पुन्हा उपभोग घेण्याची इच्छा निर्माण होते. वैराग्याचा अभाव हा एक रोग आहे. हा उपासनेत अत्यंत बाधक असतो. विवेक वैराग्याच्या अभावामुळे आपण उपासनेमध्ये मन रमवू शकत नाही. सांसारिक सुखाच्या इच्छा उत्पन्न करीतचा राहतो. त्या दूर केल्या पाहिजेत.

## योगात बाधक स्व-स्वामी संबंध

समजा, तुम्ही उत्तम उत्तम पदार्थ निर्माण केले. उत्तम भोजन निर्माण केले उत्तम भोजन तयार केले. स्वतः खाल्ले व इतरांनाही खाऊ घातले त्यामागे ही भावना असते की हे माझे पदार्थ होते. मी भोजनाची व्यवस्था केली. हे माझे, मी केले इत्यादी विचार अज्ञानामुळे चांगले वाटतात. परंतु ज्या पदार्थांची व्यवस्था केली ते सर्व ईश्वराचे आहेत. ज्या शरीराने ते केले तेही ईश्वराने दिलेले आहे. माझी विद्या, माझे शरीर, माझे धन, माझा परिवार, माझी बुद्धी, माझे चातुर्य हे सर्व जीव स्वतःचे मानू लागतो. म्हणून ते सोडताना त्रास होतो. परंतु खरा योगी हे सर्व ईश्वराचे मानतो. तो आपल्या सन्मानाला

विषाप्रमाणे समजतो व अपमान अमृताप्रमाणे मानतो. माझा-माझी ही भावना व माझा सन्मान व्हावा ही विपरीत भावना का बनली? याचे कारण बाल्यावस्थेपासून विपरीत शिक्षण मिळालेले असते. बाल्यावस्थेपासून लौकिक रस घेणे शिकविले जाते. ईश्वरामध्ये रस घेणे शिकविले नाही.

भोग्य पदार्थ ईश्वराचे मानून ग्रहण करावे. आपले न मानता ईश्वराला समर्पण करावे. ईश्वराचे मानून त्यांचे रक्षण करून प्रयोग करावा. वास्तविक न्याय हा आहे की हे सर्व ईश्वराने निर्माण केलेले पदार्थ त्याचेच आहेत. संसारातील संपूर्ण जीव शरीर नसताना काहीही बनवू शकत नाहीत.

स्वस्वामी संबंधच उपासनेमध्ये अत्यंत बाधक आहे. निष्काम कर्मात विघ्न आहे. लौकिक व्यक्ती जास्तीत जास्त लौकिक वस्तूंचा संग्रह करून आपल्याला निर्भय सुखी व बलवान समजते. हे उदरनिर्वाहासाठी साधनरूपाने काही अंशी योग्य आहे. पंतु त्याला साध्य समजणे ही चूक आहे.

योगी तर स्वस्वामी संबंध सोडून भौतिक वस्तूंचा जितका त्याग करील तितका स्वतः निर्भय होईल व आनंदित राहील. स्वस्वामी संबंधामध्ये मोहाचे कारण अविद्या आहे. जेथे अधर्म असेल तेथे दुःख होईल. जे धन, बल, रूप प्राप्त झालेले आहे. ते परमेश्वराचे मानून चालले तर सुखी होईल.

व्यक्ती जितका संग्रह करील तितके पाच प्रकारचे दोष निर्माण होतील.
१) अर्जन दोष २) रक्षण दोष ३) क्षयदोष ४) संगदोष ५) हिंसा दोष

प्राण्यांना कष्ट दिल्याशिवाय भोग भोगता येत नाहीत.

आध्यात्मिक व्यक्तीद्वारे जेथे आपल्या निवासासाठी आश्रम बनविलेले आहेत. त्यात स्व स्वामी (संग) दोष येतो. धर्मप्रचार करणे, लेखनकार्य इत्यादी सर्वांचा उद्देश आपल्या आश्रमाला भव्य बनविणे असते. त्या व्यक्तीची संपूर्ण शक्ती त्यातच खर्च होते. याबाबत देश परदेशात प्रतिष्ठित असलेल्या एका योगाचार्यांचे उदाहरण देणेच पुरेसे आहे. ज्यामुळे आपण प्रेरणा घेऊ शकतो. त्यांनी अभिमानयुक्त बनून ऋषिकेशमध्ये अत्यंत परिश्रमाने लाखो रुपये जमा करून वीस वर्षात एक भव्य आश्रम बांधला. शेवटी दुःखित अंतःकरणाने उद्गार काढलेब "या आश्रमाच्या खोल्या मला खायला उठलेल्या आहेत." त्यांना स्वस्वामी संबंध त्रास देत होता. योग्य ती अधिकारी व्यक्ती ते सोपविण्यासाठी त्यांना मिळालेली नव्हती. सन्यासी स्वतःचे मठ आश्रम बनवितो. यात काही दोष समाजाचाही आहे. समाजाच्या अव्यवस्थेमुळे शरीर रक्षणासाठी

 

सन्यासी, उपदेशक यांना आश्रम बनवावे लागतात.

उपासना काळात उपासकाला नाव, रूप सोडून द्यावे लागते. आत्म्याला कोणतेच नाव नसते. जी वस्तू आपण आणलेली नसते. ती बरोबर जाणार नसते. अविद्येमुळेच शरीर, धन, पुत्र, पत्नी यांना आपण आपल्या आत्म्याचे अंग मानतो. व्यक्तम् नातेवाईक इत्यादी व अव्यक्तम् द्रव्य, धन, घर, कारखाना यांच्यात जेव्हा वृध्दी होते. तेव्हा माणूस स्वतःला मी मोठा आहे, असे मानतो व जेव्हा नष्ट होते तेव्हा माझ्या शरीराचा भागच खचला आहे. मी दुर्बल झालो आहे, मेलो आहे, असे समजून दुःखी होतो. एवढेच नव्हे तर सन्यासी, आचार्य सुद्धा शिष्य विद्यार्थी जेव्हा आश्रम गुरुकुलातून जातात. तेव्हा स्वस्वामी संबंधामुळे रडतात.

**उपासनेचे अंग जप :** ईश्वराच्या उपासनेमुळे उपासकांत ईश्वरीय गुण येतात. वारंवार मंत्राचे उच्चारण करून जप केला जातो. तो मंत्र ईश्वराच्या गुण, कर्म, स्वभावाला अनुकूल असावा.

**जप तीन प्रकारे केला जातो.** (१) मानसिक विचाराद्वारे (२) अत्यल्प ध्वनीद्वारे ज्यामध्ये केवळ ओठ हलतात. (३) वाचिक उच्च स्वराने.

ईश्वर दूर आहे म्हणून त्याला आमंत्रित करावे, यासाठी नव्हे, तर बाह्य ध्वनीची बाधा येऊ नये म्हणून अभ्यास व्यक्तीने आपलेच स्वर ऐकून अर्थाचा विचार करून ईश्वर समर्पित होता यावे म्हणून अशाप्रकारे जप करावा.

साधक जेव्हा ज्ञानपूर्वक परिश्रम करतो तेव्हा त्याला सफलता प्राप्त होते. साधकाने नेहमी असे समजावे की ज्या ज्या कामासाठी मी इच्छा व प्रयत्न करीन तेच कार्य होईल. असे समजू नये की मनात जसे विचार येतील तसेच करावे लागेल. हेही समजू नये की माझ्या इच्छेशिवाय मन, इंद्रिये स्वतःच कार्य करू लागतात.

शब्दांचा उच्चार झाल्याबरोबर अर्थाचा बोध झाला पाहिजे. त्यावेळी निरीक्षण करावे की गायत्रीच्या पदाचा अर्थ जपाच्या उच्चारण काळातच असतो किंवा नाही. उच्चारणात चूक होऊ शकते पण अर्थामध्ये चूक होता कामा नये. आपल्याला ईश्वराशी संबंध जोडावयाचा आहे. त्याचे ज्ञान, बल, आनंद घ्यावयाचा आहे, असे समजून योगाभ्यास करावा. दीर्घ स्वरात पदोच्चारण करावे, शब्दार्थ जाणून इतर विषयांना दूर सारावे व अर्थावर लक्ष केंद्रित करीत ईश्वर समर्पण (ईश्वर संबंध) करावे.

 

## जपात तीन कामे :

१) मंत्राचे उच्चारण २) मंत्राचा अर्थ ३) ईश्वर समर्पण

मी ईश्वरासमोर हे उच्चारण व अर्थ करीत आहे. अशी भावना मनात ठेवावी. ही ध्यानाची पद्धत आहे. 'धीमहि' चा अर्थ आम्ही तुझे ज्ञान, बल, आनंद, तेज धारण करीत आहोत. धारण करण्याचा प्रयत्न करीत आहोत.

कोणतीही नवीन गोष्ट शिकण्यास कठीण वाटते. वर्षानुवर्षे अभ्यासाने पध्दत कळते. नंतर क्रियारूपाने केल्यास साध्य होते. आठ अंगाचे आचरण केल्याने अशुध्दीचा नाश होतो व आत्मा परमात्मा यांचे ज्ञान होईपर्यंत सतत ज्ञानवर्धन होते. साधकाच्या अविद्येचा नाश झाल्यास समाधीची प्राप्ती होते. जर होत नसेल तर, काहीतरी दोष आहे असे समजले पाहिजे त्यामुळेच मन, वाणी, शरीराने योगांगाचे यथायोग्य पालन होत नाही.

ज्याच्याद्वारे विचार, मनन, संकल्प, विकल्प केला जातो ते मन होय. मनात विविध प्रकारचे तरंग उठतात. त्यांना रोखणे योग होय. कित्येकवेळा विपरीत गोष्ट ऐकून मनाच्या विचार तरंगावर नियंत्रण न केल्याने हृदयाची गती बंद पडून कित्येक लोकांचा मृत्यूही होतो त्याच मनाला समजून रोखल्याने योगी बनता येते व ईश्वराची प्राप्ती होते.

ईश्वर उपासनेने जे ज्ञान विज्ञान मिळते ते जीवन निर्माण करण्यात अद्भूत ठरते. ऋषी दयानंदानी जर ईश्वर उपासना केली नसती तर संपूर्ण जगाचा विरोध त्यांनी कसा सहन केला असता? एकीकडे काशीचे शेकडो विद्वान पंडित व काशी नरेश आपल्या हजारो अनुयायांसह शास्त्रार्थात ऋषींना पराजित करण्यास अत्यंत उत्सुक तर दुसरीकडे निर्भय दयानंद एकटे. जणू परमेश्वर सान्निध्यातच संभाषण करीत आहेत.

ईश्वर उपासनेची औपचारिकता पाळण्यासाठी सकाळी, संध्याकाळी केवळ पंधरा मिनिटे मंत्र म्हटले तर विशेष लाभ होणार नाही. जी व्यक्ती दिवसभर ईश्वराची उपासना करते, त्याच्याशी संबंध जोडून ठेवते, तिचे सारे जीवनकार्य ईश्वराच्या आनंद, ज्ञान, बलाने परिपूर्ण असते.

ईश्वर प्राप्तीची तीव्र इच्छा मनात एवढी वाढावी की ईश्वराला सोडून अन्य काहीही चांगले वाटता कामा नये. जर ईश्वरप्राप्तीचे संस्कार नसतील तर ते उत्पन्न करता येतात. ईश्वरासारखा किंवा ईश्वरापेक्षा जास्त कोणताही पदार्थ महत्त्वपूर्ण मानू

नये. याप्रमाणे सतत अभ्यास करणाऱ्या साधकाला ईश्वर जवळ करून आपले स्वरूप दाखवितो.

**जप करण्याची रीत :** गायत्री मंत्र किंवा इतर कोणताही मंत्र केवळ हजार किंवा लाख वेळा पाठ करण्या पेक्षा सावकाश गतीने अर्थ व भक्तीभावाने जप केल्यास आनंद प्राप्त होतो. मंद गतीने, समाधानपूर्वक अर्थासहित जप करताना जर साधकाचे मन विषयांतर करीत असेल तर ताबडतोब पकडले जाते. मंद व दीर्घस्वराने शब्दांचा अर्थ समजून जप केल्यास ऋषिकृत अर्थामध्ये प्रेमभाव निर्माण होतो. त्यावेळी इतर विषयात मन जाऊ देऊ नये. आपल्या आत्म्याच्या प्रयत्नांशिवाय मन स्वत: कुठेही जात नाही. हे स्मरण असू द्यावे. ज्ञानपूर्वक क्रिया करणारे जीव व ईश्वर हे दोनच आहेत. प्राण, इंद्रिये, मन वायू, जल, आकाश इत्यादी नाहीत.

आत्म्याच्या प्रयत्नांशिवाय आपल्या मनात कधीही विचार येत नाहीत. वास्तविक हे विचार कोण उत्पन्न करतो ? उदासीनता, हताशा, निराशा कोण उत्पन्न करतो? आपल्या मनाला शरीराच्या एखाद्या भागावर स्थित करून (एका केंद्रावर) विचार करा की हे विचार कुठून येतात? पाहावे, निरीक्षण करावे. कुठूनही येत नाहीत. म्हणून सरळ जप करीत जा. अर्थाचा विचार करीत जा. जर असावधानतेने मन दुसरीकडे गेले तर वृत्तींना रोखा. जसा मोटार ड्रायव्हर समोर व इकडे तिकडे पाहतो, ब्रेक लावतो. स्टियरिंग सुध्दा ताब्यात ठेवतो. तसे ध्यान ईश्वराकडे लावण्याने विषयान्तर होणार नाही. जेव्हा मनात ईश्वरासंबंधी शंका उत्पन्न होते की, ज्याचे मी ध्यान करतो तो ईश्वर आहे किंवा नाही? तेव्हा बिकट स्थिती होते. हा विचारांचा संघर्ष चालूच राहील. जसा कारचालक चौकात आल्यावर विचार करील की कोणता मार्ग माझ्या उद्दिष्टाकडे नेणारा आहे? तो थोडा वेळ थांबेल पण जेव्हा कळेल की या रस्त्याने मला जावयाचे आहे. तेव्हा न डगमगता जाईल म्हणून शब्दप्रमाण व अनुमानप्रमाणावर विश्वास ठेऊन हा ऋषींचा प्रयोग स्वत: करून पाहावा.

## जपाची विशेष वाक्ये

ओ३म् सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म ।
ओ३म् असतो मा सद्गमय ।
ओ३म् तमसो मा ज्योतिर्गमय ।
ओ३म् मृत्योर्माऽमृतं गमय ।.

**परिभाषा :** 'तत्र प्रत्यत्यैकतानता ध्यानम्' ( यो.द.३.२) अर्थात विशिष्ट अवयवामध्ये मनाला स्थिर करून धारणा करून ईश्वराचा शोध घेण्याचा प्रयत्न करून ज्ञान बाळगणे याला ध्यान म्हणतात.

## मुण्डक उपनिषदात ध्यानाचा विधी

प्रणवो धनुः शरो ह्यात्मा ब्रह्म तल्लक्ष्यमुच्यते ।
अप्रमत्तेन वेध्दव्यं शरवत् तन्मयो भवेत् ॥

**अर्थ :** प्रणवः (ब्रह्मवाचक) ओम् (पद) च धनुष्य आहे, आत्मा बाण आहे व ब्रह्म (परमेश्वर) त्या जीवात्म्याचे लक्ष्य आहे, असे म्हटले जाते. त्या लक्ष्यरूपी ब्रह्माला प्रमादरहित सावधान होऊनच बाण मारला पाहिजे. बाणाप्रमाणे त्या लक्ष्यामध्ये घुसून गेले पाहिजे.

**प्रश्न :** निराकाराचे ध्यान होऊ शकते काय?

**उत्तर :** निराकाराचे ध्यान होऊ शकते. जर निराकार वस्तुला आकार = रंग, रूप, सीमा मानून ध्यान केले तर ते त्या वस्तूचे ध्यान होणार नाही तर अध्यान होईल. पदार्थाचा जो गुण आहे त्याला लक्षात घेऊनच ध्यान होऊ शकते. ईश्वराच्या गुण, कर्म स्वभावाच्या विपरीत ध्यान करण्याने कधीही ध्यान होऊ शकत नाही. चुकीच्या पध्दतीने वस्तूचे ध्यान करण्याने आज दुःखात वाढ होत आहे. परमसुख अप्राप्य आहे.

**उदारणार्थ :** एखाद्या व्यक्तीची निळ्या रंगाची, ६×४ लांबी व रूंदीची, दहा हजार रूपयांनी भरलेली पर्स अंधाऱ्या गल्लीत हरवली असून तिचा सतत शोध घेण्याचा ध्यास घेऊन ती मिळेपर्यंत शोध चालूच ठेवल्यास त्याला ध्यान म्हणता येईल. वस्तू मिळाल्यावर तिचे ध्यान समाप्त होते. 'ध्यानं निर्विषयं मनः' म्हणजे मनात कोणताच विषय नसणे अशी या सूत्राची काही विव्दानांनी व्यवस्था केलेली असून योगाच्या क्षेत्रात महाभ्रम पसरविलेला आहे. याचा खरा अर्थ असा की बाहेरच्या वातावरणापासून स्वतःला वेगळे करणे हा होय. जे दुःखाचे कारण आहे ते दूर झाले पाहिजे. केवळ शांत राहून बुध्दिपूर्वक ईश्वरी तत्त्वाशी संबंध जोडल्याखेरीज सफलता प्राप्त होत नाही. काही लोक म्हणतात आपल्या शरीरात दुःख शोधा त्यामुळे बाहेर दिलासा मिळेल, पण हे चुकीचे आहे. कित्येक लोक श्वासावर ध्यान केंद्रित करण्यास सांगतात हे ही अपूर्ण आहे.

एखादी परदेशी व्यक्ती लाल किल्ला पाहण्यासाठी आलेली असून तिने ऐकलेल्या वर्णनाप्रमाणे लाल किल्ल्याचा शोध घेईल. जर जामा मशीदीचे उद्दिष्ट ठेवून शोध घेतल्यास लाल किल्ल्याचे दर्शनही ती करू शकणार नाही. एका वस्तूला या जन्मात पाहिले नाही परतु शब्द प्रमाण व अनुमानाने गुण, कर्म, स्वभाव जाणून शोधल्यास ती मिळते. ज्या वस्तूला शोधावयाचे आहे त्याचे शाब्दिक ज्ञान किंवा आनुमानिक ज्ञान असले पाहिजे. ध्यान करताना ईश्वर नामक वस्तूचा शोध घेत साधक असा भावविह्वल झाला पाहिजे की जसे लहान बालक मातेसाठी व्याकूळ होते.

ध्यानामध्ये इतर सर्व कार्ये रोखावीत. केवळ ईश्वरी तत्त्वाचाच विचार करावा. चांगल्या वाईट सर्व विचारांचा त्याग करावा. विचार सुरवातीपासूनच रोखावे. व्यवहार काळात ज्याच्याशी पटत नाही त्याला शिक्षा करण्याचा विचार उपासनेमध्ये बसताच सोडून दिला नाही तर उपासना करू शकणार नाही. त्याला ताबडतोब रोखा अन्यथा नंतर बराच वेळ हा विचार तुमच्या मनात ठाण मांडून बसेल.

**प्रलयवत् संसार :** बौध्दिक स्तरावर जगाला प्रलयवत् पाहण्याने, अनुभव करण्याने समाधी प्राप्त होते. शरीर उत्पन्न होण्यापूर्वी नव्हते उत्पन्न झाल्यावर कालान्तराने राहणार नाही. दुसरी शरीरे येतील ती ही जातील. एक दिवस असा येईल की कोणी ही राहणार नाही. या प्रकारे सूर्य, चंद्र, तारे, पृथ्वी ही राहणार नाहीत. या अवस्थेत केवळ ईश्वर उरलेला असतो. त्यास्थितीत जीवात्मा त्या अनन्त ईश्वरामध्ये सतत गती करून त्याच्यात स्थिर (समाधीप्राप्त) होईल. याचप्रमाणे आपल्या शरीराच्या मृत्यूची कल्पना करावी. मृत्यूच्या भयाने पळून जाणार कुठे ? या प्रकारे वृत्तीचा वेग थांबेल. साधक ज्ञानाच्या स्तरावर सर्वांशी नाते तोडून समाधी प्राप्त करू शकतो.

**ईश्वराशी प्रत्यक्ष :** जसा अग्नी आपले गुण, उष्णता, प्रकाश यांचा अनुभव प्रत्यक्ष देतो. साखरेचे रूप व मधुरता यांचा प्रत्यक्ष अनुभव येतो. तसेच ईश्वर आपले गुण आनंद, बल, ज्ञानाने प्रत्यक्ष अनुभव प्राप्त करून देतो. प्रत्यक्ष अवस्थेत साधक संपूर्ण जगाला ईश्वरामध्ये पाहतो.

व्याप्य व्यापकाचे विज्ञान जाणल्याशिवाय सफलता प्राप्त होत नाही. आपण व लोकलोकांतर व्याप्य व ईश्वर व्यापक आहे. जेव्हा इतर कोणत्याही वस्तूंमध्ये मन लावले तर तेथेही ईश्वराला व्यापक समजून पाहावे. नंतर जेथे साधक पाहील तेथे त्याला ईश्वरच दिसेल. सूर्य व्याप्य त्यामध्ये ईश्वर व्यापक पाहावा व असे म्हणावे हे 'ओ३म्', आदित्य तुझे बाण असून आमच्या रक्षणासाठी आहेत.' व्यापकाच्या प्रभावाने व्याप्याचा प्रभाव समाप्त होईल जसे लोखंडाचा गोळा व्याप्य व अग्नी व्यापक असून

 

अग्नीच्या प्रभावाने तो अग्नीप्रमाणे लाल होतो.

जसजसा साधक बौध्दिक स्तरावर संसाराला प्रलयवत पाहतो. त्या अवस्थेत वृत्तिनिरोध होऊन समाधी सुरू होईल. ही प्रारंभिक अवस्था सम्प्रज्ञात समाधी आहे. यात ईश्वराचा साक्षात्कार होत नाही. 'जशी बंकरमध्ये बसलेली व्यक्ती बॉम्बच्या माऱ्यापासून सुरक्षित असते. त्याच प्रकारे प्रलयवत् अवस्थेमध्ये बाहेरचे काम, क्रोध, मोहरूपी बॉम्बच्या माऱ्यापासून योगसाधक सुरक्षित असतो.

**ईश्वर नियामक तत्त्व :** आजचा वैज्ञानिक सृष्टीमध्ये प्रत्येक ठिकाणी नियम पाहतो.

अचानक एखाद्या दुर्घटनेमध्ये मार लागणे, मरणे, वाचणे हे कार्य ईश्वराचे नाही तर 'क्रियाभेदात परिणाम भेदः'च आहे म्हणजे ज्याचा परिणाम अनिश्चित आहे. परंतु जेथे वारंवार एकाच प्रकारची क्रिया होत असते तेथे त्या क्रियांचा नियामक एखादे शक्तिमान तत्त्व अवश्य आहे जे या सृष्टीला चालविते अशा प्रकारचे ज्ञान होते. जड तत्त्वाला कोणी तरी गती दिल्याशिवाय ते गतिमान होत नाही. जसे एखादा गतिशील दगड स्वतःच विचार करून स्वतःच थांबत नाही परंतु चेतन जीव स्वतः विचार करून हे करू शकतो गतिमान सूर्य, पृथ्वी, तारे इत्यादींना गती देणारे चालविणारे सर्वव्यापक, सर्वशक्तिमान तत्त्व ईश्वरच आहे कारण कोणतीही क्रिया कर्त्याशिवाय आपोआप होत नाही.

## ईश्वरोपासनेमध्ये मन का लागत नाही ?

१) मन व इंद्रियांबाबत आपले ज्ञान कमी आहे.
२) आत्म्याविषयी आपले ज्ञान कमी आहे.
३) जगाबद्दल आपले ज्ञान कमी आहे.
४) विषय भोगांनी प्राप्त होणाऱ्या दुःखांची अनुभूती आपल्याला होत नाही. विषय भोगातील सुखातही दुःखमिश्रित अनुभवाची प्रचिती येत नाही.
५) ईश्वराच्या उपासनेने होणारे लाभ आपण जाणत नाही.
६) जगातील पदार्थांचा स्वामी ईश्वर आहे, हे आपण मानत नाही.
७) उपासनेपूर्वी मानसिक तयारी करीत नाही.
८) ईश्वराला व्यापक व संसाराला व्याप्य समजत नाही.
९) उपासना काळात संघर्ष करीत नाही.
१०) व्यवहार काळात यमनियमांचे पालन व मन इंद्रियांवर नियंत्रण ठेवत नाही.
११) उपासना काळात योग्य तऱ्हेने आसन लावत नाही. प्राणायाम व जप योग्य

तऱ्हेने करीत नाही.

१२) संध्येच्या मंत्रांचा, शब्दार्थांचा योग्य प्रकारे विचार करीत नाही.

१३) शब्द प्रमाणांवर आपली श्रध्दा व आपला विश्वास कमी आहे.

## उपासना काळात निद्रा व तिचे कारण आणि निवारण

ध्यान करताना निद्रा किंवा आळस रोखणे आवश्यक असते. अनेक साधकांना हे लक्षात येत नाही की आपण ध्यान करताना झोपलेले आहोत. उपासना काळात झोप किंवा आळस का येतो याचे कारण ते योग्य प्रकारे जाणत नाहीत. झोप येण्याच्या व आळस येण्याच्या काही कारणांचा उल्लेख येथे केलेला आहे.

१) रात्री झोप पूर्ण न होणे किंवा चांगली न होणे

२) पोटाची शुध्दी न होणे (शौच व्यवस्थित न होणे)

३) शारीरिक परिश्रम किंवा व्यायाम अधिक प्रमाणात करणे

४) भोजन प्रतिकूल जड (भारी) अधिक प्रमाणात करणे

(५) तामसिक किंवा मादक वस्तूंचा (तम्बाखू, भांग इत्यादी) प्रयोग करणे

(६) शरीरात ज्वर वगैरे रोग असणे

(७) शरीरात दुर्बलता असणे

(८) आसन योग्य प्रकारे नसणे (कंबर सरळ करून न बसणे)

(९) उपासनेपूर्वी स्नान न करणे

(१०) योग्य प्रमाणात व्यायाम, भ्रमण, आसन इत्यादी न करणे.

(११) थंडीच्या दिवसात रजई वगैरे गरम वस्त्रे अधिक प्रमाणात वापरणे (पांघरूण घेऊन बसणे)

(१२) मानसिक परिश्रम अध्ययन, चिंतन इत्यादी अधिक करणे.

(१३) आळशी व्यक्तींबरोबर राहणे.

(१४) संध्येच्या मंत्रांचा शब्दार्थ न जाणणे.

(१५) योग्य प्रमाणात प्राणायाम न करणे.

(१६) ईश्वराविषयी प्रेम, श्रध्दा, रुची नसणे.

(१७) योगाभ्यासाचे महत्त्व किंवा लाभ न समजणे.

साधकांनी हे ओळखले पाहिजे की वरील कारणापैकी कोणते कारण मला लागू पडते. ते जाणून, ते कारण दूर केले पाहिजे. ज्यामुळे योगाभ्यासात सफलता प्राप्त होईल.

 

# योगी बनण्याचा उपाय - आत्मनिरीक्षण

मनुष्याला जर आपले जीवन दिव्य, श्रेष्ठ, आदर्श व महान बनविण्याची इच्छा असेल तर सदैव झोपण्यापूर्वी आत्मनिरीक्षण करावे. आपल्या अन्त:करणात डोकावून पाहावे की दिवसभर मी कोणकोणत्या चुका केलेल्या आहेत. माझ्यात कोणकोणते दोष आहेत. जे करू नये ते केले व जे करणे आवश्यक आहे ते केले गेले नाही. आपल्या त्रुटी शोधाव्या, प्रायश्चित्त घ्यावे, स्वत:शिक्षा घ्यावी व भविष्यात न करण्याचा प्रयत्न करावा. एखादी व्यक्ती बाहेरून पैशाने, बलाने,वस्त्राने स्वच्छ नीटनेटकी सभ्य व सबल असेल परंतु अन्त:करण मलिन, दुर्बल, खिन्न व दु:खी असेल तर तिचे पतन होईल.

बाह्य दु:खापेक्षा मानसिक शोक, दु:ख, पीडा, काम, क्रोध, लोभ, मोह यांनी माणूस अधिक दु:खी असतो. आज चिंतनाची शैली विपरीत आहे. व्यक्ती दुसऱ्याचे दोष पाहते परंतु स्वत:चे पाहात नाही. माणूस कितीही शिकलेला असेल परंतु 'बोले तैसा चाले' नसेल तोपर्यंत ऋषींचा काळ पृथ्वीवर अवतरणार नाही.

दुसऱ्यासमोर माणूस स्वत:ची प्रतिमा मोठी करून दाखविण्याचा प्रयत्न करतो. त्याला यश, मोठेपणा मान मिळतो परंतु पुढे हे त्याच्या हास्यास्पद पतनाचे कारणही बनू शकते. ईश्वरावर विश्वास असणाऱ्याला स्वत:चा मोठेपणा भौतिक साधनांनी दाखविण्याची आवश्यकता नाही.

आज आई वडील, शिक्षक, गुरू, समाज व राजदंडाचे भय समाप्त झालेले आहे. म्हणून अपराध वाढलेले आहेत. एक माणूस आपल्या कृतीने शेकडो लोकांना दु:खी करतो परंतु आत्मनिरीक्षण करणारा स्वत: आपल्या त्रुटी, विपरीत सवयी जाणतो व सुधारणा करतो दोष दूर करीत राहतो.

**महत्त्व** :एका आध्यात्मिक व्यक्तीला वेद, उपनिषद इत्यादी शास्त्रांचे अध्ययन करण्यापेक्षा आपल्या मनाचे अध्ययन करणे जास्त आवश्यक आहे. प्रशंसेचा मोह, यशाची कामना, आहंकारिक प्रतिक्रिया इत्यादी वस्तूंचा त्याग हे साधकाला आवश्यक आहे.

जर अन्त:करण चांगले असेल तर सर्व कार्ये सफल होतील. पुढच्या जन्मी बरोबर येणारी वस्तू अन्त:करण आहे. सांसारिक उपकरणे येथेच राहतील वेद म्हणतो 'कृतं स्मर' आपले केलेले कर्म पहा. आंतरिक शल्यचिकित्सा तर स्वत:च करावी

 

लागते आपल्या अन्त:करणाला स्वत: पाहावे. आंतरिक शुध्दी आपल्याला स्वत:च करावी लागेल. दररोज पाहावे की काम वासना, क्रोधाग्नी, व्देष इत्यादी पूर्वी होते तसेच आहेत का कमी झालेले आहेत.

कर्माचा जमाखर्च पाहताना या दोषांचे निरीक्षण व परीक्षण ही करावे. आपल्या जीवनाची ऋषी व आप्त पुरूषांच्या जीवनाशी तुलना करावी. त्यांनी काय केले काय केले नाही व आपण काय केले व काय केले नाही. आपले जीवन सत्पुरूषासारखे आहे का पशु प्रमाणे आहे. आंतरिक निर्मिती केल्याशिवाय सुख, समाधान, शांती मिळत नाही. पुढच्या जन्मी शुभ अशुभ कर्माचे संस्कारच संपत्तीच्या रूपाने बरोबर येतील इतर काही नव्हे. बाहेरून चमक दमक व आतून नुसता काळोख. व्यक्ती आपले दोष लपविते. पण ईश्वरापासून काहीच लपत नाही. ईश्वर सर्व काही पाहतो, ऐकतो, जाणतो.

एक दोष असल्यास त्याबरोबरच अनेक दोष येतील. एक सद्गुण जाईल तर त्याबरोबर अनेक सद्गुण जातील. बिडी सिगारेट ओढण्याचा एक दोष असेल तर त्याबरोबर दारू, क्लब, जुगार, उशीरा झोपणे, उठणे, प्रमाद, आळस, असत्य, कपट, क्लेश, तंटा बखेडा एका मागून एक दोष व्यक्तीमध्ये येतात 'यज्ञ करणे' हा गुण धारण केल्यास प्रात: काळी उठणे, स्नान, व्यायाम, सत्संग, वेदपाठ, संध्या व नंतर वेळेवर सांसारिक कार्ये करणे इत्यादी अनेक गुण येतात. शुध्द ज्ञानीच दोषांपासून स्वत:चा बचाव करू शकतो. अन्यथा पतनाकडे जाणाऱ्या माणसाचे संपूर्ण पतन होते. कामी माणसामध्ये इतर दहा दोष आपोआपच येतात. क्रोधी माणसामध्ये आठ दोष आपोआप येतात. जे लोक वाईट गोष्ट जाणूनही सोडत नाहीत व चांगली गोष्ट जाणूनही स्वीकारीत नाहीत ते असफल होतात. जी सोडून जाणारी वस्तू आहे ती जवळ करतात व जे बरोबर येणार आहे त्या धर्माचा बँक बॅलेन्स मात्र शून्य करतात.

**आत्म्याची वास्तविक इच्छा :** स्वतंत्रता, आनंद, ईश्वर प्राप्ती करण्यासाठी मुक्त व्हावे की दोषांनी युक्त व्हावे हे स्वत:च्या हाती आहे. जे लोक आपल्यापेक्षा श्रेष्ठ व्यक्तीसमोर आपले दोष दाखवितात ते पवित्र होतात.

## दोषी होण्याची चार कारणे

(१) जी व्यक्ती ईश्वराला सोडून देते ती स्वत: चूक करते व दोषांना जवळ करते.

(२) माता, पिता, गुरू, आचार्य, मित्र इत्यादीं पासूनही व्यक्तीमध्ये दोष येतात

माता पिता स्वत: मुलांना मांसाहारी बनवितात. माता पिता चांगले असतील तर सुधारणा होण्यासाठी संधी प्राप्त होऊ शकते.

(३) समाजाच्या परंपरा, शैली, रचना यामुळेही दोष येतात. आज लोक उघड उघड दारू पितात, जुगार खेळतात, बीभत्स बोलतात. 'तुला काय त्याचे'? 'मला काय त्याचे'? ही परंपरा चालू झालेली आहे. कोणीही रोखणारा नाही.

(४) अयोग्य राज्यशासनामुळेही जीवनपध्दतीमध्ये खूप परिवर्तन होते.
आपण पुरुषार्थी बनून दोष दूर करू शकतो. चुकीची भावना उत्पन्न झाल्यास 'प्रतिपक्षभावना' उत्पन्न करावी म्हणजे दोष दबतात, दुर्बल होतात व शेवटी दग्धबीज होतात. आपल्या दोषांना जड समजून त्यांना दूर सारण्याचा प्रयत्न करावा. जेव्हा दोष उत्पन्न होतात तेव्हा त्यांना ताबडतोब दूर सारावे व त्याविरूध्द विचार करणे सुरू करावे.

## दोषांच्या बाबतीत माणसांची स्थिती

(१) काही लोक दोष जाणतच नाहीत.
(२) काही लोक जाणतात पण दुसऱ्या व्यक्तीकडून दोष ऐकू इच्छित नाहीत.
(३) काही लोक ऐकतात पण स्वीकारीत नाहीत.
(४) काही लोक वाणीने स्वीकारतात पण मनाने स्वीकारीत नाहीत.
(५) काही लोक मनाने स्वीकारतात पण विसरून जातात.
(६) काही लोक दोष दूर करण्यासाठी पुरूषार्थ करीत नाहीत.
(७) काही लोक पुरूषार्थ करतात पण योग्य उपाय जाणत नाहीत.
(८) काही लोक असफल झाल्यास निराश होतात.
(९) काही लोक ईश्वराकडून सहकार्य मागत नाहीत.
(१०) काही लोक दोषांना निर्बल करतात.
(११) काही लोक दग्धबीज भावना निर्माण करतात, ज्यामुळे पुढे कधी दोष निर्माण होत नाहीत.

मन, वाणी, कर्म हे एक सारखे असल्यास मनुष्य पवित्र होतो. जी व्यक्ती ईश्वराला स्मरून चालते तीच दोषरहित होते दोष निर्माण होताच सावधान व्हावे. मनाला विचलित करणारे तरंग रोखावेत. साधक दोष इच्छित नाही तरीही ते येतात याचे कारण साधक त्यांना रोखण्याचे उपाय जाणत नाही. अभद्र वागल्यानंतर हताश निराश होऊन पुरुषार्थ करणे सोडून देता. अशा अवस्थेत दोष असल्यास प्रतिपक्ष

भावना उत्पन्न करावी. संकटाच्या वेळी ईश्वर सर्वात मोठा सहायक असतो. शांत चित्ताने त्याच्या समोर मदतीची याचना करावी. धैर्य, ज्ञान, बल मागावे. विपरीत काम करण्याची अभद्र भावना मनात आल्यास ईश्वराला अवश्य स्मरावे. दोष दूर करण्याची हीच पध्दत हेच विज्ञान आहे. काम, क्रोध, लोभ इत्यादी उत्पन्न होऊ शकतात पण त्यांच्या मी आधीन होणार नाही. त्यांच्यावर नियंत्रण ठेवीन असे भाव निर्माण करावे. एका गोष्टीसंबंधी चांगले किंवा वाईट दोन प्रकारचे संस्कार कार्य करतात. करावे अथवा न करावे. एखाद्याची वस्तू घ्यावी कोण पाहतो ? हा विचार मनात येतो, पुन्हा विचार येतो घेणार नाही. पुन्हा विचार येतो आज संधी उपलब्ध झालेली आहे. यावेळी घेऊ नंतर घेणार नाही इत्यादी विचार करता करता घेतोच. परंतु ईश्वराला समोर ठेवून तो स्वतःचा बचाव करू शकतो.

## दोष जाणकाराची मदत

सुख, शांती केवळ बाह्य सौंदर्यावर अवलंबून नसून अंतरंगावर अवलंबून आहे. दोष दाखविणाऱ्याकडून दोष जाणून घ्यावेत व त्यांना दूर करण्याचे उपाय शोधावेत.

(१) काही दोष केवळ आपणच जाणतो जसे मानसिक काम, क्रोध, लोभ, हिंसा इत्यादीची भावना.

(२) आपले काही दोष आपण जाणत नाही, दुसरे जाणतात.

(३) काही दोषांना इतर लोक व आपण स्वतः जाणतो.

(४) काही दोष विव्दान जाणतात.

(५) काही दोष योगी ज्ञानीच जाणतात.

(६) संपूर्ण दोष तर ईश्वरच जाणतो.

आपली तुलना ऋषींबरोबर करावी व दोषांचा शोध घेऊन पुरुषार्थाने सुधारणा करावी. जर दोष जाणले नाहीत, शोधले नाहीत व जीवन जसे चालले आहे त्यातच संतुष्ट राहिल्यास प्रगती खुंटेल. जसे संविधान न जाणणाऱ्या न वाचणाऱ्याकडून गुन्हा घडला तर त्यालाही शिक्षा भोगावी लागते. त्याचप्रकारे वेद व ऋषीकृत ग्रंथ वाचले नाहीत व त्यांच्या प्रतिकूल वागणे असेल तर ती व्यक्ती दोषी ठरते. जर गृहस्थ पंचमहायज्ञ करीत नसेल तर तो ईश्वराच्या नियमानुसार दोषी आहे. त्याला शिक्षा मिळेल. ज्या व्यक्ती एकान्तात बसून आपल्या अन्तर्मनात डोकावून पाहात नाहीत, अन्तःकरणाला तेजस्वी बनवित नाहीत. त्यांना शांती व आनंद कुठला?

ईश्वराला प्राप्त केल्यानंतर सारे प्राणी आत्मवत् दिसतात. सामान्य माणूस ज्या जीवापासून काही लाभ होत्तो त्याच्याविषयी प्रेम, मोह व आसक्ती ठेवतो व

इतरांबाबत तसे प्रेम, हिताची भावना ठेवत नाही हा व्यक्तीमध्ये दोष असतो. नेहमी असे दिसून येते की व्यक्ती जितके आपले हित इच्छिते तितके इतरांचे इच्छित नाही. परंतु ईश्वरप्राप्ती झालेला योगी आत्मवत्पेक्षा पुढे जाऊन स्वत: त्रास भोगून दुसऱ्याला सुख देतो. स्वत: दोषी माणूस आपल्या आत्म्याला नरम व कोमल दृष्टीने पाहतो. परंतु तोच दुसऱ्याचे दोष कठोरतेने पाहतो. आपल्या मुलाने एखाद्यास मारले असता लहान मूल आहे असे समजतो व दुसऱ्याच्या मुलाने मारल्यास अपराध समजतो.

योगाभ्यासी व्यक्ती प्रथम आपले दोष पाहतो. साधकांमध्ये इतरांबाबत आत्मवत् भावना निर्माण होते. जेथे ज्ञान उत्पन्न होते तेथे अज्ञान राहात नाही. शोक, मोह, अविद्या तेथे समाप्त होते. अविद्याच साऱ्या अनिष्टाचे कारण आहे. अज्ञान न राहिल्याने त्याचा परिणाम म्हणजे आनंदाची उपलब्धी होते. अज्ञान दोषाच्या निवृत्तीमुळे काम, क्रोध, अधर्माचरण, अन्याय, असत्याचरण इत्यादी दोष स्वत:च दूर होतात.

## व्यक्ती आपल्या दोषांशी समन्वय कसा करते ?

(१) आज सर्व जग खोटेपणा, छळ, कपट, इत्यादींचा व्यवहार करते. मी एकटाच या गोष्टींपासून कसा बचाव करू शकतो. मला ही या जगात राहावयाचे आहे.

(२) मी कुणी योगी, ऋषी, महात्मा नाही की माझ्याकडून एखादी चूक होणार नाही.

(३) पीठात मीठ याप्रमाणे खोटेपणा चालतोच हा मोठा दोष नाही असा विचार करते.

(४) अधिक दोषी व्यक्तीला पाहून व्यक्ती विचार करते की मी तर त्याच्या पेक्षा फार कमी दोषी आहे.

(५) व्यक्ती जे दोष सोडू इच्छित नाही त्यांना उत्तम स्वरूप देऊन समर्थन करते.

(६) आपल्या लहान सहान दोषांना स्वीकारते व मोठे दोष नसल्याचे भासविते.

## दोषांपासून मुक्ती कशी मिळवावी ?

'तू फार चांगला आहेस' असे म्हणून आई बालकाला बिघडवते. त्यामुळे बालक अभिमानी बनते. नंतर त्याला दोष दाखविताच ते भांडते, क्रोध करते, रडते.

दोष सांगणारा आपला हितकर्ता असतो. ऐकण्यात आनंद वाटला पाहिजे. जो दोषांना जाणून ते दूर करण्याचा प्रयत्न करीत नाही तो कधीही दोषांपासून मुक्त होऊ शकत नाही. चुकीने खोटा दोष सांगणाऱ्यामुळेही दु:खी होता कामा नये जो दोष निर्भयपणे स्वीकारतो त्यालाच लोक दोष दाखवितील. जर दोष दाखविणाऱ्यावर नाराज

 

व्हाल तर कोणीही दोष दाखविणार नाही दोष दाखवून कोण संघर्ष करणार? जर दोषांशी समन्वय केला तर ते कधीही दूर होणार नाहीत.

## मनो नियंत्रणाव्दारे दोषांची निवृत्ती

(१) इतरांनी केलेल्या खोटया आरोपाला आपण स्वीकारू नये म्हणजे दुःख होणार नाही.

(२) अशी एकही व्यक्ती नाही की जिच्यावर आरोप व आक्षेप घेतला गेला नाही. ईश्वरही त्यापासून सुटलेला नाही.

(३) खोटे आरोप, अन्याय इत्यादी थांबणारे नाहीत परंतु आपल्या संस्कारांना असे नियंत्रित करा की ते भडक स्वरूपात प्रकट होणार नाहीत.

(४) आपण दुसऱ्याच्या वाणीने दुःखी होतो त्याचे कारण आपणच असतो. विचलित न होता सहन करणे शिकले पाहिजे.

(५) आपल्या मनाला आग लावणारे आपणच असतो. संकल्प दृढ करावा की जगातील कोणतीही व्यक्ती आपल्या कटू विचार किंवा वाणीने मला विचलित करू शकत नाही.

(६) अष्टांग योगाने ईश्वराची उपासना करण्याने मनावर नियंत्रण करता येते 'हे ईश्वरा मला शक्ती दे की या आरोपांनी मी विचलित होता कामा नये किंवा दुर्भावना ठेवता कामा नयें'

(७) सुखी लोक मनाच्या शांतीमुळे नम्र असतात व मनाची शांती ही धर्मानुष्ठानाने व प्रसन्नचित्तामुळे उपलब्ध होते.

## शयनापूर्वी आत्मावलोकन

या क्षणी काही प्रश्नांची उत्तरे या प्रकारे शोधली पाहिजेत.

(१) माझा व्यवहार समाजाच्या व्यापक हिताच्या विरोधी तर नाही ना ?

(२) मी आपल्या व्यक्तिगत लाभासाठी एखाद्याला त्रस्त किंवा त्यापासून वंचित तर केले नाही ना ?

(३) चांगले वाईट, योग्य अयोग्य यांचा विवेक करण्यात चूक तर झालेली नाही ना ?

(४) मी किती विधायक व किती विध्वंसक कार्य केले ?

(५) गरजू व्यक्तींना मदत केली काय ?

(६) अवांछनीय तत्त्व व घटनांचा विरोध करू शकलो की नाही ?

(७) सामाजिक अन्याय व शोषणामध्ये मी सहभागी झालो काय ?
की त्यांचा बळी ठरलो ? अथवा पूर्ण प्रतिकार केला?
(८) भविष्यात विशेष परिस्थितीमध्ये माझा व्यवहार व प्रतिक्रिया कशी असावी?
(९) ईर्षा, व्देष, मत्सर इत्यादींनी युक्त तर झालो नाही ना ?
(१०) माझ्यामुळे कुणाची हिंसा तर झाली नाही ना ?
(११) देश, धर्म, मानव समाजाच्या रक्षणार्थ एखादा परोपकार केला काय ?
(१२) माझा स्वभाव, वाणी, वागणूक इत्यादींनी कोणी दु:खी तर झाले नाही ना ?
कुणी कष्टी, खिन्न, भयभीत किंवा त्रस्त तर झाला नाही ना ?

जीवनातील दु:खाचे कारण कोणते ते शोधून काढावे. त्याला आटोक्यात आणण्यासाठी आत्मनिरीक्षण करावे आपण वाणी व कृती इत्यादींमुळे दोष उत्पन्न करतो. त्यामागे आपले अज्ञान, कुवासना आहेत. केरकचरा पाहणार नाहीत. तर साफ कसे करणार ? म्हणून प्रथम सूक्ष्मतेने दोष शोधावे व नंतर दूर करावे.

**मानवाचा एक भयंकर दोष :** सत्याला ग्रहण करणे व असत्याला दूर करणे या साठी तो प्रयत्न करीत नाही.

## ईश्वर प्रणिधान

ईश्वर प्रणिधान - समाधीचे विशिष्ट साधन आहे.

(१) प्रणिधानात् भक्तिविशेषात् (यो.द. १/१३) व्यास भाष्य ईश्वराची विशेष भक्ती करणे अर्थात् ईश्वरामध्ये सर्वापेक्षा जास्त प्रेम ठेवणे.

(२) ईश्वर प्रणिधानं सर्व क्रियाणां परमगुरावर्पण तत्फलसंन्यासो वा । यो.द. २/१ (व्या. भाष्य)
आत्मा, मन, वाणी व शरीर यांनी केलेले कर्म ईश्वर समर्पित करणे व लौकिक फळ न इच्छिणे.

(३) ईश्वर प्रणिधानं तस्मिन् परमगुरौ सर्वकर्मार्पणम् । (यो. द. २/३२ व्या. भाष्य)
त्या परमगुरू परमेश्वराला सर्व कार्य अर्पण करणे अर्थात् ईश्वराज्ञेनुसार सर्व क्रिया करणे.

साधक जपामध्ये कधी कधी पाठाचे उच्चारण करतो पण अर्थाचा विचार करीत नाही. कधी पाठ व अर्थाचा विचार दोन्ही करतो. पण ईश्वर समर्पित होत नाही. कित्येक वेळा समर्पित होतो पण पाठाचे उच्चारण करीत नाही. जेव्हा ही तिन्ही कार्ये होतात तेव्हा ध्यानामध्ये सफलता प्राप्त होते.

ईश्वर समर्पणामध्ये तीन साधनांनी काम करू शकतो. प्रत्यक्ष प्रमाण, शब्दप्रमाण व अनुमान प्रमाण जेव्हा ईश्वर प्रत्यक्ष नाही तर समर्पण कसे करावे ? प्रत्यक्ष तर समाधी अवस्थेमध्येच होतो. म्हणून सामान्य साधकाचे अनुमान व शब्द प्रमाण या व्दारे समर्पण होऊ शकते.

शब्द प्रमाणांनी जाणले की ईश्वर सच्चिदानंदस्वरूप, निराकार, अनुपम, सर्वाधार, सर्वेश्वर आहे. या जगाला पाहिल्यावर हे अनुमान करता येते की याला चालविणारा कोणी सर्वज्ञ, सर्वशक्तिमानच असू शकतो.

ईश्वराची अनन्य भक्ती करणे, त्याच्या मध्येच मग्न होणे व समर्पण करणे, ईश्वराच्या आज्ञेचे पालन करणे अशा प्रकारचे ईश्वर प्रणिधान समाधीचे एक विशेष साधन आहे. जर हे वैदिक रीतीने साधकाला करणे जमले तर ताबडतोब समाधी लागेल.

ईश्वर साक्षात्कार करून योगी प्रत्यक्ष प्रमाणाच्या साहयाने ईश्वर प्रणिधान करतात. इतर साधक मात्र अनुमान व शब्द प्रमाणांनी ईश्वर प्रणिधान करतात. इतर सर्व गोष्टींचा त्याग करून ईश्वर प्राप्त करण्यायोग्य आहे हे जाणावे. ऐकलेली व शिकलेली गोष्ट क्रिया रूपात कशी आणली पाहिजे ? प्रातःकाळी व सायंकाळी व्यक्तिगत उपासनेमध्ये (क्रियारूपाने) ईश्वराशी संबंध जोडण्याचा प्रयोग करावा. प्रणिधान करतांना ईश्वराशी माता, पिता, स्वामी, राजा व्याप्य व्यापक इत्यादी संबंध असावेत.

(१) सर्व काही परम गुरू परमेश्वराला अर्पण करावे. जसे सत्संग भवनामध्ये आहार विहार योगाभ्यास इत्यादी केला जातो तरीही त्याला आपण स्वतःचे समजत नाहीः त्याप्रमाणेच हे जग व त्यातील पदार्थ ईश्वराचे मानून उपयोग करावा त्यावर आपले स्वामित्व मानू नये.

(२) हे शरीर आपल्याला ईश्वराकडून प्राप्त झालेले आहे. आपण यात भाडयाने राहतो. याचा प्रयोग करतो मालक नाहीत. ज्या बुध्दीचा एवढा अभिमान करतो तीही ईश्वरदत्त आहे. जर ईश्वराने दिलेल्या सर्व वस्तू परत घेतल्या तर जीवात्मा काहीच करू शकत नाही. ईश्वराने दिलेल्या वस्तू आपल्या मानणे ही चोरी होय. कर्मांचे फळ मिळावे ही इच्छा सोडून देणे ईश्वर प्रणिधान होय.

(३) सर्व माणसांना व प्राण्यांना प्रभूच्या परिवाराचे सदस्य समजणे 'आत्मवत् सर्वभुतेषु' चा व्यवहार हे ईश्वर प्रणिधान आहे.

# ईश्वर प्रणिधान विधी

(१) ईश्वराचे स्वरूप जाणणे.
(२) सर्व पदार्थांचे आदिमूल ईश्वराला समजणे.
(३) सर्व साधनांचा प्रयोग ईश्वराच्या आज्ञेनुसार करणे.
(४) लौकिक फळाची कामना न करणे.
(५) ईश्वर मला पाहतो, ऐकतो, जाणतो असा विचार सदैव बाळगणे व स्वत:चे अस्तित्व ईश्वरामध्येच आहे असे समजणे.
(६) ईश्वरामुळेच मी कार्य करण्यास समर्थ झालो आहे असे ज्ञान बाळगणे.
(७) प्रथम स्थूल कार्य व नंतर सूक्ष्म कार्य करीत ईश्वर समर्पित होणे.
(८) कार्यारंभापूर्वी ईश्वराची आज्ञा घेणे व शेवटी धन्यवाद मानणे.
(९) ईश्वरासाठी 'हा, तो' शब्दाच्या ऐवजी 'आपण' या शब्दाचा प्रयोग करावा.
(१०) प्रत्येक कार्यात सफलता प्राप्त व्हावी यासाठी त्याच्या साह्याची इच्छा बाळगणे.

# ईश्वर प्रणिधानामध्ये जीवाची स्थिती

यदग्ने स्यामहं त्वं त्वं वा घा स्या अहम् ।
स्युष्टे सत्या इहाशिषः (ऋग् ८-४४-२३)

**अर्थ :** (अग्ने) हे प्रकाशस्वरूप (यद् अहम् त्वं स्याम्) जेव्हा मी तू होईन (वाघा) किंवा (त्वं अहं स्याः) तू मी होशील तेव्हा (ते इह आशिषः) या ज़गातील तुझे सर्व आशीर्वाद (सत्याः स्युः) सफल होतील.

जेव्हा ही एकात्मतेची स्थिती एखाद्या मित्राप्रमाणे, ईश्वरप्रणिधानामुळे उत्पन्न होते तेव्हा ईश्वर जीवाला ताबडतोब आपलेसे करून त्याला आपले ज्ञान, बल, आनंद, देऊन कृतकृत्य करतो. अशा प्रकारचे ईश्वर प्रणिधान (ईश्वराची अनन्यभक्ती, प्रेम, श्रध्दा, विश्वास) ही योगाची वैशिष्टये होत. यामुळे साधकाला ताबडतोब सफलता प्राप्त होते.

योगी व्यक्तींचे दिवसभर ईश्वर समर्पण असते. प्रत्येक कार्य करताना प्रत्येक क्षणी ईश्वराला समोर ठेवून अन्तर्मनाने ते समर्पित असतात. त्याचा परिणाम असा-

(१) व्यक्तीचे योग्य काम सिध्द होते. ती विद्यायुक्त होऊन राग, व्देष, काम, क्रोध, ईर्ष्या, अहंकार इत्यादी पासून मुक्त असते.
(२) व्यक्ती कधी हताश, निराश होत नाही.

(३) तात्काळ समाधी प्राप्त करून घेता येते.

(४) सर्व कार्य ईश्वराची आज्ञा समजून निष्काम भावनेने करते. सकाम कर्ता प्रणिधानाच्या स्थितीत येत नाही.

पूर्वोक्त सफलतेसाठी अनुमान व शब्द प्रमाणांनी ही भावना उत्पन्न केली पाहिजे की ईश्वर मला पाहात आहे, ऐकत व जाणत आहे ही गोष्ट मनात ठसली पाहिजे की माझा व ईश्वराचा व्याप्य व्यापक संबंध असल्यामुळे मी ईश्वरामध्येच आहे व ईश्वर माझ्या आत बाहेर सर्वत्र विद्यमान आहे. आपण ईश्वरातच जन्म घेतो आपले पालन होते व शरीराचा त्याग करतो. ईश्वराने जर जीवात्म्यांना शरीरे दिली नसती तर आपल्याला अनुभूतीही झाली नसती. प्रलयावस्थेत आपण दगडाप्रमाणे मूर्च्छित असतो शरीर, बुध्दी, मन इत्यादी साधने ईश्वराच्या साह्या खेरीज काहीही करू शकत नाहीत 'हे सर्व स्वतःच होत आहे' असे मिथ्या ज्ञान असेल तर ईश्वराची अनुभूती होणार नाही. हे सर्व कोणत्या ना कोणत्या तत्त्वाव्दारे (ईश्वर) बनविलेले आहे कारण बनविल्या खेरीज कोणताही जड पदार्थ कार्यरूपात येऊ शकत नाही.

सुरूवातीच्या काळात डोळे बंद करून अन्तर्वृत्ती ठेवावी. बाह्य विषयांचा विचार बंद झाल्यावर ईश्वराची अखंडित उपासना करू शकू. ईश्वराचे सामिप्य स्थापित करण्यासाठी आपण शब्दाचा प्रयोग करावा 'आपण आमचे पिता आहात' हे संबोधन करावे.

सफलता प्राप्त होण्यासाठी ईश्वराचे साहय नेहमीच असते, असे समजावे जसा टी. वी. उद्घोषक हे जाणतो, मानता की लाखो करोडो लोक मला पाहतात, माझे बोलणे ऐकतात म्हणून तो स्वस्थ व सावधान होऊन व्यवस्थित बोलतो. तसे उपासकाने ही शब्द व अनुमान प्रमाणाने जाणावे की ईश्वर माझी प्रत्येक कृती, प्रत्येक कार्य, एवढेच नव्हे तर मनोभावही जाणत आहे ऐकत व पाहात आहे.

साधकाचा ईश्वरावर शाब्दिक विश्वास आहे परंतु तात्त्विक विश्वास नाही. अन्यथा व्यक्ती कोणतेही विपरीत कार्य करणारच नाही. ईश्वराचे महत्त्व (मूल्य) समजल्याने व जाणण्याने ईश्वर प्रणिधान होते. ईश्वराकडून प्राप्त झालेल्या सुखाचे ज्ञान झाल्याने ईश्वराबाबत रुची वाढते. इंद्रियांनी जे सुख भोगत आहोत ते दुःखमिश्रित व क्षणिक असते. त्याला भोगण्याचे सामर्थ्यही कमी होत जाते. इंद्रियांचे विषय अनित्य आहेत म्हणून त्यांच्या पासून प्राप्त होणारे सुखही अनित्य असते. दुसरीकडे भोगणारा आत्मा ही नित्य व ईश्वराचा आनंदरूपी भोग ही नित्य आहे. कोणतेही भौतिक सुख

 

अन्य प्राण्यांना दु:ख दिल्याखेरीज भोगले जात नाही परंतु ईश्वराचा आनंद तर अन्य प्राण्यांना त्रास न देताच मिळतो.

## ईश्वर प्रणिधानाने समाधी सिध्दी

जर व्यक्तीने ईश्वरप्रणिधान योग्य रीतीने केले तर समाधी सिध्द होते. सर्व क्रिया परमगुरूला अर्पण कराव्या व लौकिक फळाची इच्छा धरू नये.

व्यक्ती आपल्या जीवनात सतत मानसिक वाचिक व शारीरिक क्रिया करीत असते. या सर्व क्रिया ईश्वरार्पण कराव्या व कोणत्याही फळाची इच्छा धरू नये.

जसा एखादा बालक आपल्या गुरूजवळ बसून शिकतो त्याप्रमाणेच आम्हा जीवात्म्यांना मानसिक वाचिक व शारीरिक रूपाने ईश्वरासमोर राहूनच सर्व काही करावयाचे आहे. हे यासाठी कठीण वाटते की आई वडील गुरू यांनी आपल्याला अशा प्रकारची शिकवण दिलेली नाही व जी गोष्ट किंवा विद्या व्यवहारात आणली जात नाही ती कठीण वाटते व पूर्णपणे समजत नाही.

आपण जो विचार करतो तो ईश्वर पाहात किंवा जाणत नाही काय ? एक तर स्वत:ला श्रध्दापूर्वक अर्पण करणे किंवा जबरदस्तीने करणे. चांगली मुले स्वत: इच्छेने केलेले पाठ (कार्य) दाखवितात परंतु लबाड मुले इकडे तिकडे भटकतात. श्रध्दापूर्वक स्वत:ला ईश्वराला समर्पित करावे 'हे ईश्वरा ! हे हात, पाय, नाक, तोंड, शरीर, मन, बुध्दी सर्व तुम्हीच दिलेले आहे व जल, स्थळ, फळ, फूल, सर्व तुम्हीच बनविलेले आहे. म्हणून तुमच्यापासून लपून कधी काही झालेले नाही व होणार नाही. तेव्हा यासर्वगोष्टी ईश्वराच्या मानण्यात आमची हरकत का असावी ? एवढेच नव्हे याचा लाभ असा की ईश्वर आपला सहायक बनून आपली समाधी लावून त्याचे ज्ञान, बल, आनंद देईल. ऋषी म्हणतात ईश्वरावर अत्यंत प्रेम करावे, आपल्या प्राणाहून अधिक. यालाच भक्ती म्हणतात. त्याच्या आज्ञेचे पालन करावे. सर्व क्रिया व वस्तू ईश्वराच्या मानून प्रयोग करावा या गोष्टी लक्षात घ्याव्या. प्रथम संध्येमध्ये, नंतर व्यवहारात, दिवसभराच्या जीवनात ईश्वराला अर्पण होण्याचा अभ्यास करावा. तेव्हा नंतर सर्व कार्य करीत असतानाही समाधी लागते. हे ऐश्वर्य प्राप्त करणे आपल्या हातात आहे. तरीही आपण प्राप्त करीत नाही असे म्हटले आहे -

आनंद स्त्रोत बह रहा पर तू उदास है।
अचरज है जल में रहके मछली को प्यास है॥

 

**आपला व ईश्वराचा संबंध :** ईश्वर आपली माता, पिता, गुरू, शासक, नियन्ता, पालक आहे, तरीही जीव त्याला विसरून संसाराच्या खस्ता खात फिरतो. संसार आपला समजून दुःखी होतो. प्रथम संध्या उपासनेमध्ये ईश्वरसंबंध कायम ठेवावा व जे काही आम्ही करतो ते सर्व ईश्वर पाहतो असे समजावे तेव्हा हळूहळू ईश्वराशी नेहमीसाठी संबंध जुळतो.

**समर्पण भावनेने ईश्वराचा शोध :** जेव्हा ध्यान केले जाते तेव्हा आत्मनिरीक्षण करावे. मी खरेच ईश्वरार्पित आहे काय ? ईश्वराला कुठे तरी दुसऱ्या देशात मानून साधक त्याचे ध्यान करतो. जसे आपल्या डोक्यात असते की तो ईश्वर आमचा राजा, गुरू , पिता, सर्वव्यापक, सर्वज्ञ व न्यायकारी आहे. 'तो' या शब्दाचा प्रयोग करताना आपण ईश्वराला कुठे तरी दूर मानतो 'तो' च्या पुढे विचार करावा. म्हणजे साधक ईश्वराला शरीराच्या बाहेर, आत, उजवीकडे, डावीकडे, वर, खाली सर्वत्र स्वीकारतो. त्याला मस्तक, हृदय, नाभी मध्ये ही मानतो. परंतु स्वतः आत्म्याला सोडून देतो. अशाने ईश्वरप्राप्ती होणार नाही. जेथे दोघे असतात तेथेच दर्शन होईल. जी वस्तू जशी आहे तिला त्याच रूपात पाहण्याने ती दिसू शकेल. जर जीवात ही ईश्वर आहे तर तो दिसेल. जेव्हा पाहण्याची अभिलाषा निर्माण होईल तेव्हा ईश्वराचे दर्शन होईल सर्वव्यापकाचे दर्शन आत्म्यामध्येच होईल 'ब्रह्मवित् ब्रह्मवत् बनतो' हे भावनात्मक कथन इतरांनी सिध्दांत मानून ग्रहण केलेले आहे. हे चुकीचे आहे 'रसो वै सः' ईश्वर आनंद स्वरूप आहे. त्याचा स्वीकार करण्याने जीवात्मा आनंदी बनतो. पण आनंद स्वरूप बनत नाही. या प्रकारचे आत्मनिरीक्षण करावे की आपण आत बाहेर ईश्वराला विद्यमान मानून समर्पित होत आहोत काय ? या ध्यानात पिता, पुत्र, उपास्य-उपासक इत्यादी संबंध आहे किंवा नाही ? घाण्याच्या बैलाप्रमाणे वारंवार जप करण्याने कोणताही लाभ होत नाही. जपमाळ घेऊन लाख लाख जप केला जातो पण ईश्वर समर्पणा शिवाय सर्व निरर्थक आहे.

## ईश्वर प्रणिधानाने लाभ

(१) राग (मोह) व्देष इत्यादी दुःख देत नाहीत.
(२) शरीर, मन, इंद्रियांवर नियंत्रण असते.
(३) ईश्वराकडून ज्ञान, बल, आनंद, निर्भयता यांची प्राप्ती होते.
(४) स्वार्थाची भावना दबून परोपकाराची भावना निर्माण होते.
(५) अभिमान व निराशा यांचा नाश होतो.
(६) व्यक्तीचे कर्म निष्काम होते.

 

(७) विषय भोगाची तृष्णा (रुची) समाप्त होते.

(८) आळस प्रमाद दूर होतो.

(९) आत्म्याच्या स्वरूपाचे ज्ञान होते.

(१०) ताबडतोब समाधी लागते.

## ईश्वर प्रणिधानाचे फळ

योग दर्शनाच्या साधनापाद सूत्र ४५ मध्ये ईश्वर प्रणिधानाचे फळ समाधी सिध्दी हे सांगितलेले आहे. 'समाधिसिध्दिदीश्वर प्रणिधानात्' म्हणजे देशांतर, देहान्तर व कालान्तराचे पदार्थ योगी जाणतो. असे दिसून येते की सामान्य व्यक्ती एका वस्तूला जाणल्यानंतर त्याच प्रकारच्या (थोडीशी बदलून) दुसऱ्या वस्तूला जाणत नाही म्हणून ती प्रकृतीच्या इतर विभिन्न विकारांना पाहून मोहित किंवा आकृष्ट होते. एका स्त्रीबाबत विरक्त होऊन इतर स्त्रीकडे आकृष्ट होते. परंतु समाधी सिध्दी प्राप्त झालेल्या योगी पुरुषामध्ये असे घडत नाही कारण तो हे जाणतो की संसारात तीन पदार्थ नित्य आहेत. ईश्वर, जीव, प्रकृती मग ते कोणत्याही देशात, कोणत्याही काळात अथवा अन्य शरीरात असोत त्यांचे गुण नेहमी समानच राहतील योगी पुरुष या तीन पदार्थांना यथार्थ स्वरूपाने जाणतो की कोणती वस्तू उपादेय आहे व कोणती त्याज्य आहे. थोडया फार आकृती, रंगभेदाशिवाय सर्व देश किंवा भूखंडावर एकाच प्रकारची माणसे, पशू, पक्षी इत्यादी आहेत.

एक उद्दिष्ट असल्यामुळे योगाच्या सर्व अंगांचा एकाच वेळी अभ्यास व क्रियान्वयन आवश्यक आहे. तरीही ईश्वर प्रणिधान असल्यामुळे योग्याची ताबडतोब समाधी लागते. याच्या खेरीज योगाची दुसरी अंगे अपूर्ण आहेत.

## ईश विश्वास - ईशकृपा

**विश्वास असल्यामुळे लाभ :** जी निर्भयता व आनंद एका आस्तिकाला प्राप्त होतो तो नास्तिक (कितीही साधन संपन्न असेल तरीही) प्राप्त करू शकत नाही. तो योग्या प्रमाणे चरित्रवान व परोपकारी होऊ शकत नाही.

ईश्वराला न मानणारेच नास्तिक नाहीत तर चुकीच्या पध्दतीने मानणारे व फक्त शाब्दिक रूपात खरे मानणारे आचारहीन ही नास्तिकच आहेत.

मोक्षप्राप्तीमध्ये सर्वात मोठी बाधा म्हणजे ईश्वरावर विश्वास नसणे होय. याचे कारण हे आहे की ज्या वस्तूत रूप, रस, गंध, शब्द दिसून येतात त्यावरच विश्वास

करण्याची आपल्याला सवय पडलेली आहे.

ईश्वराला मानणे म्हणजे ईश्वराच्या आज्ञेचे पालन करणे व त्याची उपासना करणे. जो ईश्वराने निर्दिष्ट केलेले शुभ कर्म करतो तो सुख प्राप्त करतो: त्याच्या आज्ञेचे पालन न करता त्याला केवळ शाब्दिक रूपाने मानण्याने काही ही प्राप्त होत नाही. जो नास्तिक ईश्वराज्ञेचे पालन करून ही ईश्वराला मानत नाही त्याला ईश्वर आपल्या नियमानुसार फळ देतो. ईश्वराला मानण्याने समाधी व मोक्षाचे जे आनंदाचे फळ आहे ते त्याला प्राप्त होत नाही.

वेद इत्यादी सत्य शास्त्राच्या स्वाध्यायाने व आप्त पुरुषांच्या सत्संगाने ईश्वरासबंधी ज्ञान प्राप्त होऊ शकेल. परंतु ईश्वरकृपेशिवाय ईश्वराचा आनंद मिळणे शक्य नाही.

**ईशकृपा :** जो जो जितका जितका संसाराचा उपकार करतो तितका तितका ईश्वर त्याच्यावर मुक्त हस्ताने कृपेची बरसात करतो. ईश्वर समानरूपाने सर्वांवर दया करतो व न्याय ही देतो पण तो आपापल्या कर्मानुसार कुणाच्या मानण्या न मानण्याने ईश्वराचे सत्य तत्त्व कधी नष्ट होत नाही. जो हे मानील त्याला लाभ होईल व न मानील तर नुकसान होईल.

## ईश्वरावर श्रध्दा कशी ठेवावी ?

(१) ईश्वर आपले जीवन व हा संसार यांचा आधार आहे.
(२) वेदज्ञानाचा दाता व अन्त:करणात प्रेरणा देणारा आहे.
(३) आपल्याला सुख देणाऱ्या जड, चेतन सर्व पदार्थांचा आदिमूल परमेश्वर आहे.
(४) ईश्वर आपल्या कर्माचे फळ देतो.
(५) ईश्वर आपला सर्वाधिक हितकर्ता आहे.
(६) ईश्वराकडूनच शाश्वत सुख प्राप्त होते.
(७) ईश्वर सर्व गुण संपन्न आहे. जीव व प्रकृतीमध्ये अनेक दोष आहेत.
(८) ईश्वर आपल्याला आत्यंतिक सुख देतो व मोबदल्यात काहीही घेत नाही.
(९) ईश्वर आपली साथ कधी सोडत नाही.
(१०) ईश्वराच्या उपासनेने पाप कर्म व दु:खांपासून व्यक्तीचा बचाव होतो.

 

## ईश्वरीय सुखाची वैशिष्टये

(१) ईश्वरीय सुखाच्या प्राप्तीत बाहय साधनांची अपेक्षा कमी असते.
(२) हे सुख सर्वत्र उपलब्ध आहे.
(३) हे सुख नित्य आहे.
(४) हे शुध्द असून चार प्रकारच्या दु:खांनी रहित आहे.
(५) हे सुख चोरता येत नाही, हिरावून घेता येत नाही.
(६) या सुखाच्या प्राप्तीसाठी पाप करावे लागत नाही.
(७) यामुळे व्यक्ती मन व इंद्रियांचा स्वामी बनते.
(८) ईश्वरीय सुखामुळे स्वत: सुखी होऊन व्यक्ती दुसऱ्यांनाही आनंदित करते.
(९) हे सुख कुसंस्कार नाशक असते.
(१०) यामुळे व्यक्ती स्वस्थ, शांत, प्रसन्न , संतुष्ट बनते.
(११) यामुळे व्यक्ती निष्काम कर्ता बनते.
(१२) ईश्वरीय सुखाने व्यक्तीला उबग येत नाही.
(१३) हे सुख भोगणारा कालान्तराने मुक्ती प्राप्त करतो.

## सत्याची व्याख्या व त्याचे फळ

(१) जो पदार्थ जसा आहे त्याला तसेच म्हणणे, लिहिणे, मानणे हे सत्य होय.
(२) जे सत्याच्या ठिकाणी असत्याचाच प्रचार करते ते सत्य नसते.
(३) जो माणूस पक्षपाती असतो तो आपल्या असत्याला सत्य व दुसऱ्याच्या सत्यालाही असत्य सिध्द करण्याचा प्रयत्न करतो. म्हणून तो सत्यवादी बनू शकत नाही.
(४) माणसाचा आत्मा सत्यासत्य जाणणारा असतो. तरीही आपल्या प्रयोजनाची सिध्दी, हट्ट, दुराग्रह व अविद्या दोषांनी सत्याला सोडून तो असत्याकडे वळतो.
(५) ज्यामुळे मानवजातीची उन्नती व उपकार होतात ते सत्य होय.
(६) नेहमी सत्याचा विजय व असत्याचा पराजय होतो.

## सत्य कशा प्रकारे सांगावे

(१) परीक्षा करून सर्वांवर उपकार करण्यासाठी बोलावे.
(२) सर्वहितकारी व प्रिय वाणी बोलावी.
(३) आवश्यकतेपेक्षा कमी किंवा जास्त बोलू नये.

 

(४) अपात्र व्यक्ती किंवा अयोग्य स्थानी बोलू नये.

(५) व्याकरणानुसार शुध्द बोलावे.

असत्य बोलण्यापेक्षा न बोलणे चांगले. बोलावे, परंतु सत्य बोलावे. सत्य मधुरतेने बोलावे. सत्य व प्रिय वचन धर्मानुसार असावे.

**सत्याचे फळ** : सत्याचरण करणाऱ्याचा विश्वास त्याचे शत्रूही करतात. खोटे बोलणाऱ्यावर त्याची पत्नीही विश्वास ठेवत नाही. पूर्वी जेव्हा आर्य समाजी सत्याचे पालन करीत होते तेव्हा कोर्टाचा न्यायाधीश आर्य जे बोलेल त्याला सत्य (प्रमाण) मानून न्याय (निर्णय) देत असत. बालक नेहमी आचरणाचे अनुकरण करते, उपदेशाचे नव्हे. मुलगा आपल्या आईबापाचे दर्पण असतो. त्याचा प्रभाव जाती राष्ट्र व जगावर पडतो. दोषयुक्त असणाऱ्यांसाठी सत्य प्रथम कटू पण परिणामी अमृत असते.

## संशय महाशत्रू

योगाभ्यास असो की सांसारिक कार्य, संशय हा सर्वात मोठा शत्रू (विघ्न) आहे. त्यामुळे व्यक्तीमध्ये कार्य करताना शिथिलता निर्माण होते व त्यामुळे रुची, उत्साह, मंद पडतात. एखाद्या वस्तूला यथार्थ रीतीने जाणावयाचे असेल तर संशय सहायक आहे. परंतु जाणूनही संशय असेल तर त्या वस्तूला न प्राप्त करण्याची, न सोडण्याची अशी स्थिती निर्माण होते.

'संशयात्मा विनश्यति' (गीता)

## संशय उत्पत्तीची कारणे

(१) **समान धर्मोत्पत्ती** : जेव्हा दोन वस्तूंमध्ये समान धर्माची उपलब्धी होते परंतु विशेष धर्म कळत नाही. जसे चांदण्या रात्री पानगळीचा वृक्ष व माणूस यांची लांबी रूंदी सारखी दिसते परंतु विशेष धर्म म्हणजे हातपाय हालताना चालताना दिसत नाहीत. फांद्या हालताना दिसत नाहीत तेव्हा व्यक्तीला शंका येते की हा वृक्ष आहे की मनुष्य?

(२) **अनेक धर्मोत्पत्ती** : द्रव्यामध्ये अनेक गुण असतात. काही गुण इतर द्रव्यांसारखे ही असतात परंतु आपल्या विशेष गुणांमुळे ते द्रव्य अन्य द्रव्यांपासून वेगळे मानले जातात या सर्वांचे आपापले वैशिष्ट्य असते. 'गंध' हा पृथ्वी महाभूताचा गुण आहे. हा गंधगुण पृथ्वी महाभूताच्या सजातीय जल, अग्नी, वायू महाभूतामध्ये दिसून येत नाही व पृथ्वी महाभूताच्या विजातीय गुण व कर्मामध्ये ही पाहिला जात

 

नाही. तेव्हा हा संशय येतो की गंधगुण द्रव्याचा आहे की गुणाचा की कर्माचा.

(३) **विपरीत धर्मोत्पत्ती** : एखाद्या विषयात विपरीत गोष्ट ऐकणे जसे एक म्हणतो ईश्वर आहे, दुसरा म्हणतो की नाही.

(४) **प्राप्तीमध्ये अडथळा** : दुपारी रखरखीत उन्हात वाळवंटात दूर मृगजळ दिसते तेव्हा हा संशय येतो की वास्तविक अंतरावर तलावात जल आहे की मृगजळ नेत्रांनी वस्तूंची प्राप्ती असूनही अडथळयामुळे संशय निर्माण होतो.

(५) **उपलब्ध नसल्यामुळे अव्यवस्था** : वस्तू असूनही काही वेळा मिळत नाही किंवा ती नसतेच म्हणून मिळत नाही. जसे एखाद्या जुन्या खजिन्यातील पुरलेल्या धनाचा घडा खरे स्थान न सापडल्यामुळे मिळत नाही किंवा तेथे घडा नसल्यामुळे ही मिळत नाही.

## ईश्वरीय ज्ञान वेद

वैदिक धर्माप्रमाणे विश्वातील सर्व आस्तिक मत जसे इस्लाम, पारशी, ख्रिश्चन इत्यादी ईश्वरीय ज्ञानाची आवश्यकता मानतात व त्याच बरोबर सर्वजण आपापल्या धर्मग्रंथांना ईश्वरीय ग्रंथ होण्याचा अट्टाहास बाळगतात. पण आजच्या वैज्ञानिक युगात या पुस्तकांना तर्क व प्रमाणाच्या कसोटीवर पारखावे म्हणजे सत्य कळेल.

## ईश्वरीय ग्रंथाची कसोटी

जर निष्पक्ष दृष्टीने विचार केल्यास कोणत्याही ईश्वरीय ग्रंथामध्ये खालील गुण व लक्षणे असली पाहिजेत.

(१) ग्रंथाचा आविर्भाव मानवसृष्टीच्या आरंभी असला पाहिजे.

(२) अशा पुस्तकात मानवी इतिहास असता कामा नये.

(३) ते ज्ञान सृष्टिविज्ञानाचे सत्य व सनातन नियमाच्या अनुकूल व प्रकृतीच्या गुणांना व रहस्यांना उलगडणारे पाहिजे.

(४) ते ज्ञान तर्कसंगत, विवेकपूर्ण, वैज्ञानिक व विरोधापासून मुक्त असावे.

(५) ते ज्ञान आस्तिकाच्या दृष्टीने ईश्वर, जीव, प्रकृतीचे मूळ गुण व पारस्परिक संबंधांची स्पष्ट व्याख्या करणारे असावे.

(६) ते पुस्तक संपूर्ण भौतिक व मानवीय ज्ञान विज्ञानाचा आदि मूळ स्त्रोत असावे.

(७) ते ज्ञान सार्वदेशिक, सार्वभौमिक, समतावादी, निष्पक्ष व प्राणी मात्रासाठी समान हित करणारे असावे.

(८) ते जगातील मानवासाठी समान असावे. त्यात जाती, वंश, रंग, देश, भाषा व लिंगाच्या आधारावर भेद नसावेत.

(९) ते पूर्व-पश्चिम, उत्तर-दक्षिण, गरीब-श्रीमंत, गोरा काळा सर्व प्रकारच्या भेदभावापासून मुक्त असावे.

(१०) त्यात वर्गव्देष, जातिव्देष, संकुचितपणा व ढोंग पाखंड नसले पाहिजे.

## धर्म ग्रंथाची परीक्षा

वेद, कुराण, बायबल, जिन्दावस्ता पैकी कोणता ग्रंथ उपरोक्त कसोटीवर खरा उतरतो याचा विचार झाला पाहिजे.

पारशांचे जिन्दावस्ताँ जवळ जवळ साडेतीन हजार (३५००) वर्षे, ख्रिस्ती लोकांचे बायबल जवळ जवळ दोन हजार वर्षे व मुसलमानांचे कुराण जवळ जवळ (१५०० वर्षे) जुने आहे. वैज्ञानिकांच्या परीक्षानुसार मानवसृष्टी लाखो वर्षांपूर्वीची जुनी आहे मग हा प्रश्न निर्माण होतो की मनुष्यांनी साडेतीन हजार वर्षापूर्वी कोणत्या आचारसंहिताचे पालन केले असावे?

या तीन पैकी त्यांच्या निर्मितीच्या वेळचा मानव इतिहास उपलब्ध आहे. महम्मदसाहेब व जीझस. क्राईस्टने तर स्पष्ट रूपाने आपल्या चमत्कारांनी व आपल्या मताविरूध्द असणाऱ्याबाबत कटू व्यवहाराचे वर्णन केलेले आहे. म्हणून ही पुस्तके सृष्टीच्या आरंभीची नाहीत. यात प्राकृतिक नियमांच्या विरूध्द अनेक प्रकारे वर्णन केलेले आहे. ही पुस्तके वैज्ञानिक तर्क व प्रमाणाच्या कसोटीला खरी उतरत नाहीत. वर्ग व्देषाची प्रेरणा ठासून भरलेली आहे. ईश्वर आपल्या पुत्रांमध्ये व्देष पसरविण्याची आज्ञा कशी देईल ?

तद प्रामाण्यमनृत व्याघात पुनरुक्तदोषेभ्य: ।
(न्याय २-१-५८)

ज्या पुस्तकात हे तीन दोष असतील ते प्रमाण मानता येत नाहीत.

(१) ज्यात मिथ्या गोष्टींचा उल्लेख असतो.

(२) परस्पर विरोधी गोष्टी लिहिलेल्या असतात.

(३) पुनरुक्त असंबध्द गोष्टींचा समावेश असतो.

असे पुस्तक प्रामाणिक होऊ शकत नाही.

# वेदच ईश्वरीय ज्ञान का ?

वरील सर्व कसोटया वेदाविषयी खऱ्या उतरतात किंवा लागू पडतात 'बुध्दिपूर्वा वाक्यकृतिर्वेदे' (वै. ६-१-१) वेदातील वाक्यरचना बुध्दिपूर्वक केलेली आहे.

सर्व निष्पक्ष विव्दान मानतात की वेद विश्वाचा प्राचीन ग्रंथ आहे. सर्व धर्मांनी मानवतेची नैतिक मूल्ये याच वेदातून घेतलेली आहेत.

यात मानव इतिहास नाही. जसे रामायण, महाभारत, कुराण, बायबल इत्यादी मध्ये आहे. वेदामध्ये वर्तमान विज्ञानाचा मूळ स्त्रोत आहे. गणिताचाही मूळ स्त्रोत आहे हे पाश्चात्य लोक ही मानतात.

वेदातील विद्या (शिक्षण) सार्वदेशिक, सार्वकालिक मानवतावादी, प्रेरणादायक असून वर्ग जातिभेद, रागव्देष, अन्याय इत्यादींनी मुक्त असून मानव मात्रासाठी समान कल्याण करणारे आहे.

वेद विश्वबंधुत्व व विश्वराज्य व्यवस्थेची संकल्पना मांडतो. सर्व भारतीय प्राचीन ग्रंथात त्याला ईश्वरीय ज्ञान मानलेले आहे व अनेक परदेशी विव्दान जसे रेव. मारिश फिलिप, मॅक्समूलर, जेकोब, मेट्रो, मादाम ब्लावस्टिकी इत्यादीनी ही त्याला ईश्वरीय ज्ञान मानलेले आहे.

# वैदिक दर्शन व आधुनिक विज्ञान

आजचे विज्ञान हे स्वीकारते की -

(१) या संसाराचे मूलतत्त्व ऊर्जा आहे जे अचेतन (जड) आहे.

(२) मूळ तत्त्वांच्या वैशिष्ट्यांमध्ये परिवर्तन करता येत नाही. जर परिवर्तन होत असेल तर त्यांना मूळ तत्त्व मानता येत नाही.

(३) भौतिक विज्ञान केवळ त्याच तत्त्वांची सत्ता स्वीकारते ज्यांना डोळयांनी किंवा यंत्रांनी पाहता येते किंवा बुध्दीने स्वीकारता येते.

(४) अभावाने भाव निर्माण होत नाही.

आता सत्य शोधण्यासाठी भौतिक वैज्ञानिकांनी काही प्रश्नांची उकल केली पाहिजे.

**प्रश्न :** (१) भौतिक विज्ञान, यंत्रानी किंवा डोळ्यांनी न पाहता येणाऱ्या काही तत्त्वांचा स्वीकार करते, जे बुध्दीने जाणता येते. जसे ऊर्जा, पृथ्वीची गुरूत्वार्षणशक्ती

इत्यादी 'क्वाकर्स' नामक सूक्ष्म द्रव्य ही आतापर्यंत कोणत्याही यंत्राने (माध्यमाने) पाहू शकत नव्हते (नुकतेच विज्ञानाने क्वाकर्सलाही पाहिलेले आहे) तरीही विज्ञान त्यांची सत्ता स्वीकारते. त्याच प्रकारे वर फेकलेला दगड इत्यादी भारी पदार्थ पृथ्वीकडे आकर्षित होतात. या आकर्षणरूपी कार्याच्या आधारावर पृथ्वीमध्ये 'गुरूत्वाकर्षण' नामक एका शक्तीची सत्ता स्वीकारलेली आहे.

याच प्रकारे आपण सर्वजण विचार करतो. अनेक प्रकारच्या विद्या शिकून आपण विव्दान बनतो. तेव्हा येथे असा प्रश्न पडतो की या विद्या शिकणारे द्रव्य (तत्त्व) कोणते ? भौतिक विज्ञानानुसार तर मूलतत्त्वे ज्ञानरहित आहेत व मूलंतत्त्वाच्या वैशिष्टयामध्ये ही परिवर्ततन होऊ शकत नाही तेव्हा हे ही म्हणता येणार नाही की जड (ज्ञानरहित) मूलतत्त्वापासून विद्या शिकणाऱ्या चेतन (ज्ञानसहित) द्रव्याची उत्पत्ती झाली.

जेव्हा विद्या शिकणारे, विचार करणारे तत्त्व व्यवहारात मनुष्य इत्यादी. रूपात उपलब्ध आहे तेव्हा एका चेतन (ज्ञानवान) तत्त्वाला ही मूलतत्त्वाच्या रूपात अवश्य स्वीकारावे लागेल. जे विचारपूर्वक कार्य करते, मोटार, रेल्वे, घर इत्यादी बनविते व आपले प्रयोजन सिध्द करते.

ऊर्जा नामक मूलतत्त्वाव्दारे अशी क्षमता सिध्द होत नाही व वैज्ञानिकही ऊर्जामध्ये अशी क्षमता मानण्यास तयार नाहीत आपण या ऊजपिक्षा भिन्न चेतन मूलतत्त्वाला 'आत्मा' मानतो.

(२) याच प्रकारे ब्रह्मांडात आपण पाहतो सर्वत्र (परमाणू सौरमंडळ इत्यादीमध्ये) एक प्रकारची व्यवस्था दिसून येते. ब्रह्मांडाचे मूलतत्त्व ऊर्जा जड (ज्ञानरहित) आहे. ते स्वत: अशी व्यवस्था व नियम बनवू शकत नाही. हे नियम व व्यवस्था या साठी एखाद्या बुध्दिमान तत्त्वाचा स्वीकार करावा लागेल. जे ऊर्जा क्वाकर्स व इलेक्ट्रान इत्यादी द्रव्यांच्या परमाणूंना व रासायनिक द्रव्याच्या रूपाला व्यवस्थित करू शकेल. जर हे व्यवस्थापन व कार्य ज्ञानवान (माणूस) आत्म्याने केलेले आहे. असा विचार केल्यास तेही योग्य वाटत नाही कारण कोणत्याही मनुष्याचे असे सामर्थ्य दिसून येते नाही जे प्रचंड आकाशगंगापर्यंत पसरलेल्या विशाल ब्रह्मांडाची व्यवस्था करू शकेल. परिणाम स्वरूप आपल्याला एका अशा चेतन (ज्ञानवान) मूल तत्त्वाची सत्ता मानली पाहिजे जी संपूर्ण ब्रह्मांडाची

रचना व व्यवस्था करू शकेल. अशा शक्तिशाली मूलतत्त्वाला आपण 'ईश्वर' म्हणतो त्याची सत्ता स्वीकारल्याखेरीज सृष्टीच्या रचनेचा प्रश्न उलगडणार नाही.

कोणताही जड पदार्थ ज्ञानपूर्वक स्वत: गतिशील बनून एखादे कार्य किंवा पदार्थरूपाने उपस्थित होऊ शकत नाही. जसे वृक्षापासून लाकडाचे तुकडे स्वत: आपणहून कापले जाऊन योजनापूर्वक जोडले जाऊन टेबलखुर्चीच्या रूपात येऊ शकत नाहीत. त्यांना टेबलखुर्चीच्या स्वरूपात आणण्यासाठी चेतन कर्त्याची आवश्यकता असते ठीक याच प्रकारे या ब्रह्मांडाची मूलतत्त्वे, ऊर्जा व क्वाकर्स इत्यादी ज्ञानशून्य असल्यामुळे स्वत:बुध्दिपूर्वक इलेक्ट्रान, प्रोटान इत्यादी रूपाने एकत्र येऊ शकत नाहीत. त्यांना या स्थितीत आणण्यासाठीही चेतन कर्त्याची, एका ज्ञानवान तत्त्वाची आवश्यकता असते. ते ही एक मूलतत्त्वच असेल कारण त्याची वैशिष्ट्ये ऊर्जा व आत्मा यांच्यापेक्षा भिन्न आहेत.

त्याच मूलतत्त्वाला आपण ईश्वर म्हणतो. जर ईश्वराच्या सत्तेला न मानले तर असा प्रश्न निर्माण होतो की ऊर्जे पासून क्वार्क्स व इलेक्ट्रान, प्रोटान इत्यादी पदार्थ कुणी बनविले? सर्व वैज्ञानिक हे मानतात की सृष्टीची रचना बुध्दिपूर्वक आहे व ऊर्जा इत्यादी मूलतत्त्वे बुध्दीने शून्य (ज्ञानरहित) आहेत.

## विश्वाच्या समस्यांचे समाधान

विश्वाच्या समस्या सोडविण्यासाठी आपल्याला विश्वाच्या संपूर्ण तत्त्वाचे अध्ययन केले पाहिजे. विश्वाचे संपूर्ण तत्त्व वरील विवेचनानुसार तीनच आहेत हे सिध्द होते या तिन्हीचे विस्तृत विवरण वेद व वैदिक साहित्यामध्ये (भारतीय वैदिक दर्शन व उपनिषद इत्यादी) उपलब्ध होते. या तीन तत्त्वांचे नाव ईश्वर, जीव, प्रकृती आहे.

वैज्ञानिक लोक भौतिक विज्ञानात केंवळ 'प्रकृती' नावाच्या एकाच मूलतत्त्वाचे अध्ययन करतात. अशा स्थितीत जीवनाच्या सर्व समस्यांचे समाधान होणार नाही.

माणसाची स्वाभाविक इच्छा अशी असते की दु:खापासून पूर्णपणे सुटून शाश्वत व पूर्णसुख प्राप्त करावे. ती पूर्तता करण्यासाठी 'ईश्वर व आत्मा' यांच्यासंबंधी जाणणे आवश्यक आहे. भौतिक वैज्ञानिक ही दोन तत्त्वे जाणण्यासाठी भारतीय वैदिक साहित्याचे अध्ययन करण्याचा सल्ला (परामर्श) देतील काय ? असे करण्याने मानवतेवर खूप मोठा उपकार होईल.

 

## ब्रह्मविद्या व भौतिक विज्ञान

तीन प्रश्न अनादी आहेत (१) मी कोण आहे ? (२) हे जग म्हणजे काय ? (३) याचा कर्ता, संचालक ईश्वर म्हणजे काय ?

लक्षपूर्वक विचार करा आपण कोण आहोत ? काय आहोत ? आपले उद्दिष्ट काय आहे ? या उद्दिष्टाला पूर्ण करण्याचे साधन काय आहे ? आपल्याला मनुष्य शरीर देणारा, या संपूर्ण विश्वाला बनविणारा, संचालक, व्यवस्थापक कोण आहे? कसा आहे व काय इच्छिता ?

भौतिक विज्ञानाने जीवनाच्या सुविधा प्राप्त झालेल्या आहेत पण शुध्द स्वरूपांत सुख मिळाले नाही. या क्षेत्रात लाखो लोक पूर्ण शक्तीने प्रयत्न करीत आहेत परंतु ही ब्रह्मविद्या समाधीचे विज्ञान त्यांच्याजवळ नसल्यामुळे ते असफल आहेत. ब्रह्मविद्या काल्पनिक नाही. दर्शन शास्त्राने विनाकारण ब्रह्मविद्येला मानलेले नाही. ही असाधारण विद्या आहे. ऋषींनी अनुभवलेली आहे. पुत्रैषणा, लोकैषणा, वित्तैषणा यांनी ग्रस्त सामान्य माणूस व वैज्ञानिकांना ही अप्राप्य आहे.

वैज्ञानिक म्हणतात की आम्ही सत्याचा शोध घेतो. माणसे एकतर लौकिक सुख नाही तर आध्यात्मिक सुख दोन्हीमधून एखाद्याची कामना बाळगतात. वैज्ञानिक आध्यात्मिक सुख जाणत नाहीत. तेव्हा अर्थापत्तीने हे सिध्द होते की ते तीन एषणाची इच्छा बाळगून लौकिक सुखाच्या कामनेसाठी सत्याचा शोध घेणे हेच उद्दिष्ट ठेवतात या एषणांची (इच्छा) तृप्ती हेच त्यांचे उद्दिष्ट असते. आज भौतिक विज्ञान उग्र रूपाने प्रकट होत आहे. योगविज्ञान विस्मृतीमध्ये गेलेले आहे म्हणूनच परमेश्वराचा साक्षात्कार करणारे या भूगोलावर दोन चारच असू शकतील. जर मोठा समुदाय काही चुकीचे करीत असेल तर लोक त्यालाच चांगले मानू लागतात. आजकाल नाडी बंद करणे, आठ दिवस भूमीत गाढून घेणे, मूर्छित होणे (काही न समजणे) डोळे दाबल्याने प्रकाश दिसणे, कान दाबल्याने शब्द ब्रह्म ऐकणे इत्यादीनाच योग व योगसिध्दी मानत आहेत. परंतु हा योग नाही. हा चुकीचा योग पाहून ऐकून आधुनिक वैज्ञानिक योगाला सत्यविज्ञान समजत नाहीत.

## योगवाद व भोगवाद

या आर्यावर्त्त देशात लाखो ऋषी झालेले आहेत त्या सर्वांनी वेदालाच प्रमुख ग्रंथ मानलेले आहे. वेदामध्ये असा उपदेश (ज्ञान विज्ञान) भरलेला आहे की त्याव्दारे मानव

जीवन सफल होते.

भौतिक विज्ञानही महत्त्वपूर्ण आहे परंतु केवळ भौतिक विज्ञानाच्या मार्गाने चालल्यास व वैदिक विज्ञानाचा विचार न केल्यास मानव जीवन सफल होऊ शकत नाही. वेद असा ग्रंथ आहे की ज्यामुळे व्यक्ती आपले पराकोटीचे लक्ष्य (मुक्तिसुख) प्राप्त करते. आज मानवाने भौतिक उन्नती खूप केलेली आहे. परंतु परिणाम समोर आहे. गरजा जस जशा वाढत गेलेल्या आहेत, धनसंपत्तीच्या साधनात तसतशी वृध्दी झालेली आहे व दु:खही वाढत गेलेले आहे. यात जे दोष आहेत ते मानव जाणत नाही.

केवळ भौतिक उन्नतीने मानव जातीला आक्रान्त केलेले आहे, दाबून टाकलेले आहे. समाधीमध्ये हे कळू शकते की भौतिक विद्येत जे सुख आहे त्याच्या पेक्षा कितीतरी पटीने ईश्वरप्राप्तीत सुख आहे.

प्रचलित संप्रदायांजवळ ईश्वराचे खरे रूप नसल्यामुळे त्यांनी लोकांना ईश्वराबाबत अंधविश्वासू व योगवादापासून दूर केलेले आहे. इच्छेनुसार भिन्न भिन्न प्रकारे पूजा करण्याने ही सफलता प्राप्त होते ही चुकीची मान्यता आहे. कुणी सरळ तर कुणी फिरून ईश्वराजवळ पोचतो हे ही चूक आहे. आर्यवन रोजडला पोचण्यासाठी कुणी दिल्लीकडे, कुणी मुंबई किंवा चंदीगडकडे चालत गेल्यास रोजडला पोचू शकतो काय ? ईश्वराचे अस्तित्त्व मान्य करून ही कुणी सातवे आकाश, कुणी चौथे आकाश, कुणी क्षीरसागर, कुणी वैकुंठ, कुणी परमधाम इत्यादी त्याचे राहण्यांचे ठिकाण मानतात या प्रकारे ईश्वराचा शोध घेतल्यास ईश्वर प्राप्त होईल काय ? जर ईश्वराचे खरे स्वरूप कळले नाही तर कोणत्याही मार्गाने ते सर्वांना कसे प्राप्त होऊ शकेल ?

'ईशावास्यमिदं सर्वम्' ईश्वर सर्वव्यापक आहे. पण अज्ञानामुळे माणसाचे मन

इतस्तव : भटकते पण जेव्हा हे कळते की ईश्वर सर्वव्यापक आहे तेव्हा त्याचे मन ईश्वरात स्थिर होते हा व्याप्य व्यापकाचा संबंध योगाभ्यासात उपयुक्त ठरतो.

आज सर्व लोक नित्यानंदापासून दूर व क्षणिक सुखासाठी खूप कष्ट करीत आहेत. लौकिक भोगांना भोगणे हेच अंतिम ध्येय बनलेले आहे. सृष्टीच्या आरंभापासून कोणत्याही वैदिक ऋषीने या लौकिक सुखाला अंतिम ध्येय मानलेले नाही. ईश्वरीय आनंद प्राप्त करणे हेच मुख्य ध्येय मानलेले आहे.

केवळ भोगवाद किंवा भौतिकवाद हा आज अध्यात्मवादावर मात करीत आहे त्याच्याशी संघर्ष करणे किंवा हटविणे अतिशय कठीण झालेले आहे. आत्मा किंवा

परमात्मा नावाच्या कोणत्याही वस्तू नाहीत अशी त्यांची मान्यता आहे. पृथ्वी, जल, वायू, अग्नी इत्यादींचा विकास होऊन प्राणी वगैरे चेतन पदार्थ बनलेले आहेत असे त्यांचे मत आहे. लाखो करोडो जड (अचेतन) वस्तू मिळून ही एकचेतन वस्तू कधी बनू शकते काय ? किंवा अनेक आत्मे एकत्र येऊन प्रकृतीचा एक अणू तरी बनवू शकतील काय ?

शुध्द व सफल मानव जीवन योगानेच निर्माण होते. हे मानवी शरीर योगाच्या माध्यमाने ऋषींनी जाणले व आपल्या ग्रंथात लेखबध्द केले. आज मानवजाती अत्यंत निकृष्ट स्तरावर पोचलेली आहे. निकृष्टाला उत्कृष्ट समजण्याइतपत परिभाषा बदललेली आहे.

योगाची भोगवादाशी टक्कर आहे. एक पृष्ठभागावर येईल तर दुसरा रसातळाला जाईल. योगवादी मानतो की भोग पाच इंद्रियांचा विषय असून या दुःखदायक विषयांपूसन मुक्ती प्राप्त करण्यासाठी ईश्वर, जीव, प्रकृतीचा सबंध जाणून योगाव्दारे मुक्ती प्राप्त केली पाहिजे. भोगवादाचा हा सिध्दांत आहे की आत्मा, परमात्मा, पाप, पुण्य, धर्म इत्यादी सर्व कल्पना आहेत मनाला वाटेल ते करावे व जे पटणार नाही ते करू नये. बाष्कळ बडबड करणाऱ्या भोगवाद्यांचा प्रभाव आध्यात्मिकतेची कास धरणाऱ्यांवर ही पडत आहे. ते ही धनसंपत्तीला सर्वात मोठी वस्तू मानत आहेत.

जे लोक अज्ञानी व स्वार्थी असतात ते आपल्या आत्म्याविरूध्द कर्म करतात त्यांची अवस्था या जन्मातही दुःखदायक व पुढच्या जन्मीही दुःखदायक असते. 'असूर्या नाम ते लोका अन्धेन' ते लोक या जन्मी व पुढच्या जन्मी ही असुर, पिशाच्च, पापी म्हणविले जातात कारण ते आपल्या प्राण पोषणामध्येच असतात. जीवात्मा मनुष्य शरीर प्राप्त करून जेव्हा अत्यंत स्वार्थी बनतो व दुसऱ्याची उपेक्षा करतो तितका तितका तो दुःखी होतो. दुसऱ्याची हानी करूनही आपले भले करू इच्छितो. आज पंतप्रधानाच्या पदावरील व्यक्तीही भ्रष्टाचार करते त्याचे कारण भोगवादी संस्कृती होय. हे ईश्वरी आज्ञेचे अनुकरण न करता धर्माच्या विरूद्ध वागणे होय. ईश्वाराच्या आदेशाचे पालन न करणारा कधी सुखी राहू शकत नाही. आज बहुसंख्य लोक खोटया भोगवादी सिध्दांताला मानून संशयास्पद स्थितीत आहेत वरपासून खालीपर्यंत न्याय मिळत नाही.

कार, विमान, नौकर चाकर बाळगणारे सुखी असून ज्यांच्याजवळ ही साधने नाहीत ते महादुःखी भयंकर नरकात आहेत हा विचार योग्य नाही. घर, चपला, कपडे

 

यात सुख नाही. सुख मनाने पाहा. जे लोक आत्मज्ञानाच्या विरूध्द आचरण करतात ते आत्महनन करणारे महादु:ख घोर नरक भोगतात. दुरात्मा भोगवादी 'मनस्यन्यत्, वचस्यन्यत्, कर्मण्यन्यत्' असतात तर अध्यात्मवादी 'मनस्येकं, वचस्येकं, कर्मण्येकं' असतात. आपण स्वार्थाला ठोकर मारून प्राणीमात्राचे कल्याण करावे.

## ईश्वरवाद्यांवर भोगवादाचा प्रभाव

ईश्वरवादीही आज भोगवादामुळे प्रभावित आहेत जगाला रोचकता हवी, सत्याचरण नको म्हणून ते ढोंगामध्ये फसतात आजचे बहुतेक ईश्वरवादी भौतिक साधनांच्या स्वैर वापराने तीर्थस्थानी द्रव्य खर्चून भव्यतेचे प्रदर्शन करून जनमानसाला आकर्षित व प्रभावित करण्याच्या तीव्र स्पर्धेत उतरलेले आहेत. त्यांनी आपली कार्यपध्दती व वर्तणूक जवळ जवळ भोगवाद्याप्रमाणे स्वीकारलली आहे. विटावर विटा व दगडावर दगड ठेऊन प्रभूच्या गृहनिर्माणाच्या प्रतिस्पर्धेमध्ये गुंतलेले आहेत. 'ईशावास्यमिदं सर्वम्' ला विसरून मानव निर्माणाच्या कार्यापासून अत्यंत विमुख होऊन मानव समाजाला त्यांनी सर्वनाशाच्या गर्तेत लोटले आहे. माता पिता भौतिक विद्या शिकविण्यासाठी संपूर्ण शक्ती खर्च करतात परंतु मुलांना आत्मा, परमात्मा, प्रकृतीच्या संदर्भात धर्म, परोपकार, सत्यभाषण इत्यादी बाबत काहीही सांगत नाहीत. सर्व मुले डॉक्टर, इंजिनियर बनू इच्छितात कारण धन प्राप्त होईल. धन प्राप्त करावेच पण त्याबरोबरच मानव निर्माण ही करावे त्यात नुकसान कोणते ? जन्म घेणे, भोग भोगणे, रोगी होऊन मरणे हेच जीवनाचे लक्ष्य आहे काय ?

भोगवाद योगवादाला सूक्ष्मरूपाने कसा प्रभावित करतो. ही गोष्ट विशेष शिकलेला भौतिकवादी ही जाणू शकत नाही. भौतिकवादी या जगातील सर्व वस्तूंचे स्वामी आपण आहोत असे समजतात. याचा प्रभाव आध्यात्मिक व्यक्तींवरही सूक्ष्मरूपाने पडतो भोगवादी गाय, घोडे, पशू, पक्षी सर्वांना मारून खावे असा नियम बनवितात. हा मूळ दोष कुठून आला ? ईश्वराला स्वामी न मानल्यामुळेच माणूस संपूर्ण जगाचा मालक स्वत:च बनू इच्छितो. ही लढाई व भांडणे यामुळेच होतात. जो स्वत:ला मालक समजतो तो एक बाजरीचा दाणा किंवा एखादा केस तरी उत्पन्न करू शकतो काय ? हे शरीर व ही इंद्रिये हटविली तर हा जीवात्मा हे ही जाणू शकत नाही की मी कुठे पडलो आहे ? धरतीवर पडलेला जीवात्मा स्वत:च्या शक्तीने एक इंच ही सरकू शकत नाही. जर एकटया जीवात्म्याची शक्ती काहीच नाही तर तो या संसाराचा मालक कसा ? आस्तिक म्हणतात की सर्व काही परमेश्वराचे आहे. चुकीच्या पध्दतीने

ईश्वराला मानणारे ही नास्तिकासारखेच आहेत. धन स्वतःचे समजतात व खोटे म्हणतात 'तुझे तुला अर्पण' धन ईश्वराला अर्पण करावयाचे आहे असे म्हणून सर्वांना लुटतात जेव्हा जीवात्मा हे शरीर व या इंद्रियांना ईश्वर प्रदत्त मानत नाही तेव्हा तो भोगवाद ठरतो. आपण धनवान, विव्दान बलवान, चक्रवर्ती राजा ही बनावे परंतु ईश्वराचे व ईश्वर प्रदत्त सर्व काही आहे असे मानण्यात कोणतेच नुकसान नाही.

ईश्वराची महत्ता अनुभवावी म्हणजे ईश्वराची सहायता नेहमी मिळवावी. या भोगवादाने, केवळ भौतिकवादाने ईश्वराला गाडून टाकलेले आहे. भोगवादी असा स्वार्थी कृपण बनतो की संपूर्ण स्वतःच खाऊ, भोगू इच्छितो. त्याला वाटते की भोगाने संतुष्टी होईल. खावे, प्यावे विषयभोगांनी तृप्त व्हावे असे त्यांचे मत असते. हे मायावादी नुकसान होण्याची वेळ आली की मुंबईसारख्या नगरात कोणी फाशी घेऊन, कोणी घरावरून उडया मारून आत्महत्या करतात. ऋषींच्या मान्यतेविरूध्द रजनीशचा जो सिध्दान्त होता तो केवळ भोग भोगण्यासाठी होता. भोगवाद्यासमोर कोणताही धर्म, कोणतेही कर्म नसते.

संपूर्ण विश्वातल्या वस्तू एका व्यक्तीला मिळाल्या तरी त्याची तृप्ती होणार नाही. मग जगातील ५ अर्व व्यक्तींच्या भोगांची पूर्तता कशी होईल?

भोगवाद्यांची बुध्दी पक्षपाती असते. अध्यात्मवादी न्यायप्रिय असतो. भोगवादी कितीही न्यायप्रिय असला तरी पक्षपातरहित व परोपकारी नसून स्वार्थी असतो. योगवादी ईश्वराच्या सान्निधाने आपले सर्वस्व देऊनही इतरांचे भले इच्छितो.

## मानवी जीवनात दोन प्रवृत्ती

मानवी जीवनाचा प्रवाह दोन प्रवृत्तीमध्ये वाहात असतो. भोगवाद किंवा योगवाद. मानवजात भोगवादात आकंठ बुडालेली आहे. हजारो लोक पतंगाप्रमाणे विषयाग्नीमध्ये जळून जात आहेत.

वेदाप्रमाणे योगवादाची ही परिभाषा नव्हे की धन प्राप्त करू नये किंवा सुखसमृध्दीत वाढ करू नये परंतु सर्व भूतात्म्याच्या कल्याणासाठीही त्यागभावनेने ते उपयोगात आणावे. प्रकृतीच्या उपासनेत वैज्ञानिक आकंठ बुडालेले आहेत व सामान्य लोक नाच गाणे, खाणे पिणे, तमाशे यात मग्न आहेत. जीवात्मा ईश्वराची किंवा विकृतीची (प्रकृतीची) उपासना सतत करतो. वेद म्हणतो 'सम्भूतीचा(प्रकृतीचा) प्रयोग करून अमृत पान कर' धन प्राप्त करावे पण धर्माने प्राप्त करावे. कोणत्याही

 

प्रकारे धन प्राप्त व्हावे हा भोगवाद आहे. "रोटी कपडा और मकान माँग रहा है हिन्दुस्थान" मानव केवळ पशूच होऊन जगत आहे काय ? "पहले पेटपूजा फिर काम दूजा" हाच घोष सर्वत्र निनादत आहे. महाराजा अश्वपतीचा ह्या देशात कधी काळी गौरवाने असा उद्घोष होता की, "माझ्या राज्यात कोणी कृपण नाही, अग्निहोत्र न करणारा नाही, कोणी पुरुष व्यभिचारी नाही तर स्त्रीची काय कथा?" असा होता योगवादाचा काळ. आज परिस्थिती याच्या विपरीत आहे. भौतिक वाद्यांनी ही सर्व अव्यवस्था निर्माण केलेली आहे. कार्ल मार्क्सचा रशिया नष्ट झाला, अमेरिकाही केवळ भौतिकवादावरच जगत राहिली तर अध्यात्माशिवाय मानव जातीच्या नाशास कारणीभूत होईल. योगवाद हा धर्म, अर्थ, काम, मोक्षप्राप्तीचा मार्ग आहे. पण भौतिकवादात भोगच सर्व काही आहे. वाट्टेल त्या मार्गानि धन मिळविण्याचा अट्टाहास आहे.

ईश्वराला विपरीत मानणारे संप्रदायवादी परस्पर दररोज झगडतात. केवळ चेतनवाद किंवा केवळ जडवाद दोन्ही निष्फळ आहेत. जड चेतन यांच्याशिवाय व्यवहार चालत नाहीत.

ईश्वराला न मानणे हानिकारक आहे तर चुकीचे मानणेही हानिकारकच आहे. काहीनी जड प्रकृतीला तर काहीनी चेतन आत्म्याला मानले पण ईश्वराला बाहेर ठेवले जसे जैन मतावलंबी. कोणतीही व्यक्ती सत्य वैदिक त्रैतवादाला मानल्याखेरीज सफल होऊ शकत नाही.

वर्तमानकाळातील दोन विश्वयुध्दे व प्राचीन महाभारताचे युध्द हा भौतिकवादाचा परिणामच होय. मतभेद व स्वार्थ असल्यामुळे आपण एक होऊ शकत नाही. आज खालच्या थरापासून वरपर्यंत एखादीही व्यक्ती नसेल जी देशाचे शोषण करीत नाही. मग देश, भाषा, जाती यांचा नाश झाला तरी चालेल. ईश्वराची आज्ञा नियम न मानणाऱ्या भौतिकवाद्यांना चैन पडत नाही. ते महादु:खी असतात.

**मानव निर्माण :** योगविद्येनेच वास्तविक रूपात मानव निर्मिती होते. याशिवाय कोणताही माणूस शुध्द, पवित्र, न्यायकारी, पक्षपातरहित होऊ शकत नाही. भौतिक ज्ञान विज्ञान व उपभोगाच्या साधनात वाढ झालेली आहे. परंतु समाजात सुख व शांती निर्माण झालेली नाही याचे कारण शिक्षण पध्दतीमध्ये दोष आहे. ज्ञान, कर्म, उपासना यांचे शुध्द व अशुध्द होणे क्रमश: मानवनिर्माण व विनाशाचे कारण आहे. आजचे सुशिक्षित लोक आपल्याला महान समजतात व विद्वान ऋषींना जाणत, मानत नाहीत. परकीयांनी लिहिलेली चरित्रे व इतिहास शिकविला जातो. त्यामुळे ऋषींच्या आचरणाचा आदर्श

नष्ट होत आहे. भौतिकवादी वाममार्गानि वाईट आचरण करून भ्रष्ट होत आहेत. जरी आत्म्याचा विनाश होत नसला तरीही विनाश हे महाक्लेशाचे नाव आहे. त्यामुळे मानव समाज रसातळाला जात आहे. ज्या ठिकाणी धार्मिक व विव्दान चिकित्सक प्राणांचा दाता असतो त्या ठिकाणी अधार्मिक चिकित्सक धन व प्राण हरण करतो. शरीराबरोबरच ज्याचा आत्मा, मन इंद्रिये ही प्रसन्न राहतात तो स्वस्थ असतो व ज्याचे आचरण मिथ्या असते आत्मा व मन अशुध्द असते तो अस्वस्थ असतो. आधुनिक विद्येबरोबर आत्मा, ईश्वर, धर्माला जोडल्यास सफलता प्राप्त होईल अन्यथा नाही.

मानव जीवनाच्या मुख्य प्रयोजनाची सिध्दी योगवांदाने होते, भोगवादाने नव्हे. वेदानुसार मानवी जीवनाचे मुख्य प्रयोजन दुःख व दुःखाच्या कारणापासून मुक्त होणे व सुख आणि सुखाचे कारण (उपाय) उपलब्ध करणे हे होय. या चारहीचे नाव प्रयोजन आहे. जे कार्य समोर ठेवून त्यात प्रवृत्त होता येते तेच मानवी जीवनाचे लक्ष्य असते.

वैज्ञानिक दुःख व दुःखाचे कारण सुख व सुखाचे कारण शोधत आहेत त्यामुळे असे वाटते की जगाची खूप उन्नती होत आहे. परंतु वास्तविकता ही आहे की विश्वाचे भयंकर पतन होत आहे. आज मानव अत्यंत भयभीत, अशांत आहे. निर्दोष व्यक्तींना लोक नष्ट भ्रष्ट करून टाकतात. त्यांना कोणी विचारणार नाही जे काम केल्याने सुख मिळत नाही व दुःख दूर होत नाही ती उन्नती नसून पतन आहे हा भोगवादाचा परिणाम आहे.

भोगवादी असा विचार करतात की जितकी धनसंपत्ती अधिक तितके सुख अधिक मिळेल. परंतु भोग मानवी जीवनाचे लक्ष्य नाही. कारण भोग भोगल्याने संपूर्ण दुःखाची निवृत्ती होत नाही. योगाव्दारे ईश्वरप्राप्ती मानल्याखेरीज, जाणल्याखेरीज दुःख व दुःखाची कारणे नाहीशी होत नाहीत.

सुख हा गुण दोन द्रव्यांचा आहे. एक ईश्वराचा व एक प्रकृतीचा. पण दोन्हींमध्ये अंतर आहे. प्रकृतीचे सुख दुःखमिश्रित व क्षणिक आहे. प्रकृतीच्या सुखात चार प्रकारचे दुःख आहे. परिणाम, ताप, संस्कार व गुणवृत्तिविरोध दुःख तर ईश्वराच्या आनंदात चार दुःखांची उत्पत्ती, विनाश, ऱ्हास, वृध्दी कधी होत नाही.

 

# ऋषींचा संदेश

(१) विषयांना भोगून इंद्रियांची तृष्णा समाप्त करणारा तुमचा विचार असा आहे की जसे आग विझविण्यासाठी त्यात तूप ओतणे.

(२) तुमचे सर्वात मोठे अज्ञान हे की "मी कधी मरणार नाही" "हे शरीर फार पवित्र आहे" विषय भोगात पूर्ण शाश्वत सुख आहे "हा देहच आत्मा आहे"

(३) तुमच्या मनात चांगले किंवा वाईट विचार आपणाहून येत नसतात. या विचारांना तुम्ही आपल्या इच्छेने उत्पन्न करता कारण मन तर यंत्राप्रमाणे जड वस्तू आहे त्याचा चालक आत्मा आहे.

(४) एखाद्याला चांगल्या किंवा वाईट कर्माचे फळ तात्काळ प्राप्त न होताना पाहून तुम्ही असा विचार करू नका की या कर्माचे फळ पुढे मिळणार नाही. कर्मफळापासून कोणीही बचाव करून घेऊ शकत नाही कारण ईश्वर सर्वव्यापक, सर्वज्ञ, न्यायी आहे.

(५) संसार (प्रकृती) संसार भोगणारा (जीव) व संसार बनविणारा (ईश्वर) यांच्या वास्तविक स्वरूपाला जाणूनच तुमचे सगळे दुःख, भय, चिंता समाप्त होऊ शकतात दुसरा कोणताही उपाय नाही.

(६) "मनुष्य जीवन ईश्वरप्राप्तीसाठी मिळालेआहे" हे मुख्य लक्ष्य सोडून इतर कोणत्याही कार्याला प्राथमिकता देऊ नका. अन्यथा तुमचे जीवन चंदनाच्या लाकडाला जाळून कोळसे बनवून नष्ट केल्यासारखे आहे.

७) तुमच्या जीवनाची सफलता काम, क्रोध, लोभ, मोह, अहंकार इत्यादी अविद्येचे कुसंस्कार नष्ट करण्यातच आहे. हाच संपूर्ण दुःखापासून सुटण्याचा श्रेष्ठ मार्ग आहे.

८) जोपर्यंत तुम्ही संसारातील सुखाच्या मागे लपलेल्या दुःखांना समजणार नाही तोपर्यंत वैराग्य उत्पन्न होणार नाही. वैराग्याशिवाय चंचल मन एकाग्र होणार नाही. एकाग्रतेखेरीज समाधी लागणार नाही. समाधीशिवाय ईश्वराचे दर्शन होणार नाही व ईश्वराच्या दर्शनाखेरीज अज्ञानाचा नाश होणार नाही व अज्ञानाचा नाश झाल्याखेरीज दुःख समाप्त होणार नाही तसेच पूर्ण व शाश्वत सुख (मुक्ती) मिळणार नाही.

९) तुम्ही हे सत्य जाणा की अज्ञानी माणूसच जड वस्तू (भूमी, सुवर्ण, चांदी इ.) व चेतन वस्तू (पती, पत्नी, पुत्र, मित्र इत्यादी) आपल्या आत्म्याचा एक भाग

मानून त्यांची वृद्धी होण्याने प्रसन्न व हानी होण्याने दुःखी होतो.

१०) तुमच्या लोहरूपी मनाला विषयभोगरुपी चुंबक सदैव आपल्याकडे आकर्षित करतो. ज्ञानी मनुष्य विषयभोगांनी होणाऱ्या हानीचे अनुमान करुन त्यात आसक्त होत नाही. परंतु अज्ञानी माणसे यातच ग्रस्त होऊन नष्ट होतात.

११) महान ज्ञान, बल, आनंद इत्यादी गुणांचे भांडार, ईश्वर एक चेतन वस्तू आहे जी अनादीकाळापासून तुमच्याबरोबर आहे ती तुमच्यापासून पृथक झालेली नाही किंवा होणार नाही त्याच सृष्टिकर्त्याची, पालन कर्त्याची, सर्वांचे रक्षण कर्त्या निराकाराची स्तुती, प्रार्थना, उपासना तुम्ही सर्वांनी केली पाहिजे.

## प्रमाणाद्वारे परीक्षण

प्रमाणांच्या परीक्षणाद्वारे योग प्रमाणित होतो. प्रमाणाच्या कसोटीवर घासून जे सत्य जाणत नाहीत ते योगविद्या शिकू शकत नाहीत. ध्यान योगाच्या नावाने प्रमाणाशिवाय विचार न करता अंध परंपरेने काही गोष्टी सुरू झालेल्या आहेत. वेद, दर्शन,संवाद इत्यादीद्वारे सत्यासत्याचा निर्णय न करता काही गोष्टी मान्य केलेल्या आढळून येतात. परंतु ती परंपरा सत्य नाही. जे प्रमाणांनी सिद्ध होईल तेच सत्य मानले जाईल.

प्रमाणांनीच ईश्वर व आत्म्याची सिद्धी होते म्हणून त्यांचे अस्तित्व आहे की मी मानतो म्हणून आहे? सामान्य माणसे आपल्या बुद्धीला प्रमुख मानून चालतात. कुठे अडथळा आल्यास स्वतःचा अनुभव श्रेष्ठ समजून एखादी गोष्ट सिद्ध करण्याची टाळाटाळ करतात. अनुभव चुकीचा, भ्रम निर्माण करणाराही असू शकतो. म्हणून जे प्रमाणांनी सिद्ध होते ते सत्य असते. केवळ मी मानतो म्हणून ते सत्य नसते. ते चुकीचे किंवा विपरीत असू शकते कधीकधी योग्य ही असू शकते. कसोटीवर घासून जर योग्य वाटेल तरच ती गोष्ट मानता येते.

## प्रत्यक्ष प्रमाण

**इन्द्रियार्थसन्निकर्ष** :(न्यायदर्शन) इंद्रियांचा विषयांशी संपर्क होऊन जे प्राप्त होते ते ज्ञान. ते पाच प्रकारचे असते :

१) **अव्यपदेश** : जे ज्ञान दुसऱ्याकडून शब्दमाध्यमाद्वारे प्राप्त होते.

२) **अव्यभिचारी** : जे तिन्ही काळी परीक्षण केल्याने सिद्ध होऊन सत्य ठरते, खोटे ठरत नाही.

 

**३) व्यवसायात्मक :** निश्चयात्मक, संशयरहित असेल तरच ते प्रत्यक्ष प्रमाणांनी सिद्ध होते.

प्रत्यक्ष ज्ञान केवळ वर्तमानकाळच दाखविते. अनुमान प्रमाण तिन्ही काळाच्या वस्तू दर्शविते. केवळ प्रत्यक्ष मानण्याने काहीही निष्पन्न होत नाही.

## अनुमान प्रमाणाचा प्रयोग पंचावयवाने

१) प्रतिज्ञा : शरीर अनित्य आहे
२) हेतू : कारण उत्पन्न होते
३) उदाहरण : जे उत्पन्न होते ते नष्ट होते जसा घट व कपडा
४) उपनय : जसा घट व कपडा तसे शरीर जसेच्या तसे
५) निगमन : उत्पन्न होण्यामुळे शरीर अनित्य आहे

नास्तिक ईश्वराला मानत नाहीत ते म्हणतात, भेसळ करणारे, खोटे बोलणारे मजेत असतात मग ईश्वर त्यांना रोखत का नाही? याचे समाधानकारक उत्तर असे की जीव कर्म करण्यास स्वतंत्र आहे. ईश्वराकडून त्याला अन्त:प्रेरणा मिळते पण प्रत्यक्ष कर्म करताना तो रोखत नाही, त्याला कर्मांचे फळ मात्र देतो.

## शब्द प्रमाण

वेद हे ईश्वरकृत मानले जातात व ब्रह्मा, गौतम, कणाद, कपिल इत्यादी ऋषींपासून दयानंदापर्यंत आप्त पुरुषांची जी वचने आहेत ती शब्द प्रमाणाच्या प्रकारात मोडतात. कोणत्याही विद्वानाने एखादे विधान केल्यास त्याला शब्द प्रमाणाने सिद्ध करुन निर्णय घ्यावा जसे ब्रह्मकुमारीद्वारे ईश्वराला परमधाममध्ये मानणे हे शब्द प्रमाणाच्या विरुद्ध आहे म्हणून ते मानू नये. ईश्वर आहे किंवा नाही याचा संशय आल्यास शब्दप्रमाणाने निर्णय घ्यावा अशी जर शंका असेल की आपल्या मनाचे मानावे की शब्दप्रमाणाचे? त्यावेळी आपले मत सोडून द्यावे व शब्दप्रमाण खरे मानावे. स्वतःच्या मान्यतेला स्वतःच विरोध करावा लागतो.

एक व्यक्ती चार आण्याची चोरी करते पण जेव्हा सात्त्विक ज्ञान उत्पन्न होते तेव्हा तीच व्यक्ती लाख रुपये दान देते. ज्ञानाचा स्तर चढता उतरता असतो म्हणून आपल्या अनुभव प्रमाणाचा आग्रह सोडून शब्द (वेद) प्रमाणाचाच स्वीकार करावा. अज्ञानी व्यक्ती भयभीत, कट्टर, हट्टी, दुराग्रही, आक्रमक असतात. ज्ञानी व्यक्ती निर्भय, विवेकी, सहनशील असतात.

 

ईश्वराची सर्वव्यापकता व त्याचे स्वरुप सांगतांना वेद म्हणतो :

तदेजति तन्नेजति तद्दूरे तद्वन्तिके ।
तदन्तरस्य सर्वस्य तदु सर्वस्यास्य बाह्यतः ॥ (यजु.४०/५)

परमेश्वर यथायोग्यरीत्या जगाला त्याच्या गतीने चालवीत आहे. म्हणून अविद्वान लोक समजतात की तो ही चलायमान असेल. परंतु सर्वत्र व्याप्त असल्यामुळे तो कधी चलायमान होत नाही 'तन्नेजति' परमात्मा कधी चलायमान होत नाही. सर्वत्र एक रस निश्चल व व्यापक आहे. 'तद्वन्तिके' सत्यवादी, सत्यकारी, सत्यमानी, विद्वान, विचारशील पुरुषांच्या तो अत्यंत निकट आहे. तो आत्म्याचाही आत्मा आहे कारण तो सर्व जगाच्या आत बाहेर व मध्ये अखंड एकरस सर्वात व्यापक असतो.

ईश्वराचे स्वरूप वेदात वारंवार वर्णिलेले आहे, कारण ईश्वरात इतके सामर्थ्य, शक्ती, ज्ञान आहे की संपूर्ण विश्व ईश्वराच्या आधाराने चालते. ईश्वराची शक्ती, सामर्थ्य, ज्ञान विज्ञानाशिवाय कोणताही जड चेतन पदार्थ व्यवहारात आपल्या स्वतःला प्रकट करू शकत नाही. जीव चांगले वाईट कर्म करण्यास स्वतंत्र आहे परंतु बल, ज्ञान, साधन, संपत्ती इत्यादी सर्व ईश्वराने दिलेले आहे. जीवात्मा ईश्वराने दिलेल्या सामर्थ्याशिवाय काही करू शकत नाही. जो ईश्वराविषयी यथायोग्य जाणत मानत नाही, काही करत नाही तो कृतघ्न आहे. जर जाणले, मानले, केले तर त्याचा कल, आकर्षण, प्रेम ईश्वराकडे असते. त्याचा ईश्वराशी संबंध जुळतो.

एजति - चलायमान आहे. नैजति - चलायमान नाही. गुणांसह ईश्वराचे वर्णन करणे 'सगुण वर्णन' व जो गुण ईश्वरात नाही ते 'निर्गुण वर्णन' होय. ईश्वर चलायमान नाही. सर्व स्थानी भरलेला आहे. एका जागेहून दुसऱ्या जागी जात नाही. येणे जाणे एकदेशीचे असते. ईश्वर आपल्या समोर आहे, सर्वत्र आहे असे जी व्यक्ती समजते तिचे चित्त कुठे धावेल? पण व्यक्ती ईश्वराशी संबंध जोडण्याऐवजी त्याच्यापासून दूरदूर पळते. ईश्वराजवळ गेल्यास त्याच्या आज्ञेनुसार वागावे लागते.

योगाभ्यासी ईश्वराला ज्ञानाने, बुद्धीच्या माध्यमाने पाहतात. जे अधर्माला दूर करीत नाहीत त्यांच्यापासून ईश्वर दूर असतो. जवळ असूनही दिसत नाही. ईश्वराशी संबंध तुटू शकत नाही. त्याच्याजवळून कितीही लांब पळाले तरी तो तुमच्याजवळ असतोच कारण तो सर्वत्र आहे.

# ईश्वरापासून जगाची उत्पत्ती

"ईशावास्यमिदं सर्वं यत्किञ्च जगत्यां जगत्" ईश्वरापूर्वी कोणताही पदार्थ नव्हता या वाक्याने भ्रांती निर्माण होऊ शकते की हा संसार ईश्वराच्या स्वरुपापासून उत्पन्न झालेला आहे. त्यामुळे अशी भ्रांती निर्माण होते की ईश्वराशिवाय दुसरे काही नव्हते व जीव आणि प्रकृतीही त्याच्यापासूनच उत्पन्न झाले. येथे वक्त्याचा अभिप्राय व प्रकरणही लक्षात घ्यावे लागते. याचा एक अर्थ असा की जे पदार्थ प्रकृतीपासून बनलेले आहेत ते ईश्वरापूर्वी नव्हते दुसरा अर्थ असा की जीव व प्रकृती अस्तित्वात असून ही ईश्वरापूर्वी त्यांचा काही व्यवहार नव्हता.

ईश्वरापासून जग उत्पन्न झाले अर्थात् ईश्वराने निर्माण केले. स्वयंपाकी जेव्हा भाकरी पोळी बनवितो याचा अर्थ स्वयंपाक्याने पिठापासून भाकरी तयार केली. आपल्या शरीरापासून नव्हे. तसे ईश्वराने प्रकृतीपासून जग उत्पन्न केले आपल्या स्वरुपापासून नव्हे. जसे कोळी आपल्या शरीरातून जाळे तयार करतो. स्वतःच्या आत्म्यापासून नव्हे. 'समुद्र नदीचा दृष्टान्त' दिल्यास यात दोन गोष्टींचा अन्तर्भाव होतो. समुद्रामध्ये नदीप्रमाणे योग संयोग असणारे परमाणू आहेत काय? नद्या समुद्राला मिळतात तेव्हा नदीच्या जलकणांचे अस्तित्व नाहीसे होत नाही. समुद्राचे व नदीचे दोन्हींचे स्वतःचे परमाणू असतात.

सर्वत्र ज्ञानपूर्वक क्रिया होत असतात कारण ईश्वर सर्वव्यापक आहे, सर्वज्ञ आहे. करोडो लोक ईश्वराला योग्यरीत्या जाणत नाहीत, मानत नाहीत म्हणून चरित्र, विद्या, परोपकार इत्यादींचा नाश झालेला आहे.
'न तस्य प्रतिमा अस्ति'

ईश्वराचे मोजमाप करण्याचे कोणतेही साधन नाही. ईश्वरासारखा दुसरा पदार्थ नाही. लोक वेदानुसार ईश्वराचे स्वरूप जाणणाऱ्यांना पूर्ण नास्तिक समजतात व अयोग्य पद्धतीने जाणणाऱ्यांना आस्तिक मानतात. म्हणून चुकीच्या मार्गाने जाऊन पूजाअर्चा इत्यादींमध्ये वाढ होत आहे. ईश्वराबाबत चुकीची संकल्पना बाळगल्यास त्याची आज्ञा, उपदेश यांची अवज्ञा होईल. पूर्ण जीवन पूजा अर्चा करण्यात गेले, पण ईश्वराशी संबंध जुळला नाही.

## ईश्वर मित्र

यदङ्ग दाशुषे त्वमग्ने भद्रं करिष्यसि। तवेतत्सत्यमङ्गिरः।

(ऋ. १-१-१-६)

हे (अङ्ग) मित्रा ! जो मनुष्य तुम्हाला आत्मा इत्यादींचे समर्पण करतो त्याला (भद्रम्) तुम्ही व्यावहारिक व पारमार्थिक सुख अवश्य देता. (अङ्गिरः) हे प्राणप्रिय ! स्वभक्तांना परमानन्द देणे हेच तुमचे सत्यव्रत आहे. हा तुमचा स्वभाव आम्हाला अत्यंत सुखदायक आहे. तुम्ही मला ऐहिक व पारमार्थिक या दोन्ही सुखांचे दान ताबडतोब करा ज्यामुळे सर्व प्रकारचे दुःख नाहीसे होऊन आम्हाला सदैव सुख मिळावे.

जो आमच्या कल्याणाची इच्छा करतो तो ईश्वर आमचा मित्र आहे. या जगातही काही मित्र असतात पण या दोन्हींमध्ये अंतर असते. जगातील मित्र कधी कधी शत्रूही बनतात परंतु ईश्वर कधीही मैत्री तोडत नाही. ईश्वराची मित्रता अनादी काळापासून आहे व अनन्त काळापर्यंत राहील. माणसाची मैत्री बदलत असते.

विंचू, साप इत्यादींपासून आपले रक्षण केले पाहिजे. परंतु त्यांनाही आत्मवत् पाहण्याची दृष्टी निर्माण करावी लागेल. भय व रक्षण या दोन गोष्टी वेगवेगळ्या आहेत. त्यापासून बचाव ही केला पाहिजे व मित्र ही समजले पाहिजे. जसे मूल आईच्या अंगावर एखादी वस्तू फेकते तेव्हा आई त्यापासून स्वतःचा बचाव करते पण प्रेमही करते. गुरु हितासाठी शिक्षा करतो हे योग्य आहे. आज अशी अवस्था दिसून येते की दोषांबद्दल शिक्षा करणारा वाईट व शिक्षा न केल्यास तो चांगला. अशी विपरीत स्थिती दिसते.

दाशुषे - जो दान देतो, सेवा करतो त्याला ईश्वर निश्चयपूर्वक लौकिक सुख व मुक्तिसुख देतो.

## ईश्वर होता

अग्निर्होता कविक्रतुः सत्यश्चित्रश्रवस्तमः । देवो देवेभिरागमत् ॥

(ऋ.१-१-१-५)

हे सर्वदृक् सर्वांना पाहणाऱ्या (क्रतुः) सर्व जगाचा जनक (सत्यः) अविनाशी (चित्रश्रवस्तमः) तुमच्याजवळ आश्चर्ययुक्त श्रवण, आश्चर्ययुक्त गुण, आश्चर्ययुक्त शक्ती, आश्चर्ययुक्त रूप असून तुम्ही उत्तम आहात. तुमच्या तुल्य किंवा मोठा कोणी

 

नाही. हे जगदीश! (देवेभिः) दिव्य गुणांनी युक्त (तुम्ही) आमच्या हृदयात प्रकट व्हा. सर्व जगात ही तुम्ही प्रकाशमान आहात. आम्ही व आमचे राज्य दिव्यगुणयुक्त व्हावे ते वस्तुतः तुमचेच आहे. आम्ही तर आपल्या पुत्राप्रमाणे व सेवकाप्रमाणे आहोत.

**अग्निर्होता :** परमेश्वराचे नाव होता आहे. तो आपल्याला चांगल्या वस्तू देतो. ईश्वर आपल्याला संपूर्ण विश्वातील पदार्थ निर्माण करून देतो, ज्ञान विज्ञान देतो, आनंद, बल देतो. तो होता असतो. दुसरा अर्थ आहे घेणारा. मुक्तीच्या वेळी सर्व काही त्याच्याजवळ असते पण मुक्तीच्या समाप्तीनन्तर सर्व परत करतो. आज आपण धनाचे स्वामी आहोत, कालान्तराने राहत नाही त्यावेळी हे समजावे की ईश्वराने परत घेतले म्हणून दुःखी होता कामा नये. मृत्यूचा काळ निश्चित कळला तर करोडपतीही दाता बनतो.

**कवी :** ईश्वर सर्वज्ञ आहे. जगातील सर्व लोकांच्या मनात प्रत्येक क्षणी जे विचार येतात ते ईश्वर प्रतिक्षणी जाणतो. त्याच्या ज्ञानापलीकडे काही नसते. ईश्वर जर सर्व काही जाणतो तर मग दुसरा माणूस जाणेल अथवा न जाणेल याबाबत भयभीत का व्हावे? त्यासाठी स्वतःच समजून उमजून ईश्वराला समर्पित व्हावे अन्यथा तो सर्व काही जाणतच आहे.

मी जे विचार करतो, बोलतो, कृती करतो त्याच्या बऱ्या वाईट फळापासून मी माझा बचाव करू शकत नाही. अशी अनुभूती होणे अत्यंत कठीण आहे. जर असा विचार केला की वाईटाचे फळ शंभर टक्के वाईट मिळेल तर मी वाईटपणा करण्याचा विचारही करू शकणार नाही.

## ईश्वर सर्वरक्षक

**ईश्वर आह्वान व रक्षण :** वेदमंत्रातील विचार संकेतरूपाने सांगितले आहेत. जी व्यक्ती ही संकेतविद्या जाणते ती उन्नत होत होत सूक्ष्म रूपाने अवगाहन करू शकते. वाक्याचा सामान्य अर्थ लावण्याने अनर्थ होतो. जे भाषा विज्ञान (शैली) जाणत नाहीत ते ईश्वर आह्वानाचा अर्थ एखाद्या व्यक्तीला आमंत्रित केल्याप्रमाणे ईश्वराला बोलाविणे असा करतात. येथे आह्वानाचा अर्थ ईश्वर आमच्या पूर्वीपासून उपस्थित आहे. त्याचे गुण (आनंद, ज्ञान इत्यादी) प्राप्त करावे यासाठी त्याच्या निकट राहावे.

**ईश्वर रक्षण कसे करतो :** जसे एक प्रवासी प्रवास करतो. तेव्हा चोराने त्याला लुटले. त्याचवेळी एक साप त्या चोराला चावला. तेव्हा तो प्रवासी वाचला. विहिरीत

तीन लोक पडले, दोन मेले एक वाचला. अपघातात काही लोक मेले काही वाचले. हा ईश्वराच्या रक्षणाचा परिणाम नाही. हे दृष्टान्त चुकीचे आहेत. हे सर्व क्रियाभेदाचा परिणाम भेद आहेत. एक मुलगा विहिरीत भिंतीशी टक्कर होऊन मेला व दुसरा सरळ पाण्यात पडला तो वाचला. एखादा मर्मस्थानी आघात होण्याने अपघातात मेला. दुसऱ्याला अवघड स्थानी लागल्याने ही मेला नाही, वाचला. ईश्वराच्या रक्षणाचे क्षेत्र असे असते की जोपर्यंत जीवात्म्याच्या स्वातंत्र्यात बाधा येत नाही, स्वातंत्र्याचे हनन होत नाही. जीवात्मा जेव्हा अल्पज्ञतेमुळे चुकीने, द्वेषामुळे दुसऱ्याला त्रास देतो तेव्हा ईश्वर हात पकडून त्याच्या स्वातंत्र्याचे हनन करीत नाही व त्रस्त होणाऱ्याचे त्यावेळी रक्षणही करीत नाही. त्याची शिक्षा व क्षतिपूर्ती नन्तर न्याय रूपाने अवश्य करतो.

जे ईश्वराला मानत नाहीत ते नास्तिक असे म्हणतात की ईश्वर जग उत्पन्न करीत नाही, निर्मिती आपोआप होते पण व्यक्तीने आपल्या शरीराचे सूक्ष्म निरीक्षण केल्यास आश्चर्य वाटण्यासारखी स्थिती असते. माणसे आपोआप कशी जन्मली? जन्म घेत आहेत? शरीररचनेचा अभ्यास करुन शेवटी हे मानावे लागते की दृश्यमान पदार्थ व प्राण्यांची शरीरे ईश्वराकडून उत्पन्न होतात, त्याच्या आश्रयाने जगतात व त्याच्याकडूनच प्रलयाकडे जातात.

## ईश्वर आपले रक्षण अनेक प्रकारे करतो

१) परमेश्वराच्या रक्षणाचा एक भाग असा की त्याच्या रक्षणाखेरीज शरीरधारी जीवन धारण करू शकत नाही. रक्षित अर्थात् जीवित राहू शकत नाहीत. आईच्या गर्भात मूल कसे जीवन्त राहते? ईश्वर आईच्या नाडीशी बाळाच्या नाडीचा संबंध जोडून पोषण करून रक्षण करतो. आपण श्वास घेतो, खातो, पचवितो, शरीरात सात धातू, रस, रक्त, मांस इत्यादी बनतात. ही व्यवस्था ईश्वराने निर्माण केलेली आहे.

२) वाईट काम करण्याने ईश्वर भय, लज्जा, शंका उत्पन्न करतो व चांगले काम करण्याच्या योजनेमुळे निर्भयता, आनंद, उत्साह उत्पन्न करून पित्याप्रमाणे, मातेप्रमाणेच आपले रक्षण करतो.

३) ईश्वराच्या माध्यमानेच सर्व क्रिया होतात. तो जीवन देतो, सर्व व्यवस्था करतो. ईश्वरप्रदत्त साधनांशिवाय व्यक्ती क्षणभरही जीवित राहू शकत नाही.

४) आप्त (विद्वान) लोक ईश्वराचे सामर्थ्य प्राप्त करून आपले रक्षण करतात. वेगवेगळ्या क्षेत्रातील धार्मिक विद्वान जसे आयुर्वेद क्षेत्रातील धार्मिक वैद्य प्राण

वाचविणारा असतो व मूर्ख अधार्मिक वैद्य प्राण हरण करणारा असतो. वैज्ञानिक क्षेत्रातही धार्मिक वैज्ञानिक शोध करून अनेक लोकांचे भले करतो व अधार्मिक वैज्ञानिक विनाशाची साधने निर्माण करून हानी ही करतो. कृषी उत्पादन करण्याच्या क्षेत्रातही धार्मिक विद्वान कृषितज्ज्ञ कृषी अनुसंधान करून अधिक उत्पादनाचा चांगला मार्ग शोधून काढतो. त्याचप्रकारे आध्यात्मिक क्षेत्रात काम, क्रोध, लोभ, मोह माणसांचे चर्वण करतात व धार्मिक विद्वान आपल्या उपदेशाने त्यांचे निवारण करतात. जी व्यक्ती धार्मिक विद्वान बनते व त्यामुळे तिला जे सुख प्राप्त होते त्याच्या तुलनेत सांसारिक सुख तुच्छ आहे. जेथे धार्मिकता नसते तेथे धन, बल, विद्या यांच्यामुळे अभिमान उत्पन्न होतो. ज्याने शास्त्राचे अध्ययन केलेले आहे परंतु यम-नियमांचे पालन करीत नाही तो गर्विष्ठ बनतो आणि स्वतःचे व समाजाचे अनिष्ट करतो.

५) मानवच नव्हे तर प्रत्येक प्राण्याला सुरक्षित व सुखी ठेवण्यासाठी सृजनहार परमेश्वराने अनुपम भेट प्रदान केलेली आहे. ती म्हणजे हवा, पाणी, प्रकाश, आहार (वृक्ष, वनस्पती, फळे, फुले) इत्यादी. त्यामुळे जीवनात आनंद, प्रेरणा, उत्साह, हर्ष निर्माण होतो.

६) परमेश्वर जीवाचा सुधार व्हावा यासाठी त्याच्या चांगल्या व वाईट कर्माचे फळ देतो व कल्याणाच्या भावनेनेच दुःख व सुख देऊन रक्षण करतो. राजा न्यायी असेल तर पाप, अत्याचार बंद होतात. सुख शांती निर्माण करण्यासाठी राजा हा रक्षक असतो. त्याचप्रमाणे ईश्वर जीवाला वाईट कर्माचे फळ गाढव, घोडे इत्यादी बनवून शिक्षा करतो. याप्रमाणे न्यायी बनून रक्षण करतो.

७) ईश्वर, सूर्य व पृथ्वीमध्ये योग्य अंतर ठेवून बुद्धिमत्तेने आपल्या प्राणांचे रक्षण करतो. वर्षा, अग्नी, जल, वायू इत्यादी द्वारे शरीर व जग यांचे रक्षण करतो. सर्व प्राण्यांना आपल्या प्राणाचे रक्षण, सतर्कतेचे स्वाभाविक ज्ञान, तसेच माणसाला विविध कार्यक्षेत्रात संलग्न ठेवत स्वरक्षणासाठी बुद्धी इत्यादी साधन देतो.

**वेदाचे ज्ञान देऊन रक्षण :** ईश्वराने सर्व पदार्थ उत्पन्न करून दिलेले आहेत. त्यांचा उपयोग कसा करावा यासाठी वेदज्ञान दिलेले आहे. आजही जर आपण ईश्वराच्या आज्ञेचे पालन व उपासना केली तर ईश्वर ज्ञान देतो, रक्षण करतो. 'स एष पूर्वेषामपि गुरुः कालेनानवच्छदात्' ईश्वर पूर्वी झालेल्या गुरुंचाही गुरू आहे व पुढे ही राहील. गुरू जशी विद्या देऊन रक्षण करतो त्याचप्रकारे ईश्वर विद्येद्वारे रक्षण करतो.

याप्रकारे ईश्वर विविध प्रकारे रक्षण करतो हे जाणावे व समजावे. जेव्हा व्यक्ती धनवान, बलवान, रूपवान, विद्वान, बुद्धिमान बनेल व तिला कळेल की हे सर्व ईश्वर प्रदत्त आहे, माझे नाही. तेव्हा निष्काम भावाने तन, मन, धनाने सेवा व रक्षण करील. सूड घ्यावा किंवा बदला घ्यावा या वृत्तीने करणार नाही. ईश्वर ज्या प्रकारचे रक्षण करतो त्याला तसेच जाणावे म्हणजे ईश्वराशी संबंध जुळतो. विपरीत जाणण्याने नाही. ईश्वराला चुकीचे मानण्याने, चुकीच्या पद्धतीने पूजा करण्याने ईश्वराशी संबंध जुळत नाहीत. शुद्ध उपासनेद्वारे ईश्वराशी संबंध जुळल्यास वाईटापासून दूर होऊन दुःखातून सुटका होते.

## ईश्वराकडून धन विद्येची प्राप्ती

अग्निना रयिमश्नवत्पोषमेव दिवे दिवे। यशसं वीरवत्तमम्।

(ऋ. १-१-१-३)

माणूस अशी प्रार्थना करतो की हे ईश्वरा! मला तुझ्याकडून रयि (संपत्ती) (धन, संपत्ती व विद्या) प्राप्त व्हावी. त्याचा योग्य तऱ्हेने संयोग केल्यास ईश्वर आपल्याला वरील संपत्तीने परिपूर्ण करतो.

ईश्वर एखाद्याला सोने, चांदी प्रत्यक्ष देतो का? हे सर्व धातू ईश्वराने पृथ्वीच्या गर्भात ठेवलेले आहेत. व्यक्तीने पृथ्वीच्या गर्भातून काढून ते शुद्ध करावे. इंजिन तयार करणारा लोखंडापासून इंजिन बनवितो पण लोखंड ईश्वराने निर्माण केले आहे. त्याच प्रकारे धनधान्यही ईश्वराने निर्माण केलेले आहे. ईश्वराच्या साह्यानेच सूय, बीज, भूमी, खत मिळते. एका बीजापासून ईश्वर हजार बीज बनवितो. एखादा वैज्ञानिक एक बीज तरी बनवू शकेल काय?

द्राक्षे, मिर्ची, लिंबू, खजूर हे सर्व जवळ जवळ लावलेले असतात. जवळ जवळ असूनही त्यांच्यात वेगवेगळे रस असतात. ईश्वराने प्रथम बीज बनविले. सत्त्व, रज, तमापासून वेगवेगळे आंबट गोड पदार्थ बनविले. ईश्वरापासून धन प्राप्त करण्याचा अभिप्राय असा की व्यक्तीने परिश्रम करुन ईश्वर प्रदत्त पदार्थ प्राप्त करावे. याचप्रकारे तो विद्याही देतो. ऋषींना सृष्टीच्या आरंभी परिश्रम व पुरुषार्थाच्या आधारावर विद्या दिली. त्याचप्रकारे आजही जो कोणी समाधी प्राप्त करील त्याला विद्या देतो.

आज पैशासमोर विद्येला काहीत किंमत नाही. परंतु ऋषींची ही मान्यता आहे की जे सुख धन धान्याने व लौकिक वस्तूंनी प्राप्त होते ते विद्येपासून मिळणाऱ्या सुखाच्या हजाराव्या हिश्श्याचा भाग ही नाही. विद्या ही माता, पिता, आचार्य व ईश्वर यांच्याकडून प्राप्त होते.

आजच्या धनापासून चोर व डाकू निर्माण होतात परंतु विद्या यश देणारी व वीर पुरूष निर्माण करणारी असते.

## न्यायकारी वज्ररूपी ईश्वर

स वज्र भृद्दस्यु हा भीम उग्रः सहस्रचेताः शतनीथ ऋभ्वा।
चम्रीषो न शवसा पाञ्चजन्यो मरुत्वान्नो भवत्विन्द्र ऊती ॥
(ऋ. १-७-१०-१२)

हे दुष्ट संहारक ! (परमेश्वरा) तू (वज्रभृत्) स्वसामर्थ्याने दुष्टांचा छेदक सर्वशिष्टहितरकारक , दुष्टविनाशक, न्याय धारण करणारा 'प्राणो वा वज्रः' म्हणून (दस्युहा) दुष्ट पापी लोकांचे हनन करणारा आहेस (भीमः) तुझा न्याय आज्ञा न पाळणाऱ्यांना भयंकर भीती दाखवितोस. (सहस्रचेताः) सहस्र विज्ञान इत्यादी गुणयुक्त तूच आहेस (शतनीथ) असंख्य पदार्थांची प्राप्ती करून देणारा तूच आहेस. (ऋभ्वा) विज्ञानाचा अत्यंत प्रकाश देणारा महाबली आहेस. (नचभ्रीषः) कोणत्याही सेनेला तू हार जाणारा नाहीस. (शवसा पाञ्चजन्यः) स्वबलाने तू पाञ्चजन्याचा (पाच प्राण) जनक आहेस, (मरुत्वान्) सर्व प्रकारे वायूचा आधार व चालक आहेस म्हणून तू (इन्द्रः) आमचे रक्षण कर. ज्यामुळे आमचे कोणतेही अहित होऊ नये.

वेदमंत्रात ईश्वराला वज्र भयंकर कठोर, बलवान म्हटले आहे. जशी विद्युत पर्वतावर पडते व त्यालाही फोडते तशी जी व्यक्ती ईश्वराला भयंकर वज्ररूप मानते, दंड देणारा व न्यायी म्हणून जाणते ती पाप कर्मापासून आपला बचाव करते व ईश्वराला प्राप्त करते. जो ईश्वराला वज्राप्रमाणे समजतो तो विपरीत कर्म करीत नाही. जसे माझे कर्म, उपासना, ज्ञान असेल तसेच मला ईश्वराकडून फळ प्राप्त होईल. प्रथम ज्ञानात गडबड होते नंतर कर्मात होते. ईश्वराला सोडून इतरांची उपासना केल्यास त्याला शिक्षा जरूर होईल. जर खरी उपासना केली तर त्याप्रमाणे ज्ञान, कर्म ही ठीक राहील.

ईश्वर दुष्टांचा नाश करणारा आहे याचा अर्थ लोकांनी विपरीत लावलेला आहे. ईश्वर अवतार घेऊन नाश करील असे जर मानले तर विनाशासाठी अनेक शरीरे धारण करावी लागतील. वास्तविक ईश्वराला शरीर धारण करण्याची आवश्यकता नाही. ईश्वर दुष्ट कर्म करणाऱ्यांना सरळ रीतीने नष्ट करीत नाही. परंतु मृत्युनंतर गाढव, घोडयाची योनी देऊन शिक्षा भोगावयास लावतो. पाप करणारे जास्त असतात

म्हणूनच मनुष्येतर प्राणी जास्त असतात.

एखादा म्हणेल गाढव, डुक्कर आपल्या धुंदीत मस्त व महान विव्दान ही आपल्या धुंदीत मस्त. याप्रमाणे दोन्ही समान असतात. जो सुखाचा विकास माणसामध्ये आहे त्याचा हजारावा भाग ही डुक्कर, गाढव, कबूतर इत्यादीमध्ये नाही असा विचार वरील लोक करीत नाहीत. हे प्राणी समाधी लावू शकतात काय ?

चांगले कर्म करणाऱ्यांना ईश्वर सतत ज्ञान, बल, आनंद, निर्भयता, उत्साह देत असतो. दुष्टांना शिक्षा अशी मिळते की ते भयभीत, क्रोधित व दुःखी राहून दंड भोगतात.

## ईश्वराची सर्वप्रियता

पुरूतमं पुरूणामीशानं वार्य्याणाम् । इन्द्रं सोमे सचा सुते । (ऋ.१-१-९-२)

अर्थ (पुरूतमम्) अत्यंत उत्तम व शत्रुविनाशक ईश्वरा । (पुरूणाम्) बहुविध जगाच्या पदार्थांचा (ईशानम्) स्वामी व उत्पादकाला (वार्य्याणम्) वरणीय परमानंद मोक्ष इत्यादी पदार्थांचे (इन्द्रम्) परम ऐश्वर्यवान अशा तुम्हाला (सोमे) उत्पत्तिस्थान जग (सचा) अत्यंत प्रेमाने (सुते) तुमच्यापासून निर्माण होत असल्यामुळे तुमचे हृदयापासून गान करावे.

मंत्रात एक गोष्ट सांगितलेली आहे 'हे ईश्वरा ! तू सर्वश्रेष्ठ, उत्तम आहेस.' ईश्वराचे श्रेष्ठत्व न समजल्यामुळे बहुतेक व्यक्ती लौकिक वस्तूंमध्ये अडकलेल्या असतात शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध या विषयांमध्ये व्यक्ती रममाण झालेली असते. कोणत्याना कोणत्या लौकिक विषयाला व्यवहारात प्राप्त करण्याच्या प्रयत्नात ती असते. हे पदार्थ उत्तम की ईश्वर उत्तम याचे परीक्षण ती करीत नाही. म्हणून जे विषय इंद्रियांसमोर असतात त्यांचे सेवन, त्यांची उपासना करण्यात ती गुंतलेली असते.

ईश्वराच्या बाबतीत व्यक्तीने स्वतःच विचार केला पाहिजे. शरीर व त्यांचे सौंदर्य व्यक्तीने स्वतः बनविले आहे काय ? ज्या डोळ्यांनी व्यक्ती पाहते ते डोळे स्वतःव्यक्तीने बनविले आहेत काय ? बोट स्वतः बनविले आहे काय ? त्या बोटांना रंग लावून व्यक्ती अभिमानाने मिरवीत असते. आपण कशाची निर्मिती करू शकतो ? याचा विचार करावा. लौकिक व्यक्तींना आपल्या मुलाबाळांची फार चिंता असते. परंतु जगात जे जे सौंदर्य दिसून येते ते सर्व ईश्वर प्रदत्त आहे हे त्यांना कळत नाही.

ईश्वराने आपल्यासाठी जे काही निर्माण केलेले आहे त्याचा योग्य उपयोग

 

करा व उपयोग करताना ईश्वराला विसरू नका. ब्रह्मचारी सुध्दा गृहस्थाश्रमात प्रवेश केल्यानंतर संध्या, हवन, पंचमहायज्ञ सोडून देतो व अत्यंत परिश्रमाने धन प्राप्त करण्यात मग्न असतो. जो गृहस्थधर्माचे पालन करीत नाही तो मानव जीवन जगत आहे काय?

मी आत्मा, ईश्वराने दिलेल्या वस्तू व ज्ञानाशिवाय काही ही करू शकत नाही. पतीच परमेश्वर, केवळ मुलांचे पालन पोषणच भक्ती, माता पिता यांची सेवा हीच ईश्वरपूजा आहे हे विपरीत ज्ञान आहे. हे सर्व तर आमचे कर्तव्य आहे पण हे कर्तव्य करण्याचे सामर्थ्य कुठून आले ? हे सर्व ईश्वर प्रदत्त आहे .

आईने दूध, केळी, शिरा इत्यादी सर्व आपल्या पोटात घातले, त्यापासून दूध बनले तेव्हा मुलाला पाजविले. आईने तर केवळ उदरभरण केले. दूध कुणी बनविले ? ईश्वराने. आई म्हणते माझा मुलगा, माझा मुलगा, मीच पालन पोषण केले.

नाक, कान, डोळे इत्यादींचा वापर करणारा मी आहे. ते स्वत: मी तयार केलेले नाहीत. तेव्हा जी गोष्ट जशी आहे तशी मानण्यास काय हरकत आहे ? त्यापासून दूर का होता ? ज्या प्रकृतीचा उपयोग करता त्या प्रकृतीला या रूपात कुणी उभे केले ? एखाद्या जीवाचे हे सामर्थ्य आहे काय ? वैज्ञानिक ज्या धातूंचा शोध लावतात ते ही ईश्वरदत्त व ज्या नेत्र, हस्त इत्यादी साधनांनी शोध लावतात तेही ईश्वर प्रदत्त असतात हे भौतिक विज्ञानही ईश्वराने आपल्या साधनांव्दारे दिलेले आहे.

आपल्यामध्ये जी विद्या, धन, बल आहे त्याचा स्वामी ईश्वर आहे. माणूस त्याला आपले मानतो हा भ्रम आहे. हे अज्ञान दूर केले पाहिजे. मृत पिलास माकडिणीसारखे छातीला घट्ट चिकटवून घेऊ नये. मी माझा हा संबंध नष्ट करावयास हवा.

## वायो अनन्त बल परेश

वायवायाहि दर्शतिमे सोमा अरङ्कृताः । तेषां पाहि श्रुधी हवम् । (वायो) हे अनन्त बल परेश । (आयाहि) तुझी कृपा व्हावी, तू आम्हाला प्राप्त हो (दर्शन) हे दर्शनीय । हया (सोमाः) सोमवल्ली इत्यादी औषधांचा उत्तम रस श्रेष्ठ पदार्थ (अरङ्कृताः) उत्तम रीतीने बनविलेले (तेषाम्) त्यांचा (पाहि) स्वीकार कर (श्रुधी) ऐकून प्रसन्न हो (हवम्) हाकेला (आर्ततेला).

उपासक ईश्वराला आपले माता -पिता मानून प्रार्थना करतो 'वायु' शब्दाने ईश्वराचे नाव ग्रहण केलेले आहे. जे लोक ऋषींची परंपरा जाणत नाहीत ते वेदाचा

खरा अर्थ जाणू शकत नाहीत. वायूमध्ये एक असा गुण आहे की जो इकडचे तिकडे, तिकडचे इकडे करून टाकतो. चक्रवात येतो तो किती वेगवान असतो, वृक्ष उखडून टाकतो. समुद्रात सात मजली जहाजाचा पत्ता लागत नाही. या वायूप्रमाणेच ईश्वर वेगवान आहे. संपूर्ण जगाला गती देत क्रियान्वित करीत आहे. जसे दुसऱ्याच्या हाताचा आधार न घेता जीवात्मा केवळ स्वत:च्या इच्छेने हात उचलतो त्याच प्रकारे ईश्वर स्वत: हालचाल  न करता क्रिया करतो. ईश्वराच्या क्रियाशील शक्तीशिवाय सृष्टी कशी बनली ? चुंबक जसा स्वत: हालचाल न करता सुईला ओढून घेतो, क्रियाशील करतो तसे ईश्वर करतो.

प्रयत्न, परिश्रम, स्थानांतर करून क्रिया करणे हे एक देशी मध्ये असते. प्रयत्न, परिश्रमाची क्रिया सर्वव्यापक असणाऱ्याला करावी लागत नाही. भौतिकवादी लोक आकार असलेल्या वस्तूला वस्तू मानतात व आकार रहित असलेल्याला वस्तू मानत नाहीत. जर ईश्वराला आकारच नाही तर त्याला डोळ्यांनी कसे पाहता येईल ? भौतिक वस्तूंचाच आकार असतो ईश्वर आकार रहित ज्ञान, गुण, बल, क्रिया असणारा पदार्थ आहे.

## स्तुतीने गुणांची प्राप्ती

अग्नि:पूर्वेभिर्ऋषिभिरीड्यो नूतनैरूत । सदेवाँ एह वक्षति ॥ (ऋ.१-१-१-२)

सर्व माणसांनी स्तुती करण्यायोग्य ईश्वरुपी हे अग्ने ! (पूर्वेभि:) विद्याध्ययन केलेले प्राचीन (ऋषिभि:) मंत्रार्थ पाहणारे विव्दान व (नूतनै:) वेदार्थ शिकणाऱ्या नवीन ब्रह्मचाऱ्याकडून (ईडय:) स्तुती करण्यायोग्य (उत) व आम्ही माणसे विव्दान किंवा मूर्ख असणाऱ्याकडूनही अवश्य (तुम्हीच) स्तुती करण्यायोग्य आहात म्हणून तुम्ही आमच्या व सर्व जगाच्या सुखासाठी कृपा करून दिव्य गुण अर्थात आम्हाला विद्या प्राप्त करून द्या तुम्हीच सर्वांचे इष्टदेव आहात.

ईश्वर स्तुतीने आपल्याला काय मिळते ? ईश्वराच्या गुणांचे वर्णन ईश्वराविषयी जाणणे ही स्तुती आहे. जे ईश्वराचे गुणगान करतात तीही स्तुतीच होय. एखाद्याचे चांगले गुण ऐकून त्या पदार्थाला प्राप्त करण्याची अभिरूची निर्माण होते. चांगल्या प्रकारे ऐकणे 'स्तुती' व चुकीचे ऐकणे 'निंदा' होय.

**ईश्वराला विपरीत मानणे :** हे ईश्वरा तू चौथ्या आकाशामध्ये किंवा सातव्या आकाशात किंवा वैकुंठ परमधामामध्ये राहतोस असे समजून स्तुती करणे ही त्याची

 

निंदा होय.

भले बाबा से चाहे जो करा लो जी ।
चाहे दूकान चलवा लो खेती करवा लो जी ।

हे संधिसाधू (अवसरवादी) लोक ज्या व्यासपीठावर जातील त्या व्यासपीठावर असेच बोलतील "बंधूनो । सर्व धर्म मार्ग ठीक आहेत" ही निंदा होय.

श्रवण, मनन, ज्ञान या व्दारे स्तुती केली जाते. त्यामुळे ईश्वराचे दिव्यगुण आपल्यामध्ये येतील. जो ईश्वराला चांगल्या रीतीने जाणत नाही त्याला कसे कळेल की चांगले वाईट काम कोणते ? चांगल्या वाईट कामाची अंतिम कसोटी ईश्वरच आहे कारण तो चांगल्याला वाईट व वाईटाला चांगले म्हणत नाही. केलेले उपकार न मानणे ही कृतघ्नता आहे. जेव्हा व्यक्ती गुण जाणते तेव्हा त्यांना प्राप्त करण्याची प्रार्थना केली जाते.

## त्यागपूर्वक भोग

जितके जड व चेतन जग दिसते व जे दिसत नाही ते संपूर्ण ईश्वराच्छादित आहे.

'तेन त्यक्तेन भुंजीथा:' जगातील उत्पन्न झालेले पदार्थ आपण खातो पितो, उपयोगात आणतो, भोजन करतो. अत्यंत स्वादिष्ट लागते. मोह न करता केवळ शरीरपोषणासाठी आवश्यकतेनुसार खाणे ठीक परंतु जर अधिक मोह व स्वादासाठी खाल तर अनर्थ होईल. त्यागपूर्वक खाणारा अधिक मात्रेमध्ये खात नाही, मोह असणारा अधिक खातो. अधिक घेऊन उष्टे टाकतो. त्यामुळे दुसऱ्याच्या हिश्श्याची हानी होते व मोहामुळे तो ईश्वराला प्रेमही करू शकणार नाही, जो वस्त्रेही मोहाने घालतो त्याच्यापासून ईश्वर दूर जातो. बाहेरच्या वस्तू इतक्या सुसज्जित केल्या जातात की उपासनेसाठी अर्धातासही मिळत नाही. परंतु जो त्यागपूर्वक भोग करतो तो ईश्वरापर्यंत पोचतो. व्यक्ती सकाळी उठल्यापासून खूप परिश्रम करते व जगातील वस्तू प्राप्त करण्यासाठी दिवसभर तेच करीत असते. भोगामध्ये गुंतलेला माणूस कधी मुक्तिसुख भोगू शकत नाही.

## तमोगुणाचा प्रभाव अकर्मण्यता

तमोगुणी माणसाला पडून राहवेसे वाटते. आळशी पणात, झोपण्यात वेळ घालवून तो काम करू इच्छित नाही. परंतु फळाची अपेक्षा मात्र करतो पडून राहण्यातच

आनंद सुख मानतो. कर्म न करता फळ इच्छितो. विद्यार्थी अभ्यास करीत नाही परंतु परीक्षेत प्रथम येऊ इच्छितो. काम न करणे लाभदायक आहे ही मानसिकता का निर्माण होते? झोप वाढवीत वाढवीत वीस घंटे झोपण्याची सवय होते. भाकरी खात खात भूक वाढते. पंडे पाच सहा किलो बर्फी खातात परंतु हा माणसाचा स्वाभाविक गुण नाही. प्रकृतीच्या संसर्गाने तमोगुणाच्या प्रभावाने आपण स्वतः आळस, प्रमाद, अकर्मण्यता वाढवीत जातो. जीवात्म्याचा स्वाभाविक गुण 'प्रयत्न' (कर्म करणे) आहे. परंतु निष्काम कर्म न केल्यास वाईट कामापासून बचाव होऊ शकत नाही म्हणून निष्काम कर्मच शुभ कर्म होऊ शकते. लौकिक कामना एका मर्यादेपर्यंत ठीक आहे. परंतु आपल्या दान इत्यादी कर्माच्या मोबदल्यात मानाची अत्यधिक इच्छा बाळगणे किंवा काम कुणी केले तरी चालेल पण नाव आपले व्हावे अशी इच्छा ठेवल्यास तो अन्याय ठरेल.

## जीवनाची सार्थकता

व्यक्तीच्या जीवनात एक असा क्षण येतो की तिला काही तरी करावेसे वाटते. जीवनात येणारे सुख व दुःख आनंद व त्रास, सफलता व विफलता या विचारपेक्षा वेगळा उदात्त विचार करावा लागतो.

जगाला जिंकावयाचे असेल तर व्यक्तीला प्रथम स्वतःला जिंकावे लागते. व्यक्तीने हे जाणले पाहिजे की जीवन हा एक यज्ञ आहे. या जीवन कार्याचा उद्देश्य धर्म, विज्ञान, साहित्य, लेखन, मानवसेवा, तत्त्वज्ञान व योगाभ्यासाने ईश्वराचे सान्निध्य प्राप्त करणे हा असतो. त्याचे अंतिम फळ काहीही मिळो पण तिला या कार्यरूपी यज्ञात आहुतीच्या रूपाने स्वतःचे सर्वस्व अर्पण करावे लागते. हे कळाल्याशिवाय व्यक्ती कार्य करू शकत नाही, लक्ष्य समोर ठेवूनच चालले पाहिजे.

स्वतःच्या शक्ती, बुद्धीनुसार व आपल्या प्रवृत्तीनुसार जीवनांचे उद्दिष्ट निश्चित करावे लागते. सुख, दुःख, आनंद, कष्ट, सफलता विफलता यापासून कोणत्याही व्यक्तीचे जीवन सर्वथा मुक्त राहू शकत नाही. मनपसंत भोजन मिळो न मिळो, निराहार राहण्याची वेळही येऊ शकेल परंतु झोपण्यापूर्वी व्यक्तीला समाधान वाटले पाहिजे की मी आज हे काम केलेले आहे. हा आत्मसंतोषच तिच्या जीवन साफल्याचा मापदंड आहे.

मनावर नियंत्रण ठेवणे, आपल्या अधिकारापेक्षा अधिक विचार न करणे किंवा काही न करणे हे अशक्य वाटते. अयोग्यता व अनभ्यासामुळे हे अशक्य वाटते. अभ्यास

व वैराग्य यांनी मन ताब्यात येते.

आपल्या दोषांवर जो प्रेम करतो तो कधी उन्नती करू शकत नाही. एक गोष्ट चांगली केल्यास अनेक गोष्टी चांगल्या होतात. एक एक पदार्थ व्यक्तीला बिघडविण्यासाठी व सुधरविण्यासाठी सक्षम आहे. जी विद्या ज्या नियमाने प्राप्त होते त्याच नियमाने प्राप्त केली पाहिजे. त्या विद्येनुसार सर्व गोष्टी केल्या पाहिजेत. उठणे, बसणे, खाणे, पिणे, विचार करणे इत्यादी आवश्यक निर्देश समोर ठेवून सुधारणा केली तर सफलता मिळेल. या उलट लक्ष न दिल्यास सफलता मिळणार नाही.

'माणसाचा आत्मा सत्यासत्य जाणणारा आहे' ही ऋषींची उक्ती फक्त दाखविण्यापुरती नाही. जीवनाच्या सार्थकतेसाठी आहे. आपले प्रयत्न व ईश्वरदत्त सामर्थ्य दोन्हीने माणूस सत्यासत्य जाणू शकतो परंतु हट्ट, दुराग्रह, मिथ्याभिमान व अविद्या इत्यादी दोषांमुळे असत्याकडे वळतो. दुराग्रहामुळे तो गर्विष्ठ बनतो.

व्यक्ती जन्मापासून मृत्यूपर्यंत सुख व सुखाची साधने प्राप्त करण्यासाठी प्रयत्न करते व ज्या ज्या गोष्टी पासून तिला सुख मिळते ते प्राप्त करण्यासाठी दुसऱ्याबरोबर अनुचित व्यवहार करते. या प्रकारची व्यक्ती सत्यासत्य जाणू शकत नाही.

## विचारानेच बंधमुक्ती

विशेष विद्येची प्राप्ती विशेष परिश्रमाने होते. दुःखी न होता दुःख सहन करणे व दुःखी होऊन सहन करणे यात फार फरक आहे. घरी नातेवाईक आल्यास आपण त्यांना सुखाने सहन करतो पण एखादा अपरिचित आल्यास उदास भावाने पाहतो व्यक्ती व्देष-क्लेशामध्ये अडकलेली असते. एखाद्याशी संघर्ष झाल्यास नेहमी त्याच्यामुळे दुःखी राहते. पूर्वी केलेले वाईट विचार, वाईट व्यवहार जेव्हा उपासनेत त्रास देतात तेव्हा तिला रडू फुटते.

मान अपमान सहन करणे शिकले पाहिजे. जोपर्यंत शक्य असेल तोपर्यंत कष्ट, सर्दी, गर्मी इत्यादी तप सहन केले पाहिजे. त्यामुळे अभ्यास होतो व सुविचार उत्पन्न होऊन कुविचाराला नष्ट करतो. हे एक विज्ञान आहे विचार करण्याची पध्दत आहे. कुविचार माणसांच्या दुःखाचे (बंधन) व सुविचार मुक्तीचे कारण आहे.

संपूर्ण जग यासाठीच दुःखी असते की जगातील लोकांना योग्य तऱ्हेने विचार करता येत नाही. ज्वरग्रस्त माणूस अधिक आक्रोश करू लागला तर त्याला अधिक त्रास होतो व तो दुःखी होतो. मानवी जीवनात सुविचार कुविचाराचा फार मोठा प्रभाव

असतो.

ही धनसंपत्ती माझी नसून ती ईश्वराची आहे ही गोष्ट मनुष्य योगाभ्यासाने शिकतो. एवढेच नव्हे तर माझे शरीर, मन, बुध्दी, इंद्रिये ही ईश्वरदत्त आहेत हे जाणतो. मी त्यांचे रक्षण व उपयोग करीन असे तो ठरवतो. जेव्हा माझा जन्म झाला नव्हता तेव्हा किंवा मृत्यूनंतर यातले माझे काहीच नव्हते व राहणार नाही हे त्याला कळते अब्जोपती मेला तर त्याच्याबरोबर एक कवडीही जात नाही. जी वस्तू येते ती वस्तू जाते. संयोग व वियोग ही असतो. हे निश्चित सत्य तो पूर्वीपासून जाणतो व येण्या जाण्याने (आवागमन) शोक करीत नाही.

## मृत्यू दुःखापासून सुटका करण्याचा उपाय

अकामो धीरो अमृतः स्वयम्भूः रसेन तृप्तो न कुतश्चनोनः ।
तमेव विव्दान न बिभाय मृत्योरात्मनं धीरमजरं युवानम् ॥
(अथर्व १०-८-४४)

**शब्दार्थ :** (अकामः) कामनारहित (धीरः) धीर, धृतिमान, सर्वज्ञ (अमृतः) अविनाशी, सदामुक्त (स्वयम्भूः) स्वसवत्तेमध्ये परनिरपेक्ष (रसेन तृप्तः) आनंदाने तृप्त = परिपूर्ण (कुतः+चन) कुठूनही (न ऊनः) न्यून नाही (तम + एवं) त्याच (धीरम् + अजरम्) / धीर, अजर (युवानम्) सदैव नवीन तरूण (आत्मानम्) सर्वव्यापक परमेश्वराला (विव्दान) जाणणारा (मृत्यो नः) मृत्यूला (बिभाय) भीत नाही.

तो संपूर्ण कामनारहीत (स्वतःची कोणतीच इच्छा नाही पण जीवाच्या कल्याणाची इच्छा असते) धीर, अमर, स्वतः आपल्या सत्तेने विद्यमान, आनंदयुक्त सर्व तऱ्हेने परिपूर्ण आहे. त्याच धैर्यवान, अजर, सदैव एकरस असणाऱ्या आत्मस्वरूपाला जाणणारा मृत्यूला भीत नाही.

कोणताही वैज्ञानिक या मृत्यूच्या भयापासून सुटका करून घेऊ शकत नाही 'वेदाहमेतं पुरुषं महान्तम्' हे जिज्ञासू पुरुषा ! मी ज्या पूर्वोक्त मोठमोठया गुणांनी युक्त सूर्यासारख्या, प्रकाशस्वरूप, अंधःकार किंवा अज्ञानापासून पृथक, सदा विद्यमान, स्वरूपाने सर्वत्र पूर्ण अशा परमेश्वराला जाणतो. त्याला जाणून तुम्हीही दुःखदायी मृत्यूचे भय नष्ट करू शकता. मोक्षप्राप्त करण्याचा यापेक्षा भिन्न मार्ग विद्यमान नाही.

# योगसाधकासाठी व्रत

ओ३म् अग्ने व्रतपते व्रतं चरिष्यामि तच्छकेयं तन्मे राध्यताम् ।
इदमहमनृतात् सत्यमुपैमि ॥ (यजुर्वेद १/५)

**अर्थ** : अग्ने = हे सत्य धर्माच्या उपदेशक असणाऱ्या परमेश्वरा ! व्रतपते = सत्यभाषण इत्यादी व्रतांचा पालक अहम् = मी व्रतम् = सत्य इत्यादी आदर्श व्रतांचे चरिष्यामि = पालन करीन. अहम अनृतात् = मी असत्य आचरणाला सोडून इदंच सत्यं = या सत्य आचरणाला उपैमि = प्राप्त करावे. मला शक्ती दे की मी तच्छकेयम् = या कार्यात समर्थ व्हावे. तन्मे राध्यताम् = माझे व्रत सफल व्हावे.

व्रत स्वीकारणे महत्त्वाचे आहे. उत्तम कार्यात ईश्वराचा सहभाग असतो. तुम्ही व्रत संकल्प केले की त्याने जीवन महान बनेल. जी व्यक्ती संकल्प करते तिचा विकास होतो. जी व्यक्ती व्रत घेऊन त्यानुसार आचरण करीत नाही तिचे जीवन निम्न स्तरावर जाते. व्रताचा पाच क्षेत्रात विस्तार केला जातो.

स्वतःमध्ये कोणत्या त्रुटी आहेत ? परिवार व समाजामध्ये कोणती कमतरता आहे ते जाणून त्या दूर कराव्या. पुन्हा देशात कोणती कमतरता आहे हे जाणावे. शत्रू व दोष दूर करावेत. वैशिष्ट्याची पूर्तता करावी. त्याचप्रमाणे विश्व व इतर प्राण्यांच्या क्षेत्रात विचार करावा. जी व्यक्ती या पाच क्षेत्रात कार्य करीत नाही तिचे जीवन अपूर्ण मानले जाते.

आजचा माणूस खोटे बोलतो, भांडण करतो, चहा पितो व अण्डे, मांस खातो. सर्व देशवासी केवळ आपला परिवार, व्यापार धंदा याचा विचार करतात. विद्यार्थी, सिनेमा, टी.वी. निरूद्देश्य भटकणे किंवा नशा करणे यात मग्न असतो.

संप्रदायी लोक जास्तीत जास्त शिष्य शिष्यिणी बनविण्यात किंवा भव्य मंदिर, महालय, देवस्थान बनविण्यात मग्न असतात. देशाकडे कुणाचेही लक्ष नसते. याच देशात जन्म घेतात, याच देशाचे अन्न पाणी खातात, पितात व त्यालाच नष्ट करतात व त्या देशालाच विस्फोट करून उडवू इच्छितात.

व्यक्तिगत खाणे पिणे पशू पक्षी ही करतात. ईश्वराला माता पिता म्हणून स्वीकारीत नाहीत. सर्वांच्या हिताच्या गोष्टींचा विचार करीत नाहीत. मोठमोठे महंत गादी (पीठा) वर बसलेले असतात. प्राण्यांना मारून खाणारे लोक सर्वांच्या हिताचा

 

विचार कसा करू शकतील?

आज देशवासी (हिंदू) आपल्या शत्रूंची साथ देतो व आपल्या लोकांना दूर करतो. जे लोक रोग, शत्रू दोष यांना लहान समजतात त्यांना हे तिन्ही समाप्त करतात. एकतर त्यांना समाप्त करावे किंवा नष्ट व्हावे व आंतरिक शत्रू राग, (मोह), व्देष इत्यादी असतात व बाह्य शत्रू देशद्रोही, राजा, मंत्री, सत्ताधीश इत्यादी असतात. जो आपल्या हितकर्त्यांची गोष्ट ऐकत नाही त्याचा विनाश होतो. आज व्रतहीन, संकल्प शून्य सत्ताधीशांनी देशाची दुर्दशा केलेली आहे.

अव्रती-दस्यु, पिशाच्च असतात. व्रत व्यक्तीला माणूस बनविते. ईश्वराला भेटण्याचे कार्य करते. जो आपल्या व्रताचे, प्रतिज्ञेचे पालन करीत नाही. त्याच्यावर कुणाचाही विश्वास नसतो. संघटनेशिवाय एकटा व्रती नष्ट होतो म्हणून व्रती व्यक्तींनी संघटनेसाठी प्रयत्न केले पाहिजेत.

**व्रताचे महत्त्व :** योगविद्येने आपले व दुसऱ्याचे कल्याण होते जे काही येथे ग्रहण करून कार्य करण्यात आले त्याविषयी काही संकल्प घ्यावेत. अन्यथा तुम्ही स्वतःचे व इतराचे कल्याण करू शकत नाही. व्यक्ती काही वेळा विचार करते की पूर्वी जी व्रते स्वीकारली होती त्यात खंड पडला तेव्हा आता व्रत घेणार नाही. तरी तसे न करता तुम्ही तीच व्रते पुन्हा स्वीकारा व त्याच व्रतांचे पुन्हा दृढतेने पालन करीन अशी प्रतिज्ञा करा न चालणाऱ्यापेक्षा हजारो वेळा पडूनही चालणारा चांगला असतो. चालणारा कधी ना कधी आपले लक्ष्य प्राप्त करतो हे निश्चित आहे.

गुरूजवळ राहूनही जो यम नियमांचे पालन करणार नाही त्याला सफलता प्राप्त होत नाही. वेद इत्यादी शास्त्रांचे अध्ययन करूनही सत्य व्यवहारात आणले नाही तर सफलता प्राप्त होणार नाही. जो आपले दोष न पाहता प्रामुख्याने इतरांच्या दोषांना पाहतो तो निष्फळ ठरतो. सर्वांनी आपापल्या स्तरावर नियम बनवावे व व्रत घ्यावे.

मनुष्याने व्यक्ती, परिवार, समाज, देश, विश्व या स्तरावर काय करावे व काय करू नये याचा सारासार विचार करावा. त्यानुसार व्रत घ्यावे व व्रताशी दृढ राहून वेद व राष्ट्ररक्षणाचा हेतू बाळगून संकल्प घ्यावा. काही जण असा विचार करतात की वृध्द झाल्यावर जीवन व्रतामध्ये घालवू पण अतिवृध्द होऊन जीवनात काहीच उरले नाही तर ती व्यक्ती काय करू शकेल? जेव्हा जीवनच उरले नाही तेव्हा व्रत कोणत्या स्वरूपात स्वीकारता येईल ?

**अनुव्रतः पितुःपुत्रः** : जो सत्याच्या मार्गावर चालतो तो आपला पुत्र व जो ईश्वराच्या आज्ञेविरूध्द चालतो तो आपल्या घरात जन्म घेऊन ही आपला पुत्र ठरत नाही.

एकतर प्रचाराचे काम करा, धनाने मदत करा, सेवेचे कार्य करा. पुत्र किंवा पुत्री यांना देश, वेद, धर्मासाठी अर्पण करा, व्रत घ्या, उन्नती करा. बुध्दिपूर्वक पतन होता कामा नये पडलात तरी उठा, चाला, पुढे चला. मार्ग खूप दूरवर पसरलेला आहे. पण सफलता नक्की मिळेल. ऋषींची गोष्ट मानावी. जगाला घाबरू नये.

जो पुरूष व जी स्त्री वेद, राष्ट्र यांची सेवा करणे हाच उद्देश्य ठेवून चालत असतील तर ते अविवाहित ही राहू शकतात पुढे जाणारे, मृत्यूचा स्वीकार करणारे थोडे ही असतील तर त्यांच्या मागे जाणारे खूप असतात जसे सुभाषचंद बोस, चंद्रशेखर, भगतसिंह वगैरे, चुकीची गोष्ट मूळापासूनच उखडून फेका ती नष्ट होईल भांडण नाही संघर्ष नाही. आक्रमण करणाऱ्यापासून विचारपूर्वक स्वतःचे रक्षण करावे. खोटे बोलणाऱ्याचा खोटेपणा पकडला गेला तर तो विरोध करील. त्याच्याशी टक्कर घ्यावी लागेल.

ज्याच्या जीवनात व्रत, नियम, उद्देश्य आदर्श नाहीत तो माणूस नव्हे 'अव्रतो अमानुषः' जो आपले व्यक्तिमत्व आदर्श बनवू इच्छितो त्याने सर्व नियमांचे पालन करावे. व्रती व्यक्तीसाठी काहीच कठीण नाही. अव्रती व्यक्तीसाठी सर्व काही कठीण आहे. साधकाने यम नियमांचे पालन चांगल्या प्रकारे चांगल्या भावनेने केले पाहिजे.

संकल्पाच्या आधारावरच व्यक्ती महान बनते. व्रताचे पालन न करणारी व्यक्ती चांगली बनू शकत नाही शेवटी हा निष्कर्ष निघतो की जर चांगल्या व्रतासाठी एखादे कार्य अंगीकारले व त्यासाठी मृत्यूही आला तरी डगमगू नये. सत्याचे व्रत घेतल्यास व त्यासाठी मृत्यू समोर उभा राहिल्यास खोटे बोलून प्राण वाचवू नयेत. त्यावेळी असा विचार करावा की खोटे बोलण्याने मी अमर होईन काय ? कधी मरणार नाही काय ? जेव्हा आपण आपल्या बुध्दीनेच प्रश्न निर्माण करतो तेव्हा दोन विचारांची टक्कर होते. अवसरवाद की आदर्शवाद. जेथे लाभ होतो तेथे अवसरवादी खोटे बोलतो व आदर्शवादी तर इतके कमी झालेले आहेत की लाखोमध्ये एखादा मिळेल बाकीचे सगळे (अवसरवादी) संधिसाधू. लाभ होत असेल तर सत्य बोलणे पण नुकसान होत असेल तर असत्य बोलणे याला अवसरवाद म्हणतात. जर पती पत्नी ही परस्पर खोटे बोलत असतील तर त्यांचाही नेहमीसाठी एक दुसऱ्यावरचा विश्वास उडून जातो. परंतु खरे बोलणाऱ्याचा विश्वास त्यांचे विरोधी शत्रू ही करतात. या खोटेपणाने माणसाला

 

मानवतेपासून दूर केलेले आहे. लौकिक सुख व मोक्ष सुख दोन्ही सत्याने प्राप्त होतात. असत्यवादी कधी सुखी असू शकत नाही. महान लोक नेहमी मनस्येकं, कर्मण्येकं व दुर्जनलोक मनस्यन्यद् वचस्यन्यद् कर्मण्यन्यद् असतात.

## नित्यानित्य विचार व प्रलयावस्था संपादन

आत्मा व शरीराच्या नित्य अनित्य स्वरूपाला जाणण्यासाठी विवेक विचार प्रक्रिया अमलात आणावी, बुध्दीने असा दृढ विचार करावा की हे शरीर नाशवान आहे. व्यक्ती तिला नाशवान मानते की सदैव राहणारे याचा निर्णय करून नित्याला नित्य व अनित्याला अनित्य निश्चितपणे जाणावे केवळ शाब्दिक रूपाने जाणू नये. दोन व दोन चार होतात या प्रमाणे शरीर एके दिवशी निश्चितपणे नष्ट होणारे आहे हे नक्की जाणावे. केव्हा होणार आहे ? कधीही कोणत्याही घटनेने होईल एवढे निश्चित आहे. १०१ प्रकारे मृत्यू होईल. एक, दोन कितीही घरे बांधली तरी ती येथेच राहतील. आपल्या शरीराचे दहन होईल. या वास्तविक स्थितीला व्यक्ती घाबरते. 'मी' 'माझा' कायम टिकणार नाही. 'माझा पुत्र विनय हा पुन्हा कधी भेटणार नाही.' लाखो करोडो वर्षापर्यंत ही नाही. जो गेला तो गेला.

तुमची इच्छा अशी असते की या जगात नेहमी खात पीत जगावे पण हे शक्य आहे काय ? नेहमी कसे जगता येईल ? कुणी असे जगला आहे काय ? जर शंभर टक्के उत्तर 'नाही' असे आहे तर व्यक्तीने हे का मानू नये की ती मरणार आहे याचेच नाव अनित्याला अनित्य व नित्याला नित्य मानणे होय. शरीर मृत्यू पावले तर शरीराचे परमाणू, आत्मा व ईश्वराचाही नाश होतो काय ? ते तर शाश्वत आहेत.

एक साधक म्हणतो ''स्वामीजी हे तर आम्ही ही जाणतो'' स्वामीजी म्हणतात ''हे शरीर नाशवान आहे असे तुमचे मानणे अजून केवळ शाब्दिक ज्ञान आहे जेव्हा ही गोष्ट वास्तविकरीत्या जाणण्यात येते तेव्हा व्यक्तीचे जीवन बदलते, ती धर्माचे पालन पूर्ण पुरूषार्थाने करते. तिला नेहमी मुक्ती प्राप्त करण्याची इच्छा असते संसार व संसाराच्या भोगाबाबत तिची अरूची निर्माण होते'' तुम्ही स्वतःया स्तराचे आहात काय? जेव्हा साधक अनित्याला अनित्य व नित्याला नित्य जाणतो तेव्हा सत्य ज्ञान प्राप्त होते व असत्य ज्ञानाचा नाश होतो.

जी वस्तू तोडल्याने तुटते ती नाशवन्त असते. जी वस्तू उत्पन्न होते ती नाशवान असते. येथे एक शंका उत्पन्न होते की शरीराची उत्पत्ती प्रत्यक्षात दिसते पण पृथ्वीची

उत्पत्ती पाहता येत नाही याचे उत्तर असे की प्रत्यक्षात हे दिसते की पृथ्वीचा एखादा भाग हिरा, दगड, माती वगैरे तोडल्यास तुटतात. ज्या वस्तूचा अंश तुटू शकतो ती वस्तू पूर्ण नष्ट होऊ शकते. म्हणून पृथ्वी नाशवान आहे. पृथ्वी नाशवान आहे कारण ती अनेक भागांनी जोडलेली आहे. जी जी वस्तू अनेक भागांनी बनलेली असते ती ती नाशवान असते. जसा घट, म्हणून अनेक भागांनी बनलेली पृथ्वीही नाशवान आहे.

जर एखाद्या व्यक्तीच्या समोर एखादी वस्तू ठेवून ती अनंत काळापर्यंत टिकणारी आहे का ? असा प्रश्न विचारल्यास हे कळून येईलकी त्या वस्तूचा कधी ना कधी नाश होणार आहे. व पुन्हा कधी तरी उत्पन्न होईल. साधकाने ही अनादी काळाला समोर ठेवून पाहिल्यास तो या परिणामावर पोचतो की ही पृथ्वी कधी ना कधी उत्पन्न झालेली आहे व तिचा विनाश ही होणार आहे तेव्हा अनित्य पृथ्वीला अनित्य जाणून ही जिज्ञासा उत्पन्न होते की पृथ्वी नष्ट होताना अत्यंत अभावरूपात बदलत जाते की खंडरूपात बदलते ? यावरून हे ज्ञान होते की जे भावरूप आहे त्याचा कधी अभाव होत नाही. लहान लहान सूक्ष्म भागामध्ये परिवर्तित होणे म्हणजेच पृथ्वीचा नाश होय.

प्रत्येक शरीर उत्पन्न होते व नष्ट होते. त्या प्रमाणे पृथ्वी, जल, वायू, अग्नी व आकाश यांना नाशवन्त समजावे या शरीराचा नाश होऊन पृथ्वी, जल, अग्नी, वायू, आकाश या स्थूल भूतांमध्ये ते विलीन होते. हे स्थूल भूत तन्मात्रांमध्ये, (सूक्ष्म भूतांमध्ये) तन्मात्रा अहंकारामध्ये व अहंकार महत्तत्त्वात लीन होतो. नंतर महत्तत्त्व नाश पावते व सत्त्व, रज तमाचा मात्र नाश होत नाही. जे सूक्ष्मतम कण कधीही कोणत्याही अवस्थेत विभाजित होत नाहीत त्यांना परमाणू म्हणतात.

जे विभाजित होते त्यांना सर्वांना अवयवी म्हणतात अहंकार अवयवी आहे, तन्मात्रा अवयवी आहेत, सत्त्व, रज, तम अवयव आहेत. अवयवी नाहीत. हा विवेक म्हणजे तत्त्वज्ञान होय हा उत्पन्न झालेला संसार पाहून मूळ रूपात असलेली प्रकृती (सत्त्व, रज,तम) जीव व ईश्वरही जाणता येतात.

जेव्हा व्यक्ती बौध्दिक स्तरावर जगाला प्रलयाप्रमाणे बनविते तेव्हा समाधी (योग) प्रारंभ होते. नित्याला नित्य व अनित्याला अनित्य समजल्यावर प्रलयाप्रमाणे अवस्था बुध्दीत निर्माण केल्यास चित्तवृत्ति निरोध होतो व चित्तवृत्ति निरोध होणे म्हणजेच समाधी (योग) होय.

आकृती, रूप, शब्द इत्यादींना पाहून, ऐकून व्यक्तीच्या प्रवृत्तीचा विस्तार होतो. जेव्हा व्यक्ती या सर्वांना आपल्या बुध्दीने प्रलयावस्थेत पाहते. तेव्हा प्रवृत्ती

 

समाप्त होते. ''सत्त्व, रज, तम इतस्तत: फैलावलेले आहेत, जीवात्मे सुषुप्ती अवस्थेप्रमाणे पहुडलेले आहेत. ईश्वर नित्य शुध्द, बुध्द अवस्थेमध्ये आहे.'' त्यांना जेव्हा साधक जसेच्या तसे पाहतो तेव्हा तो संपूर्ण जगाचा त्याग करतो, ईश्वराची उपासना करतो. व्याप्य संसाराच्या प्रलयावस्थेमध्ये व्यापक प्रभूला पाहतो. धागे कुशलतेने जोडून जसा रूमाल बनविला जातो तसेच ईश्वराकडून बुध्दिपूर्वक परमाणू जोडून संसार बनतो.

प्रकृती, आत्मा, परमात्मा यांचा विवेक करावा व विचार करावा की मी जीवनात खातो, पितो, चालतो, फिरतो, ईश्वराचे स्मरण करतो काय ? मी ईश्वराला संबोधून काही करतो काय ? ''हे ईश्वरा माझ्या हाताची बोटे तूच बनविलीस'' विचार करावा व पक्षपातरहित होऊन आपल्या जीवन व्यवहाराला पाहावे. आपण याप्रमाणे आहोत काय? हे सूक्ष्मतेने जाणावे. तेव्हा जाणवेल की तुम्ही नारदमुनी प्रमाणे मंत्रवित् झालेले आहात आत्मवित् नाही. कारण आत्मवित् झालेला माणूस कधी दु:खी होत नाही.

समाधी प्राप्त होत नाही, ईश्वराचा प्रत्यक्ष साक्षात्कार होत नाही तेव्हा निश्चित जाणा की ज्ञान (विवेक) व वैराग्य तुमच्यामध्ये नाही. मनुष्य जेव्हा या प्रकारचे चिंतन करतो तेव्हा स्वत:ला मृत्यूच्या पंजामध्ये पाहतो व घाबरतो आणि विचार करू लागतो की आतापासून हा विचार कशाला ? या भीतीने विचार करणे बंद करतो. परंतु विवेकी मनुष्य जगाचा शोध घेतो व निष्कर्ष काढतो की मृत्यू पासून वाचण्याचा कोणताही मार्ग नाही. मृत्यू अटळ आहे काय करावे ? सुरूवातीला ही स्थिती विसरण्यासाठी मित्रांबरोबर जाईल, खेळणे बसणे, गप्पा यात मन रमवील असे करणे म्हणजे सत्यापासून तोंड लपविणे होय. परंतु सत्यापासून कितीकाळ दूर पळू शकेल ? पुन्हा विचार केल्यास मृत्यूच्या दाढेत हळूहळू स्वत:ला पाहील दाहसंस्कार पाहील. ज्यांना आपण आपले समजत होतो. ते आपले नाहीत मी त्यांचा नाही हे कळते. नाम व नामी यांचा अभाव होतो. मग मृत्यूचे भयही नष्ट करता येते. बौध्दिक स्तरावर जेव्हा घर, धन वगैरे सर्वस्वाची आहुती देऊन एकटे उभे राहिल्यास मृत्यूलाही जिंकता येते.

मानव विचार करू लागतो की माझी अवस्था अशी होऊ शकते तेव्हा मनुष्य शरीर धारण करणाऱ्या सगळ्यांची स्थिती अशीच होईल. आपण आपला परिवार, शेजारी, समाज, जग, पशू, पक्षी इत्यादी सर्वांचा विनाश निश्चित होणार आहे. आजचे शरीरधारी समाप्त होतीलच पण संतती सुध्दा अनन्तकाळी कधी न कधी समाप्त होईल. ऋषींची ही उक्ती की एकानंतर एक सर्व समाप्त होतील अनुमान प्रमाणाने सिध्द होईल.



नंतर मनुष्य विचार करू लागतो की जर उत्पन्न होणे, नष्ट होणे, पुन्हा उत्पन्न होणे, नष्ट होणे हे आपोआपच होते की त्याला उत्पन्न करणारा कुणी आहे ? आपण स्वत: हे उत्पन्न करू शकत नाही व स्वत: ही उत्पन्न होऊ शकत नाही म्हणजेच ईश्वर बनवितो हे सिध्द होते. या प्रमाणे अनेक वर्षे संपल्यानंतर होणाऱ्या प्रलयाचा क्षण वर्तमानकाळात दिसू लागतो. संसार प्रलयाप्रमाणे दिसू लागतो तेव्हा समाधी सुरू होते.

## इच्छे विरूध्द घडल्यास मानव त्रस्त

**प्रश्न :** इच्छेच्या विपरीत होण्याने माणूस दु:खी का होतो ?

**उत्तर :** मिथ्या अभिमानामुळे. व्यक्तीची अशी धारणा बनते की माझ्या मनातील प्रत्येक इच्छा पूर्ण होईल. पण जेव्हा असे घडत नाही तेव्हा व्यक्ती दु:खी होते. आपण मनात अशी इच्छा बाळगतो की माझे काम या प्रकारे व्हावे. जशी इच्छा असेल त्याप्रमाणात त्याच पध्दतीने व्हावे. परंतु शंभर टक्के कधीही कुणाचीही इच्छा पूर्ण होत नाही. भौतिक स्तरावर सर्व कामनांची पूर्तता होऊ शकत नाही. परंतु कामनांचे संस्कार दग्धबीज करता येऊ शकतात. दु:खापासून बचाव कसा करता येईल ? व्यक्ती मनन व निदिध्यासनाने या निर्णयाप्रत येते की कोणीही कुणाच्या पूर्ण अनुकूल राहू शकत नाही. आपणही कोणत्याही व्यक्तीच्या पूर्ण अनुकूल राहू शकत नाही.

पूर्ण अनुकूल नसण्याची कारणे :-

(१) प्रत्येक व्यक्ती कर्म करण्यास स्वतंत्र आहे.

(२) प्रत्येक व्यक्तीचे संस्कार भिन्न भिन्न व योग्यताही भिन्न भिन्न असते.

(३) व्यक्ती स्वार्थी, प्रमादी, आळशी इत्यादी असते.

(४) व्यक्तीच्या बौध्दिक स्तरावर चढउतार असतात.

**उपाय:** प्रत्येक वेळी मनात हा विचार आणावा की अत्यंत जवळचा मित्र, पुत्र, पत्नी इत्यादीनीही जसा मी विचार करतो तसेच त्यानी बोलावे, विचार करावा, वर्तन करावे हे शक्य नाही कारण कर्ता म्हणजे जो 'कर्तुम्, अकर्तुम, अन्यथाकर्तुम्' करण्यास स्वतंत्र असतो. अर्थात् इच्छा असेल तर करतो इच्छा नसल्यास करणार नाही किंवा विपरीत करतो. स्वतंत्र कर्ता असत्यामुळे एखादी व्यक्ती आपला विरोधही करू शकते. प्रत्येक व्यक्तीला विचार करणे, बोलणे, करणे याचे स्वातंत्र्य आहे त्याच्यावर नियंत्रण करता येत नाही ईश्वराची धर्माचरणाची आज्ञा

 



मानावी अथवा न मानावी यासाठी ती स्वतंत्र असते.

मनुष्य वर्षानुवर्षे आपले तन, मन, धन वापरून घाम गाळून रक्ताचे पाणी करून सन्तानांना योग्य बनवितो परंतु मुलगा मोठा झाल्यावर स्वतंत्रपणे राहून आपल्याला मदत करणार नाही हे घडू शकते. जर व्यक्तीने आधीच विचार केला की माझा पुत्र माझ्या इच्छेनुसार वागणार नाही. काही दिल्यावर परत करणार नाही. तेव्हा या इच्छेच्या आघातापासून, दुःखापासून आपण वाचू शकतो. वेगवेगळे संस्कार व योग्यता यामुळे माणूस आपल्यावर केलेले उपकार विसरून जातो. मला योग्य वेळी मदत मिळाली होती ही कृतज्ञतेची भावना धार्मिक संस्कार नसल्यामुळेच तो विसरून जातो. एखाद्या माणसाला स्मरण असले तरीही आळस, प्रमाद, स्वार्थ यामुळे तो योग्य प्रकारे वागत नाही.

इच्छेच्या विपरीत घडल्यास असा विचार करावा की मी ही आपले माता, पिता, पत्नी, मुले यांच्या अनुकूल पूर्णपणे व्यवहार करीत नाही तेव्हा इतर ही माझ्या अनुकूल वागत नसतील तर मी दुःखी का व्हावे ? या तीन गोष्टींवर विशेष लक्ष द्यावे.

(१) आपल्या मनातून ही मिथ्या मान्यता दूर करावी की मी जसा आहे तसेच लोकांनी मला मान्य करावे, समजावे जाणावे. परोपकारी, दानी व्यक्तीला मान, यश, कीर्ती मिळेलच असेही नाही. जर एखाद्याची बुध्दी वाईट असेल तर तो धार्मिकाला अधार्मिक, परोपकारीला ही स्वार्थी म्हणतो. अशा प्रकारची धारणा बनवून घ्यावी की आपली निंदा ही होऊ शकेल, तेव्हा दुःख होणार नाही.

(२) अशा प्रकारची अपेक्षाही व्यर्थ आहे की दुसऱ्या व्यक्तीने माझी प्रशंसा न केली तरी चालेल पण कमीत कमी खोटे आरोप तरी करू नयेत. म्हणून नेहमी असा विचार बाळगावा की चांगल्या गोष्टीलाही विरोध होऊ शकतो.

(३) सहनशीलता असावी. दुसऱ्या व्यक्तीकडून चूक झाल्यास माणूस उत्तेजित होतो. सहन करू शकत नाही. प्रत्येकामध्ये जन्मोजन्मीचे संस्कार वेगवेगळे असतात म्हणून ज्यांच्या पासून काही विचार, सिध्दांत प्राप्त होत नाहीत त्यांच्याशी सावधान पूर्वक व्यवहार करावा किंवा उपेक्षा करावी अथवा सहनशीलता वाढवावी.

समस्यांचे मूळ कारण आपण आहोत. संपूर्ण मानसिक संकटाचे निवारण

होऊ शकते. परंतु आधिभौतिक, आधिदैविक संकटाचे निवारण पूर्णपणे होऊ शकत नाही.

## अव्दैतवाद - एक विवेचन

देशात व परदेशात अदवैतवादी विचाराचा प्रसार झालेला आहे. त्याचे लाखो अनुयायी आहेत. त्यांची मान्यता अशी आहे की केवळ एक ब्रह्म सत्य आहे, हे जग मिथ्या आहे, त्याचे अस्तित्व नाही. ते जीवात्म्यालाही वेगळी नित्य सत्ता मानीत नाहीत. आपल्या मताच्या समर्थनार्थ अनेक हेत्वाभास (खंडित होणारे प्रमाण) प्रस्तुत करतात. या मान्यतेवर आम्ही काही विवेचन प्रस्तुत करीत आहोत.

(१) जर ब्रह्मच जीव बनलेला आहे तर हे सिध्द केले पाहिजे की तो केव्हा बनला का बनला व त्याला सर्वप्रथम कुणी जाणले ? याचे कोणतेच उत्तर नाही म्हणून जीव ब्रह्माचा अव्दैत विचार भ्रमित करणारा आहे.

(२) ब्रह्मच जीव बनला हे समजून चालले तर संपूर्ण प्राण्यांचे जीव हे ब्रह्माचे तुकडे मानावे लागतील. त्यामुळे ब्रह्म एकसंध व अतूट राहणार नाही.

(३) ब्रह्माचा कितवा भाग अजून जीव बनला नाही तो भाग कुठे कुठे आहे ? याचे उत्तर नवीन वेदान्तीनी दिले पाहिजे.

(४) ब्रह्माचा जो भाग अद्याप जीव बनलेला नाही तो कोणत्या कारणाने बनलेला नाही व जो जीव बनला तो का बनला ? जीव बनलेला भाग दुसऱ्या भागापेक्षा दुर्बल आहे अथवा दोषयुक्त आहे ? जर तसा असेल तर त्या ब्रह्माला एकरस म्हणतायेणार नाही. ज्याची अवस्था बदलते व जो कधी जीव बनतो तर कधी ब्रह्म बनतो तो एकरस असू शकत नाही.

(५) जीवामध्ये ब्रह्म आहे किंवा नाही हे स्पष्ट झाले पाहिजे. ब्रह्म हा सर्वव्यापक असल्यामुळे जीवामध्येही आहे मग जीव जेव्हा स्वत: ब्रह्मच आहे तर जीवाच्या आत व्यापक ब्रह्म कसा मानता येईल ? जर असे म्हटले की जीवात ब्रह्म राहात नाही तर मग ईश्वर सर्वव्यापक नाही.

(६) ज्या वस्तूचे अवयव (अंश/तुकडे) होऊ शकतात ती त्या अवयवांनी मिळून बनलेली असते. ज्या ब्रह्मातून असंख्य जीव निर्माण झालेले आहेत व निर्माण होत आहेत व पुन्हा ब्रह्मातच विलीन होत आहेत तेव्हा ब्रह्माला केवळ जीवांचा संग्रह मानावा लागेल मग ब्रह्माच्या रूपात त्याचे पृथक अस्तित्व मानता येणार नाही. अंवयव असल्यामुळे ब्रह्म अनित्य आहे हा दोष त्याला लागेल.

(७) ब्रह्माचा स्वाभाविक गुण ज्ञान आहे व स्वाभाविक गुणाचा नाश कधी होत नाही. तेव्हा ज्ञानस्वरूप ब्रह्म कधी कधी अज्ञानी होतो हे कसे शक्य आहे?

(८) अविद्या किंवा माया कोणती वस्तू आहे ? ती कुठे असते ? तिने ब्रह्माला केव्हा घेरले ? प्रथम ईश्वर व नंतर जीव कधी बनविला ?

(९) ब्रह्म व अविद्या (माया) यांनी जीव बनतो तर तो माया किंवा अविद्या पेक्षा दुर्बल आहे काय ? सर्वशक्तिमान ब्रह्माला कुणी दुसरी शक्ती दुर्बल करू शकते काय ? सर्वज्ञामध्ये अविद्या राहू शकते काय ?

(१०) ज्या अविद्येने किंवा मायेने ब्रह्माला जीव मानून आपल्या आधीन केले ती ब्रह्माला रोखू शकत नाही काय ? जीवाला कर्मफळाच्या रूपात दुःख देऊ नये असे ती करू शकत नाही काय ?

(११) ब्रह्म किंवा ईश्वर जो जीवांना कर्मफळ देतो तो कोणत्या अधिकाराने देतो ? कोणी राजा किंवा न्यायाधीश स्वतःच दोषी किंवा चोर बनून आपल्या विरूध्द साक्षी पुरावे गोळा करून आपल्या स्वतःला दंड देतो काय ?

(१२) हे शक्य तरी आहे काय की माणूस आपल्या स्वतःला कापून किंवा कुणा दुसऱ्याकडून कापला जाऊन जीवंत राहील व कापलेल्या भागाने काम घेईल किंवा त्यावर शासन करील ? कधीही नाही. तेव्हा परमेश्वर कोणत्या प्रकारे खंडित होऊन जीवित राहू शकतो किंवा जीवांवर अधिकार चालवू शकतो ?

(१३) जेव्हा सर्व ब्रह्मच ब्रह्म आहे तेव्हा प्रकृती व जड पदार्थ कुठून आले ? ब्रह्म किंवा ईश्वराला अविद्येने जीव बनविले आहे तर जड पदार्थ ही ब्रह्माने बनविले आहेत की कुणाच्या संयोगाने जर असे म्हटले की प्रकृती ब्रह्मा पासून बनलेली नाही तर हे मानावे लागेल की ब्रह्मापेक्षा वेगळी दुसरी वस्तूही अनादी आहे, व जर प्रकृतीला ही अनादी मानले तर जीवाला अनादी मानण्यात कोणती अडचण आहे ?

(१४) "जग स्वप्नाप्रमाणे मिथ्या आहे म्हणून जीव ही मिथ्या आहे" हे कथन ही निरर्थक आहे हा विचार केवळ कल्पनेवर आधारित आहे. जशी स्वप्नाची गोष्ट मिथ्या, जग मिथ्या तसेच ब्रह्मालाही मानणे मिथ्या असू शकते. नवीन वेदान्ती जे स्वतःला ब्रह्म मानतात हे ही अज्ञान असू शकते. मात्र त्यावेळी अज्ञानच राहील इतर काही नाही.

(१५) जर साप वास्तविक स्वरूपात नसेल तर रज्जू (दोरी) मध्ये सापाची कल्पनाही (भ्रम) करता येऊ शकत नाही. दोरी मध्ये साप नाही पण सापामध्ये साप



निश्चित असतो याच प्रकारे जगत व जीव भ्रम नाहीत. जिच्या संबंधी कोणतीही कल्पना आपण करतो ती प्रत्येक वस्तू यथार्थ सत्य निश्चितच असते.

(१६) जन्मांध व्यक्तीला कधी रूपाचे स्वप्न पडत नाही. जी वस्तू आपण पाहिली किंवा ऐकली नाही ती कधी स्वप्नात येऊ शकत नाही. यामुळे हे सिध्द होते की जर जीव नसता तर ब्रह्माला जीव होण्याचा विचार कधीच सुचला नसता जीवाची स्वतंत्र सत्ता मानल्याशिवाय ब्रह्माला जीव मानणे ही घडू शकले नसते.

(१७) ज्या अज्ञानामुळे जीव ब्रह्म बनलेला आहे ते अज्ञान संपूर्ण ब्रह्माला अज्ञानी का करीत नाही ? ब्रह्माच्या काही अंशालाच का अज्ञानी बनविते ?

(१८) घटाकाश, मठाकाश यांचे उदाहरण देऊन हे दर्शविले जाते की घट, मठ या उपाधीने आकाश पृथक पृथक दिसून येते. अन्यथा सर्व आकाश एकच आहे. सर्व काही ब्रह्म आहे व जीव हा अविद्येमुळे भासत आहे अशी युक्ती निरर्थक आहे कारण आकाश वस्तुत: विभक्त होत नसते घट व मठाचे आकाश पृथक नाही पण जीव व ब्रह्म तर स्पष्ट पणे वेगळे मानले जातात. ब्रह्म व्यापक, जीव एकदेशी, ब्रह्म कर्मफलदाता आहे, जीव कर्म कर्ता व कर्मफल भोक्ता इत्यादी. म्हणून या दृष्टान्ताची जीव ब्रह्माबरोबर समानता नाही.

(१९) घटाकाश व मठाकाश हीं उपाधी असणारा सिध्दांत तर स्वत: नवीन वेदान्ती लोकांच्या विरूध्द जातो. कारण घट व मठ आकाशापेक्षा वेगळे आहेत. जसे आकाशाहून भिन्न घट, मठ स्वीकार करण्यानेच घटाकाश मठाकाश बनतात. तसेच ब्रह्माहून भिन्न इतर एखादी (अविद्या) सत्ता मानल्यावर ही जीवाला मानावे लागेल. यामुळे केवळ ब्रह्मच आहे हा सिध्दांत खंडित होतो.

(२०) "ब्रह्मच उपाधीने ईश्वर व जीव बनतो" हे म्हणणे असत्य आहे. जर ब्रह्माशिवाय काहीच नाही तर उपाधी कुठून आली ? जेव्हा सामान्य ज्ञान असणारा माणूस उपाधी, व्याधी पासून बचाव करून घेऊन सुखाने राहू शकतो तर ज्ञानस्वरूप, सर्वशक्तिमान ब्रह्माचा उपाधीच्या योगे पराजय व्हावा ही गोष्ट कधीही स्वीकार करण्यायोग्य नाही.

(२१) "उपाधी = अविद्या = माया हिंचा संबंध तुटल्यावर आपल्या स्वरूपाचे ज्ञान होते व जीव पुन्हा ब्रह्म होतो" हे कथन सत्य नाही: यामुळे जीव ब्रह्माहून अधिक ज्ञानी व शक्तिशाली सिध्द होतो. ब्रह्माला उपाधीमुळे निम्न स्तर प्राप्त होतो पण जीवाने त्या उपाधीचे बंधन तोडून दाखविले.

(२२) जीवाला ब्रह्म मानण्याने चोरी, व्यभिचार इत्यादी सर्व पाप करणारा ब्रह्मच आहे

असे सिध्द होते.

(२३) उपाधीला अनिर्वचनीय आहे असे मानले जाते अर्थात ती ज्ञानयुक्त आहे की अज्ञानयुक्त आहे हे ठरविता येत नाही. परंतु ज्ञानस्वरूप ब्रह्माला अज्ञानी बनविणारी उपाधी अज्ञानयुक्त असण्याची शंका येणे वावगे नाही. उपाधीला अनिर्वचनीय म्हणणे म्हणजेच या गोष्टीचे प्रमाण आहे की नवीन वेदान्तीचा आपल्या मंतव्यावर स्वतःच विश्वास नाही.

(२४) "ब्रह्माचे प्रतिबिंब अन्तःकरणावर पडते ज्याला चिदाभास म्हणतात हाच जीव आहे" हे संपूर्ण असत्य आहे. प्रतिबिंब हे दुसऱ्या वस्तूवर पडत असते व नवीन वेदान्तीच्या मते ब्रह्माशिवाय दुसरी वस्तू नाहीच तर प्रतिबिंब कशाचे कशावर पडेल ? ज्या वस्तूचे जेथे प्रतिबिंब पडते तेथे ती वस्तू नसते त्यामुळे ब्रह्म सर्वव्यापक नाही असा दोष ही येऊ शकतो.

(२५) साकार वस्तूचे प्रतिबिंब पडते पण ब्रह्म तर निराकार आहे त्याला रूप व आकार नाही तर त्याचे प्रतिबिंब कसे ?

(२६) दूर अंतरावर असणाऱ्या वस्तूचे प्रतिबिंब पडते परंतु ब्रह्म सर्वव्यापक आहे. कोणतीही वस्तू त्याच्यापासून दूर नाही तेव्हा त्याचे प्रतिबिंब कसे ?

(२७) अंतःकरणाच्या संयोगाने ब्रह्माचा जीव बनतो अशा स्थितीत जेथे जेथे अन्तःकरण जाईल तेथे तेथे ब्रह्माचा जीव बनत जाईल व पूर्वीच्या स्थानी जेथे जेथे जीव होता तो तो ब्रह्म होत जाईल. कधी जीव ब्रह्म बनेल तर कधी ब्रह्म जीव बनेल या प्रकारे सर्व क्षणाक्षणात परिवर्तन होईल. कर्म करणारा ब्रह्म / जीव वेगळा असेल व फळ भोगणारा ब्रह्म / जीव वेगळा असेल. अशा वेळी कर्मफलव्यवस्था विस्कळित होईल. अन्यायाचा दोष लागेल करणारा वेगळा व भोगणारा वेगळा.

(२८) जड अन्तःकरण ब्रह्माला जीव बनवील व स्वतः अविद्येने ग्रसित होईल हे कसे शक्य आहे ?

(२९) अव्दैतवादात कोणत्याही जीवावर विश्वास बसू शकत नाही कारण तो किती काळ जीव राहील हे कळू शकत नाही अंतःकरणाने त्याचा त्याग केला तर तो ब्रह्म बनू शकेल. अशा अवस्थेत एखाद्या राजाने नीच व क्षुद्र अपराध्याला दंड देऊ नये कारण जर अंतःकरणाने त्याला सोडून दिले तर तोच विशुध्द ब्रह्म बनेल.

(३०) अंतःकरणाच्या संयोग वियोगाने प्रत्येक क्षणी ब्रह्मज्ञानी व अज्ञानी बनेल अशा स्थितीत तर ब्रह्म अखंड, एकरस, सर्वज्ञ, सर्वव्यापक, सर्वशक्तिमान राहणार नाही.



 

(३१) एके ठिकाणी अंत:करणाच्या संयोगाने ब्रह्म जीव बनतो व त्याच अन्त:करणाचे दुसरीकडे स्थलान्तर होण्यापूर्वी 'जीव' ब्रह्म बनेल. अशा अवस्थेत पूर्वीच्या ठिकाणी कथन केलेल्या गोष्टींचे स्मरण राहता कामा नये. परंतु असे दिसून येते की प्रत्येक माणसाला आपल्या बाल्यावस्थे पर्यंतच्या गोष्टींचे स्मरण असते. अंत:करण तर जड आहे व जड कधी स्मरण करीत नाही. स्मरण तर चेतनाला राहील व चेतन वारंवार बदलेल तर एकाचा अनुभव दुसऱ्याच्या स्मरणात कसा राहील ?

(३२) जर ब्रह्मच जीव बनलेला आहे तर जीव ही सगळीकडे सर्वशक्तिमान झाला पाहिजे कारण स्वाभाविक गुणांचा नाश कधीच होत नाही.

(३३) चेतन असल्यामुळे जीव ब्रह्म एकच आहेत दोन वेगवेगळ्या सत्ता नाहीत असे म्हटले जाते. परंतु केवळ एक गुण समान असेल तर दोन पदार्थ एक मानले जाऊ शकत नाहीत. जसे पेरू व सफरचंद एक मानले जात नाहीत. जीवाचे व ब्रह्माचे अनेक गुण परस्पर भिन्न आहेत. जीव हा एकदेशी, अल्पज्ञ, अल्पशक्तिमान आहे तर ब्रह्म सर्वव्यापक, सर्वज्ञ, सर्वशक्तिमान आहे. एक किंवा काही गुणांच्या समानतेमुळे दोघांना एक मानणे अविद्या (अज्ञान) आहे.

(३४) ही अविद्या अशी आहे की स्त्री ही ब्रह्म, पुरूष ही ब्रह्म, भाकरी ही ब्रह्म व घाण ही ब्रह्म, चोर ही ब्रह्म, पोलीस ही ब्रह्म अशा अवस्थेत धर्माधर्म, सुख दु:ख इत्यादीची विवेचना ही होऊ शकत नाही. पेढा ही ब्रह्म, शेण ही ब्रह्म मग आपण पेढा तोंडात गेल्यावर गिळतो व शेण तोंडात घातल्यावर थुंकावे का लागते?

वरील विवेचनावरून गम्भीरतापूर्वक विचार केल्यास हे सहजपणे सिध्द होते की ब्रह्म, जीव व प्रकृती यांना एक मानणे संपूर्ण खोटे आहे. मिथ्या गोष्टींना मानणे श्रेयस्कर नसते म्हणून या मान्यतेचा त्याग केला पाहिजे.

